श्रीसंतश्रेष्ठ तुकाराम महाराजकृत

# श्रीमद्भगवद्गीतेचा

## अभंगात्मक अनुवाद अथवा मंत्रगीता

[ मूळ संस्कृत श्लोकांसह ]



श्री संतश्रेष्ठ तुकाराम महाराजकृत

# श्रीमद्भगवद्गीतेचा

## अभंगात्मक अनुवाद अथवा मंत्र गीता

[ मूळ संस्कृत श्लोकांसह ]

संपादक

वा. सी. बेंद्रे,

लेले यांचा बंगला, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणे ४




प्रथमावृत्ति १९५० ]

[ किंमत ५ रुपये

॥ श्री विठ्ठल रखुमाबाई, देहू ॥



श्री संतशिरोमणी तुकोबांची कुलस्वामिनी

# निवेदन

माझे मित्र व पुणें येथील लांकुडकामाचे प्रसिद्ध व्यापारी शेठ विठ्ठलदास गोकुळदास यांनी तुकोबांच्या 'गीता-टीके'कडे माझें लक्ष प्रथम वेधलें. गीतानुवादांतील भाषा व विचारपद्धति तुकोबांच्या गाथेंतील अभंगांशीं पूर्ण जुळती वाटली. म्हणून समर्थ भारत छापखान्याचे श्रीयुत स. रा. सरदेसाई यांना माझा विचार सांगतांच त्यांनी या गीतानुवादाच्या मुद्रण-प्रकाशनाची व्यवस्था करण्याचें तावडतोब टरविलें व मला माझे संपादकीय कार्यास लागण्यास सांगितलें. अर्थात् या उपक्रमाचें सर्व श्रेय या मित्रद्वयांकडे आहे.

श्रीयुत शंकरराव श्रीकृष्ण देव, श्रीसमर्थ वाग्देवता मंदिर व श्रीयुत गाडे यांचा उल्लेख 'प्रास्ताविकां'त आलाच आहे. त्यांनीं आपल्या संग्रहांतील हस्तलिखितें दाखवून मला कायमचें ऋणी करून ठेवलें आहे.

माझ्या अभ्यासांत पुस्तकें, दुर्मीळ हस्तलिखित प्रकाशित वा अप्रकाशित ग्रंथ वगैरेंच्या साहाय्यार्थहि मला नेहमी माझ्या मित्रवर्गावर सर्वस्वीं अवलंबून राहावें लागतें. या 'तुकोबांच्या चरित्र' विषयक अभ्यासांत प्रा. प. कृ. गोडे, महामहोपाध्याय दत्तोपंत पोतदार, श्री. चिं. ग. कर्वे, प्रा. चिं. ब. जोशी, रावबहाद्दुर म. का. कारखानीस, महाराष्ट्र ग्रंथालयाचे श्री. कोल्हटकर, वाडिया पुस्तक संग्रहाचे श्री. दत्तोपंत पारखी, परशुरामभाऊ कॉलेजचे प्रा. दत्तोपंत रानडे, डेक्कन कॉलेज इन्स्टिटयूटचे डॉ. रा. ग. हर्षे यांनी नेहमीप्रमाणें साहाय्य केलें. त्याचप्रमाणें मुंबईच्या श्रीमती दुर्गाताई बापट यांनीहि आपले जवळील 'गीतार्थबोधिनी'ची जुनी प्रत दाखविली. त्याबद्दल माझ्या मित्र-वर्गाबरोबर त्यांचाहि मी आभारी आहें. अभंगपाठ देतांना माझे बंधूंनीं पारमार्थिक साधनांतील निरनिराळी माहिती वेळोवेळीं देऊन मार्गदर्शन केलें. त्यामुळें मला हा विषय बराच सोपा वाटला. माझ्या सर्व अडीअडचणींना तोंड देऊन मला अभ्यासाचे मार्गावर ठेवण्याची दक्षता माझे मित्र श्रीयुत मामासाहेब कर्वे घेतात, म्हणूनच कांही हातून घडतें. परंतु हें ऋण मातृ-पितृ-भ्रातृ-ऋणाप्रमाणें जन्मोजन्मीं बरोबरच राहणारें आहे.

आषाढी एकादशी, १८७२ }<br>
२५ जुलै १९५० }

वा. सी. बेंद्रे

# अनुक्रमणिका



### श्री संतश्रेष्ठ तुकाराम महाराजकृत

# श्रीमद्भगवद्गीतेचा

## अभंगात्मक अनुवाद अथवा मंत्रगीता

—०—

## प्रास्ताविक

धर्म रक्षणासाठीं । करणें आटी आम्हांसी ॥ १ ॥
वाचा बोलो वेदनीति । करूं संतीं केलें तें ॥ २ ॥ [१२५*]
धर्मांचें पाळण । करणें पाखांड खंडण ॥ १ ॥
हेंचि आम्हां करणें काम । बीज वाढवावें नाम ॥२॥ [१४४५]
—तुकाराम

[ १. उपोद्घात, २. तुकारामकालीन महाराष्ट्र, ३. जातीय व आचार-धर्मांतील विषमता व परावलंबित्व, ४. तुकोबा, ५. गीतानुवाद व उपलब्ध प्रती, ६. गीतानुवादाचें स्वरूप, ७. अनुवादक तुकाराम कोण ?, ८. अंतर्गत पुरावा, ९. समकालीन साक्षीदार, १०. गाथेंतील गीताविषयक महत्त्वाचे उल्लेख, ११. गीतानुवादावरील नंतरचे अभिप्राय, १२. तुकोबांच्या छळाची कारणमीमांसा, १३. वह्या तारल्या - दिव्य निर्णय, १४. उपसंहार. ]

---

*गाथेंतील अभंगांचे अनुक्रम नंबर विष्णुबोवा जोगांच्या गाथेच्या द्वितीयावृत्तींतलि आहेत व हा क्रमांक नुसताच चौकोनी कौसांत दाखविला आहे : [ ३४५० ].—" श्री तुकारामाची गाथा-भाग १ ला व २ रा, " संपादक कै. ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग, प्रकाशकः केशव भिकाजी ढवळे, द्वितीयावृत्ति, मुंबई, १९२७. संदर्भासाठीं ही गाथा स्वीकारली आहे. परंतु गीतानुवादांतील अभंगापुढें त्याचा क्रमांक [ गी. २०७ ] असा दाखविला आहे व तो या पुस्तकांतील आहे.

श्री संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांच्या चरित्रपर कांहीं लिहावें असें १९४९च्या जून महिन्यांत सहज मनांत आलें. पुणें पेशवे दप्तरांत संशोधनार्थ विशेष सवलत मिळाली. तेथील साधनसामग्रीच्या अभ्यासास प्रारंभ केला. या अभ्यासाबरोबर तुकाराम महाराजांच्या चरित्रोपयोगी माहिती पाहूं लागलों. विपुल माहिती हातीं येत गेली. महाराजांच्या चरित्रावर थोडा निराळा प्रकाश पडूं लागला. वस्तुस्थितीला धरून असणाऱ्या तत्कालीन पुराव्यानें तुकोबांच्या तत्त्वज्ञानाला विशेष उज्ज्वल स्वरूप येईल ही भावना उत्कटतेनें वाढीस लागली. तुकोबांच्या व तत्कालीन इतर काव्य व संतवाङ्मयाचाहि अभ्यास करणें अत्यावश्यक होतें. त्यांचें चरित्र व अभंगवाणीविषयींच्या विद्वानांच्या व संतांच्या विचारसरणींचा अभ्यास करतांना माझें लक्ष तुकाराम महाराजांच्या या अभंगात्मक गीतानुवादाकडे गेलें. हा गीतानुवाद – स्वतंत्रपणें नसला तरी – इसवी सन १८४० पासून निरनिराळ्या आवृत्तींत दहा वेळां छापला गेला होता. या प्रकाशनांचा तुकोबांच्या चरित्रकारांनीं व लेखकांनीं मुळींच उल्लेख करूं नये याबद्दल आश्चर्य वाटलें. तुकोबांस संस्कृताचें ज्ञान होतें हें आग्रहानें दाखविण्याचे महत्त्वाचे व विचारपरिप्लुत असे प्रयत्न कितीतरी विद्वानांनीं व चरित्रकारांनीं केले आहेत. मग या अनुवादाकडे असें दुर्लक्ष कां ? हें दुर्लक्ष हेतुपुरःसर की नजरभूलीनें झालें ? इत्यादि प्रश्न या अनुवादाच्या अस्सलपणाबद्दल मन डळमळवीत होते. ग्रंथलेखक 'ज्ञानोबा तुकारामां'तील तुकारामच का ? हाहि एक शंकेचा विषय होत होता. उलट जों जों अभ्यास अधिकाधिक होत गेला तों तों उपलब्ध पुराव्यांची विपुलता महाराजांच्या चरित्रावर 'आन्हिक व सांस्कारिक' आचारधर्माचा चढविलेला मुलामा पुसून टाकीत चालली. या गीतानुवादाच्या लेखकाबद्दलची शंकाहि निरास पावूं लागली. माझें मन निरलसपणें या गीतानुवादाचा लेखक तुकोबाच असें ग्वाही देऊं लागलें. इतक्यांत चरित्रविषयक साधनसामग्री

मिळविण्याचें काम पुरें झालें. पुरें झालें याचा अर्थ संपलें नव्हे. हें काम अव्याहत चालणारें व शेवटास न जाणारें असतें. परंतु या कामास कोठेंतरी मर्यादा घालणें जरूर असतें. ती मर्यादा गेल्या डिसेंबरांत गांठली. तुकाराम महाराजांच्या चरित्रलेखनास सुरुवात केली. परंतु चरित्रापेक्षां हा गीतानुवाद तुकोबांच्या भक्तांस व महाराष्ट्रीय जनतेस ‘ त्रिशत सांवत्सरिक पुण्यतिथी’स सादर करणें अधिक औचित्यपूर्ण व आवश्यक वाटल्यावरून या अनुवादाची प्रथम फेरतपासणी करूं लागलों. कांहीं हस्तलिखित प्रतीहि आढळल्या. त्यामुळें हुरूप विशेषच वाढला. अनुवादाचा कर्ता ‘ ज्ञानबातुकारामां’तील तुकाराम अशी खात्री पटली. नंतर सात आठ महिन्यांच्या अवकाशांत जें कांहीं हातीं आलें त्याचें सार या प्रस्तावनेंत सादर केलें आहे. मात्र हा ग्रंथ ‘ त्रिशत सांवत्सरिक पुण्यतिथी’स निघूं शकला नाहीं. उलट तो आजवर रेंगाळत राहिला याबद्दल क्षमा असावी. मुद्रण-प्रकाशन सध्यां छापखाने-वाल्यांचेहि हातचें राहिलें नाहीं हें लक्षांत घेतल्यास याहून अधिक विलंब लागला नाहीं म्हणून समाधान होणें साहजिक आहे. असो.

या प्रस्तावनेंत ग्रथित केलेल्या पुराव्यांवरून माझ्याप्रमाणेंच सर्व जिज्ञासू वाचकांची या अनुवाद-लेखकाबद्दल उद्भूत होणारी शंका निरसन पावेल व त्यांतील तत्त्वज्ञानाचें वैशिष्ट्य अधिकाधिक पटत जाईल असा मला दृढ विश्वास वाटतो. तुकोबांच्या या अमोल पण उत्क्रांत तत्त्वप्रणालीचें विद्वज्जन मनन व चिंतन करून स्वागत करितीलच. तो त्यांच्या आवडीचा विषय आहे. भाविकांच्या आवडीनावडींचा प्रश्न मात्र त्यांच्या भक्तिभावावर अवलंबून असतो. त्यांना ऐतिहासिक सत्याचा व तत्त्वज्ञानांतील श्रेष्ठाश्रेष्ठतेच्या कसो-टीचा निवाळा करून घेण्याची तेवढीशी जरूर भासत नसते. परंपरेनें निर्माण झालेली व सहजसिद्ध रूढ असलेली भावना व दृढ झालेली श्रद्धा हीच त्यांची कसोटी. जर हा गीतानुवाद त्यांचा प्रेमभक्तिभाव अधिकाधिक जागृत करूं शकेल तर हा ‘ गीताशास्त्र ’ ग्रंथ या भाविक भक्तांचा एक

दैनंदिन पाठांतराचा विषय होईल व वारकरी सांप्रदायाचा हा ' तुकाराम-वेद ' त्यांच्या सांप्रदायिक वैशिष्टयाला व परंपरेला विशेष उज्ज्वल स्वरूप प्राप्त करून देईल असा भरंवसा वाटतो. तुकाराम महाराजांनीं आपल्या अनुवादांत म्हटल्याप्रमाणें त्यांना " श्रीकृष्णवचन प्राण हा वेदांचा। तुका म्हणे साचा अनुभव ॥ ३ ॥ " [ गी. २०७ ] हें पटेल; आणि " तुका विनवी वारंवार। माझ्या मतीं हर्ष फार। संतीं न करावा अव्हेर। प्राकृत भाषा म्हणून ॥ ३ ॥ " [ गी. २३१ ] या संतश्रेष्ठ तुकाराम महाराजांच्या विनवणीस सर्व भाविक भक्तवृंद प्रेमभावानें वंदतील अशी आशा आहे.

२. तुकारामकालीन महाराष्ट्र :—सोळाव्या शतकाच्या शेवटीं ७५ महाराष्ट्रांत मुसलमानी अंमल स्थिरस्थावर झाला होता. सुरुवातीस मुसलमान सरदारांनीं पुष्कळ क्रूर व भीषण कृत्यें केलीं. त्यामुळें जनतेंत त्यांच्या सत्तेची जशी दहशत वाटत होती तशीच त्यांनीं केलेल्या स्त्रीपुरुषार्भकांच्या अमानुष वधामुळें त्यांचेबद्दल कायमची चीडहि मूळ धरून राहिली होती. दक्षिणेंतील आणि विशेषतः महाराष्ट्रांतील लहान सहान खोपटीवजा देवळांचा विध्वंस करण्याची इस्लामियांनीं फारशी फिकीर केली नाहीं. महाराष्ट्रांत तीर्थाचीं ठिकाणें फारच थोडीं. त्यांत समृद्ध अथवा यात्रादि उत्पन्नाच्या दृष्टीनें महत्त्वाचीं अशीं नव्हतींच म्हटलें तरी चालेल. डोंगराळ मुलुखांतील लहान लहान खेड्यांच्या वस्तीमुळें आचारधर्माचें संगोपन करणें कठीण होतें. पुराणांतरीं प्रशंसलेलीं व्रतवैकल्यें उद्यापनांच्या सांगतेवर अवलंबून राहत. संस्कारहि विधियुक्त न झाले तर त्यांस मान्यता नसे. परंतु असे संस्कार किंवा व्रतवैकल्यें साधण्याइतकें सामान्य जनतेला मार्गदर्शन करण्याची तयारी भिक्षुक — त्यावेळीं त्यांस वेदांती म्हणून संबोधलें जात असे — वर्गांत नव्हती. त्यामुळें इस्लामी व हिंदु धर्माचें संघर्षण महाराष्ट्रांत विशेष जाणवलें नाहीं असें म्हटलें तरी चालेल. महाराष्ट्राला धार्मिक छळाची झळ भौगोलिक व तत्कालीन विशिष्ट अज्ञानजन्य परिस्थितीमुळें

भासली नसली तरी वर्णद्वेष वा जातिद्वेषांत निर्माण झालेली सामाजिक जाचणूक भोंवली होतीच. मुसलमानी अंमल स्थिरस्थावर होतांच इस्लामियांनीं आपल्या क्रूर व अमानुष कृत्यांना बराच आळा घातला. एकतर या डोंगराळ कठीण मुलुखांत सत्ता टिकवणें, किंबहुना जीवाची सुरक्षितता स्थानिक साहाय्याविना राखणें, तितकें सहज व सोपें नव्हतें. शिवाय हा डोंगरी मुलुख कोणाहि सत्ताकांक्षी सरदाराला स्वतंत्र सत्ता प्रस्थापित करण्यास फार उपकारक होता. बहामनी राज्याचीं छकलें पडून तीं स्वतंत्रपणें टिकूं शकलीं हा आदर्श दक्षिणेंतील आकांक्षी सरदारांना आपल्या धन्यांस गुंडाळून वैयक्तिक सत्ता गाजविण्यास नेहमींच प्रवृत्त करी. त्यामुळें व सोळाव्या शतकाचे शेवटीं त्यांच्यांतील वाढलेल्या आपापसांतील तेढीमुळें सर्वच सुलतानांना स्थानिक हिंदु सरदारदेशमुखांच्या साहाय्यावरच भिस्त ठेवावी लागली. त्याचा परिणाम मुसलमान सरदारांना आपला धार्मिक द्वेष शिथिल करण्यांत व सामाजिक छळाला आळा घालण्यांत झाला. दक्षिणेंतील सुलतानांत धार्मिक तेढीची भावना तितकीशी तीव्र राहिली नव्हती. अर्थात् दक्षिणेंतील स्थानिक नोकरवर्ग परकीय व परधर्मीय सत्तेखालीं राहावयास तितकासा नाखूषहि नव्हता. तुकारामकालीन कृष्णदास बैराग्यानें राघव चैतन्य व केशव चैतन्यांचीं चरित्रें लिहितांना सोळाव्या शतकांच्या माध्यान्ह कालांतील हिंदुभावनेचें यथोचित वर्णन केलें आहे. त्यांतील कांहीं उतारे* पुढें देतों :

"यवन वधावे एकोणएक । होवो न द्यावे अनेक । छळितातो हिंदूस अनेक–। मार्गी दुष्ट ॥ २९ ॥ हिंदू असे स्वधर्माचा । हिंदू असे शांत रक्ताचा । हिंदूच असे शांततेचा । धैर्य मेरु ॥३०॥ हिंदू पुरुषांसी कोर्वे । यवन वधिती अति मोर्दे । आणि वधिती भेदें । भोळे बापुडे ॥ ३१ ॥ त्यापाशीं न दुजा भाव । न येती तया कपट डाव । आणितां तयांसी

* अध्याय दुसरा, कृष्णदास बैरागीकृत " चैतन्य लीला"–अप्रकाशित.

न ये आव। कपट मार्गाचा ॥३२॥ देवावरी ठेवोनी विश्वास। टाकि-
ताती प्रत्येक निश्वास। हरिभजनाविण ध्यास। नाहींच जया ॥३३॥ ”
यानंतर स्त्रिया व पोरांच्या छळाचें वर्णन करून व हिंदूंचे रक्षणासाठीं देवांनी केलेल्या अवतारकार्यांची आठवण देऊन कृष्णदास लिहितात कीं, देवावतारी यांनीं

“ दीन हिंदूसी रक्षिलें। अंतीं पदीं गेले। वैकुंठीच्या ॥४०॥ ईंचि
जोड मना वाटे। कार्य असे बहु मोठें। परी आक्रमू जातां वाटे।
साधेल अंतीं ॥ ४१ ॥ ”

या एका विचारसरणीची दुसरी बाजूहि त्यांनीं चांगली दिली आहे :

“ऐसे पितयासी परोपरी। सांगतसे रंगनाथ परी। द्रव न ये अंतरीं।
तयाचिया ॥ ४३ ॥ यवन पुरवील धन। त्याविण कोण देईल अन्न।
वांचवावया हा प्राण। दुजें साधन नसे ॥४४॥ हिंदूसि रक्षणें हा धर्म।
परि हिंदूंचें नष्टकर्म। जो न जाणील हें वर्म। तो मूर्ख ठरे जगीं ॥४५॥
आपुल्या धर्माकारणें। देह ठेविल निःस्पृहपणें। परि संसारतत्त्व तेणें।
गमावलें ॥ ४६ ॥”

सतराव्या शतकाचे पूर्वार्धात हीच विचारसरणी शिवाजी-शहाजींत दिसून येते. सारांश, परकीय व परधर्मीय सत्तेची जाचणूक विशेष असह्य नव्हती. सुलभ दळणवळणाच्या अभावीं या डोंगराळ मुलुखांत लहान लहान खेडीं वसवून कृषीवर चरितार्थ चालवणें हाच मुख्य मार्ग. दुसरा मार्ग म्हणजे राजाची नोकरी. इ. स. १५६५ नंतर विजयनगरच्या साम्राज्याचा हिंदूंचा शेवटचा आसरा तुटला. त्यानंतर त्यांना दक्षिणी सलतनतांकडेच पाहणें भाग होतें. परकीय सत्ताधाऱ्यांनींहि हिंदू नोकरपेशा वर्गाशीं जुळतें घेऊन कर्तबगार हिंदूंना आपल्या विश्वासांत घेतलें. त्यामुळें हिंदूहि त्यांचेशीं निष्ठेनें वागूं लागले. कांहीं वर्षांच्या साहचर्यानें हिंदूंच्या मनांतील आक्रमकांच्या शौर्याबद्दलची व कर्तृत्वश्रेष्ठत्वाची भावना मावळूं लागली.

आपल्यांतील कर्तबगारीवर हिंदूंचा विश्वास दृढावूं लागला. सतरावे शतकाचे सुरुवातीस आपल्याच साहाय्यावर मुसलमानी सत्तेचा डोल अवलंबून आहे अशी समजूत दृढ होऊं लागली होती. परंतु या एका शतकाच्या कालांत हिंदूंच्या व्यवहारधर्मांत व आचारांत बरीच क्रांति घडून आली होती. नोकरपेशी पेहेराव राजकर्त्यांच्या वळणावर गेला होता. मातृभाषेचें स्थान बव्हंशीं हिंदुस्थानीनें पटकाविलें होतें. स्त्रीपुरुष हिंदू संतांनाहि आपलीं गीतें, पद्यें हिंदुस्थानीत रचण्याची आवश्यकता भासावी इतकी त्या वेळी हिंदुस्थानी भाषा प्रचारांत आली होती. सत्ताधाऱ्यांच्या मायभाषेंतून राज्यतंत्र चालणें क्रमप्राप्तच होतें. परंतु इतर व्यवहारांत व गांवकीच्या कारभारांतहि मायभाषेच्या शब्दसृष्टींत शेंकडा साठसत्तर शब्द परकीय योजले जात होते. राज्यकर्त्यांच्या धर्माबद्दल नेहमींच आदर बाळगावा लागतो. कारण त्यांची धार्मिक भावना दुखविणें म्हणजे त्यांना आत्यंतिक छळ करण्यास प्रवृत्त करणें होय. इस्लामी धर्मीयांची आपल्या धर्मावरील दृढ निष्ठा, दैनिकच काय पण प्रहराप्रहरानें करावयाचीं प्रार्थनादि कर्मे करण्यांतील त्यांची शिस्त व नियमितपणा पाहून त्यांच्या धर्माचें गुणश्रेष्ठत्व सामान्य जनतेंत दृढावलें. इस्लामी धर्माबद्दलचा आदर हिंदूंत अधिकाधिक बळावत होता. प्रार्थनामंदिरांत धार्मिक सेवा करणारा इस्लामी गृहस्थ मृत्यूनंतर किंवा तत्पूर्वीहि अवलिया होई. इस्लामी धर्मीय किंवा धर्मांतर करून मुसलमान झालेला हिंदू सरदारहि मृत्यूनंतर पीर होत असे. दर्ग्यादि स्मारकांनीं त्यांना अमरत्व मिळत असे. हें पाहून सामान्य हिंदूंची आपल्या आर्य सनातन धर्मावरील श्रद्धा उडूं लागली होती. वर्णाश्रमधर्मांतील संस्कारांची व आचारधर्मांतील आन्हिकादि क्रियाकर्मांची हेळसांड होऊं लागली होती. इस्लामी राज्यकर्त्यांनीं देवळें, हरिदास, बैरागी, संन्यासी, संतादि लोकांस गांवखर्चांतून मिळणारीं वर्षासनें, धर्मादाय वगैरे बंद केल्यानें व व्यक्तिशः अशा लोकांची पोषणादि जबाबदारी घेण्याची रूढी व ताकदहि नसल्यानें

त्यांच्याबद्दलचा आदर कमी कमी होत चालला होता. जोशीजोसपणाच्या वृत्ती नाहींशा केल्यानें संस्कारादि कार्ये व व्रतवैकल्यादि कर्मे होईनाशीं झालीं व जनतेंतील धार्मिक बंधनें शिथिल होत चाललीं. इतकेंच नव्हे तर जी सामाजिक व धार्मिक उन्नतावस्था स्वधर्मांत राहून दुःसाध्य ती धर्मांतरानें सहज साध्य असल्याची समजूत दिवसेंदिवस दृढावत चालली होती. त्यामुळें हिंदु धर्माच्या ऱ्हासास सुरुवात झाली होती. इस्लामियांच्या सान्निध्यानें सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत हिंदुसमाज कसा परिवर्तन पावत होता त्याचें शब्दचित्र तुकाराम महाराजांच्या पुढील उक्तींत दिसेल.

" आचारभ्रष्ट होती लोक कलीं। ...॥ १ ॥ वर्णधर्म कोणी न ...ळी विटाळ। ...॥३॥ वेदाचे पाठक सेवितील मद्य। ... ॥ ४ ॥ [५०३]. सांडिले आचार। द्विज चाहाड झाले चोर ॥ ३ ॥ टिळे लपवती पाताडीं। लेती विजारा कातडीं ॥ ४ ॥ बैसोनियां तक्तां। न्यायेविण पिडिती लोकां ॥ ५ ॥ मुदबख लिहिणें। तेल तूप साबण केणें ॥६॥ नीचाचे चाकर। चुकलिया खाती मार ॥ ७ ॥ राजा प्रजा पीडी। क्षेत्रीं दुश्चिताची तोडी ॥ ८ ॥ वैश्य शूद्रादिक। हें तो सहज नीच लोक ॥ ९ ॥ अवघे बाह्य रंग। आंत हिरवे वरी सोंग ॥ १० ॥ [१३२]. खिस्तीचा उर्दाम उदीमांत हीन। करिती ब्राह्मण कलियुगीं ॥१॥ बेवसाव करितां पर्वत मांगासी। ते पैं विटाळासी न मानिती ॥ २ ॥ [३०३०]. थोर या युगाचें आश्चर्य। ब्रह्मकर्म उत्तम सार। सांडूनियां द्विजवर। दावलपीर स्मरताती ॥ ३ ॥......कैसें झालें नष्ट वर्तमान। एकादशीस खाती अन्न। विडे घेऊनि ब्राह्मण। अविंदवाणी वदताती ॥ १४ ॥...कैसे विनाशकाळाचें कौतुक। राजे झाले प्रजांचे अंतक। पितेपुत्र सहोदर एकाएक। शत्रुघाते वर्तती ॥ २७ ॥ [३६९२]. ऐसें कलियुगाच्यामुळें। झालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥ सांडूनियां राम राम। ब्राह्मण म्हणति दोम दोम ॥ २ ॥ [ ३४३५ ]. संता नाहीं

मान। देव मानी मुसलमान ॥ १ ॥ ऐसे पोटाचे मारिले। देवा आशा विटंबिलें ॥ २ ॥ घाली लोटांगण। वंदी नीचांचे चरण ॥ ३ ॥ [२४१८]. ऐका कलींचें हें फळ। पुढें होईल ब्रह्मघोळ ॥ १ ॥ चारी वर्ण अठरा याती। भोजन करिती एके पंक्ती ॥२॥ [३४३६]. आचार सांडिती द्विजलोक ॥१॥ देव म्हणवुनी न येती देउळा ॥४॥ [६५६]. ऐसे संत झाले कलीं। तोंडी तमाखूची नळी ॥१॥ स्नानसंध्या बुडविली। पुढें भांग ओढवली ॥२॥ भांग भुर्का हें साधन। पचनीं पडे मद्यपान ॥३॥ [२०७८]. कैसी करूं आतां सांग तुझी सेवा। शब्दज्ञानें देवा नाश केला ॥१॥ आतां तुझें वर्म न कळे अनंता। तुज न सगतां बुडूं पाहे ॥२॥ संध्या स्नान केली आचारासी नासी। काय तयापासी म्हणती एक ॥३॥ बुडविली भक्ति म्हणती पाषाण। पिंडाचें पाळण स्थापूनियां ॥ ४ ॥ न करावी कथा म्हणती एकादशीं। भजनाची निसी मांडियेली॥५॥ न जावें देऊळा म्हणती देव घरीं। बुडविलें यापरी तुका म्हणे ॥६॥ [३०४१]."

या उताऱ्यांवरून तत्कालीन परिस्थितीचा बोध होण्यासारखा आहे. इतर तत्कालीन वाङ्मयांतील उतारे घेऊन आणखीहि भडक चित्र रंगविणें सोपें आहे. परंतु मुख्य उद्देश परिस्थितीचें दिग्दर्शन करण्याचा असून त्यापरिस्थितीच्या बऱ्यावाईटपणावर भावना चेतविण्याचा नाहीं.

इस्लामी धर्माच्या तत्त्वज्ञानाचा फारसा प्रसार किंवा प्रचार झाला होता असें नाहीं. मात्र त्या धर्मातील तांत्रिकें व इस्लामीयांस मिळणारी लौकिक गती यांचाच परिणाम महाराष्ट्रावर विशेष झाला होता. पश्चिम किनाऱ्याला पोर्तुगीज सत्ताहि शंभर वर्षे जीव धरून राहिली होती. या कालांत पोर्तुगीजांनीं खिस्ती धर्माचा प्रचारहि त्यांच्या तत्त्वज्ञानांतील श्रेष्ठ विचारसरणीच्या आधारानें व धर्मांतरित करण्याच्या विशिष्ट पद्धतीनें केला व तो अधिक जोरानें करण्यासाठीं नवीन नवीन मार्ग चोखाळण्याचे त्यांचे प्रयत्न चालू होते. अरब लोकांचाहि व्यवहार व आचार दृष्टीसमोर येत होतेच.

बौद्ध धर्माचा अवशेष फारच थोडा राहिला होता. वेदप्रामाण्य मानणाऱ्या व शिव, विष्णु, राम, कृष्ण, विठ्ठल व इतर देव, पौराणिक देवता, ग्रामदेवता व वृक्षपशुपक्षादि देवतांची उपासना करणाऱ्या उपासकांचे निरनिराळे गट होऊन राहिले होते. या उपासनार्थ तांत्रिक वैशिष्ट्यानें वेगवेगळे पंथ व मार्ग रूढ झाले होते. त्यांच्या बरेवाईटपणाबद्दल अथवा गुणधर्मविशेषांबद्दल तुकाराम महाराजांच्या गाथेंत बरीच चर्चा आढळते. त्यांतील जे कांहीं मुख्य मुख्य पंथ व मार्ग रूढ होते त्यांचेवरील तुकोबांची भेदक टीका त्यांच्या विशिष्ट स्वरूपांचें चित्र रेखाटते : ब्रह्मज्ञानी–४७५; विद्याभिमानी पंडित —१०२, १५४, ४९२, १०२५, १०२७, ३१२२, ३२०४, ३४६९; ब्राह्मण–३०, ७०६, ७०७, ७८०, १०५५; धर्मठक–७३, २२९७, ३१२९; शास्त्रज्ञ–४७४, २२५३; पाखंडी–८९२, २९४१; कर्मठ–२०७६; भिक्षुक–३२२८; कथेकरी–७४८, १७२६, २१८१, २७०१, ३००२; पुराणिक–९१, ४०३, ८८९, ३२७५; संन्याशी–३०४३; गुरु–११५, १४९, १६०, १६४, १८२, २५५, ७०८; संत–२२८, ९१८, २०७८, ३०३९, ३०४९, ३१३४; कवि–४०५, ७५०, ८४३, ९१६, २२१२; साधक–३८६, ९४८; जपी–२७४१; तापशी–२०१५; जोगी–२०७५; गोसावी–२०७७, ३१५६; बैरागी–८५७, २९८२, ३०४४; खिस्ती–३०३०, ३०३१; कर्मी–११२५; भिक्षेकरी–८५८; नाथपंथी–कानफाटे-. ३०४५; सिद्ध–३०४९; देवऋषी–३९२; भगत–२५२४, ३२३५, ३९६७; जंगम–३०४८; मानभाव–३०४७; शाक्त–२, ३, ४, ६, ८, ९, ४१, ३४३१, ३४३७; मौनी–१४०४; मलंगफकीर–३०४६; दावलभक्त–३०४७, ३४३५; अनार्यभक्त–३४४०; इत्यादि.

सारांश, वर्णाश्रमधर्माचें योग्य प्रकारें रक्षण केलें जात नव्हतें. जनतेस मार्गदर्शन करून सामाजिक व धार्मिक उन्नतावस्थेप्रत नेण्याऐवजीं सर्वांसच

शूद्रावस्थेला पोहोंचविण्याचे प्रयत्न चालू होते. परधर्मीय धर्मव्यवस्था सामान्य मानवाला आकर्षक भासूं लागली होती. त्यामुळें हिंदु किंवा सनातनीय तत्त्वज्ञानाचें महत्त्व व त्यावरील श्रद्धा नाहींशी होत चालली होती. समाज अधिकाधिक विस्काळित होत होता. धार्मिक व नैतिक बंधनें बरीचशीं शिथिल झालीं होतीं. जाती जरी अद्यापिहि नाममात्र रूढ होत्या तरी अनार्य, कनिष्ठ प्रतीचे व भुताखेतांना देवदेवता मानणारे आचारधर्म रूढ होत होते. अशा परिस्थितींत सतरावे शतकाचे प्रारंभीं वर्णाश्रमधर्मातील पारतंत्र्याला कंटाळून आर्यधर्माविषयीं अत्यंत उद्विग्न झालेली हिंदु जनता धार्मिक पुनरुज्जीवनाकडे मोठ्या आतुरतेनें लक्ष लावून बसली होती.

२. जातीय व आचारधर्मांतील विषमता व परावलंबित्वः—मुसलमानी सत्तेमुळें हिंदु जातींतील आचारधर्माचा लोप झाला होता. वर्णाश्रमधर्मातील " कलियुगीं ब्राह्मण व शूद्र असे दोनच वर्ण अथवा जाती " या नवीन प्रवादामुळें ब्राह्मणांशिवाय सर्व वेदप्रामाण्य मानणारा द्विजवर्ग शूद्र समजला जाऊं लागला. त्यांना संस्कारांचा व विशिष्ट वेशभूषणांचा अधिकार राहिला नाहीं. सोळाव्या शतकांत बुद्ध-भिक्षु वगैरे शूद्र, जवळजवळ अस्पृश्य मानले जात. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य अशा द्विज जातींनाच मोकळे असणारे दसनाम गोसावी आदि कांहीं नाथपंथ शूद्रच होऊन राहिले होते. वेदोक्त पुराणोक्त प्रयोगांची भांडवृत्ति धुडगुस घालीत होती. परंतु त्याच वेळीं वेदोक्त अगर पुराणोक्त प्रयोग सांगणाऱ्या वेदांती जोश्यांचीच वाण पडल्यानें कित्येक ब्राह्मण व द्विज कुटुंबांतून सशास्त्र संस्कार घडत नसत. कित्येकांना कांहींतरी थातुमातु प्रयोग करणाऱ्या भिक्षुकांचे पाय धरावे लागत. शिवपूजा ब्राह्मण किंवा गुरवाकरवींच झाली पाहिजे; गुरूपदेश ब्राह्मणांकरवींच करून घेणें प्राप्त; व्रतवैकल्यांची सांगता भिक्षुकांचेच हातून झाली पाहिजे; अशा तऱ्हेची सर्वच धार्मिक व पारमार्थिक बाबतींत परावलंबिता, आणि तीहि द्वेषाग्निपूर्ण अशा भटभिक्षुकांच्या हातीं राहिली होती. त्यांतूनहि हा ब्राह्मण

शूद्र निर्णय जर गुणकर्मविभागावर आधारला गेला असता तर त्यांत विशेष उद्वेकजनक कांहीं नव्हतें. परंतु हा वर्ण- अथवा जातिनिर्णय केवळ जन्मसिद्धतेवर राहिल्यानें साहजिकच तो मानहानीपर व द्वेष वाढविणारा वाटला. विशेषतः द्विज जातींतील कर्तृत्ववान माणसांना तो जाचक वाटला. वर्णाश्रमधर्मात स्वकर्तृत्वानें उच्च वर्ण प्राप्त करून घेतल्याचीं पूर्वीचीं उदाहरणें असतांना, नुसता हा आत्मोन्नतीचा मार्ग बंद केला इतकेंच नाहीं तर सर्व जातींचें द्विजत्व हिरावून घेतलें व त्यांना शूद्र बनविण्याचे प्रयत्न एकसारखे होत राहिले. या सर्वांचा परिणाम या द्विजजातींतील माणसें निरानिराळे पंथ स्वीकारून आपापली पारमार्थिक क्षेत्रांतील जिज्ञासा भागवून घेऊं लागले. कमी दर्जाची कुटुंबें अनार्य देवतांच्या पूजनांत गर्क होऊन त्या देवतांचा आपल्या ऐहिक कार्यांकडे उपयोग करूं लागलीं. भाषेचें सामर्थ्य जसें लिहिणाराच्या अगर बोलणाराच्या कौशल्यावर कमी अधिक ठरतें तसेंच मंत्रांचेंहि सामर्थ्य त्यांच्या विशिष्ट उच्चारांवर अगर स्वरशक्तीवर अवलंबून असतें, असा सर्वत्र दृढ समज होता. परंतु सर्वच मंत्र संस्कृतांत किंवा 'गीर्वाणवाणीत.' त्याशिवाय पूजाअर्चा नाहींच. ते म्हणण्याचा अधिकार इतरांना नाहींच. शिवाय मंत्रांचा अर्थ समजण्याची किंवा म्हणण्याची पात्रता तत्कालीन प्रयोग चालविणाऱ्या 'वेदांतींत'हि नव्हती, मग सामान्य द्विजांकडून तशी अपेक्षा कशी करावयाची? अर्थात् अशा अज्ञानपूर्ण व परावलंबी क्रिया-कर्माचरणांत समाधान वाटणें अशक्यच होतें. त्यांतून प्रयोग चालविणारा हा भिक्षुकवर्गहि नामशेष होत चालला होता. त्यामुळें धर्माचीं ओबडधोबडपणें कां होईना पण संस्कारादि कर्में आचरून आचारधर्माची आठवण ठेवण्यास मदत करणारी ही घटना नष्ट झाली व मार्गदर्शनाभावी संस्कारादि कर्तव्यें व पूजनार्चनादि कर्मेंहि थांबलीं.

'कलींत ब्राह्मण शूद्र दोनच वर्ण' या तत्त्वानें हिंदु समाजांत मोठीच क्रांति घडून आली. सर्वांनाच आपल्या हीनपणाची जाणीव तीव्रतर भासूं

लागली. इस्लामी धर्मातील आचारधर्माचें दृश्य समोर होतें. त्यामुळें या नवीन तत्त्वाच्या युक्तायुक्ततेबद्दल व विशेषतः फोलकटपणाबद्दल कर्त्या समजूतदार व्यक्तीहि या निर्णयाचा तिरस्कारानें, खेदानें व हताश वृत्तीनें विचार करूं लागल्या. सूज्ञ व दूरदर्शी ब्राह्मणश्रेष्ठ व्यक्तींनीं या तत्त्वाविरुद्ध बंडावा केला. परंतु अशा या श्रेष्ठ विभूतींना स्वतंत्र पंथ अगर मार्ग प्रस्थापित करण्याशिवाय अन्य मार्ग नव्हता. हिंदु समाजांतील या निकृष्ट भिक्षुकी धर्माला मूठमाती देणें त्यांना अशक्य होतें. परधर्मीय सत्तेखालीं धर्मास वाली कोण होणार! संतवचनें पाहिलीं तर परमार्थाकडे ओढा असणाऱ्या विचारवंत माणसांची कुचंबणा झाल्यानें त्यांचा विचारप्रवाह कसा वाहत होता हें सहज लक्षात येईल. कांहीं उतारे* येथें देतों:—

" भली केली हीन याती । नाहीं वाढली महंती ॥ १ ॥ "
" यातिकूळ संबंध नाहीं ॥ "
" सांवता म्हणे मी हीन याती । कृपा करावी श्रीपती ॥ "

—सांवता माळी

" यातिहीन मज म्हणती देवा । नेणें करूं तुमची सेवा ॥ १ ॥ "
" हीन याती माझी देवा । कैसी घडे तुझी सेवा ॥ १ ॥ मज दूर दूर हो म्हणती । तुज भेटूं कवण्या रितीं ॥ २ ॥ "

—चोखा मेळा

" आज्ञा वंदूनियां शिरीं । जन्मलों न्हाव्हीयाचे उदरीं ॥ "
" चौवर्ण देऊन हात । सेना राहिला निवांत ॥ "
" दिवस माध्यान्हीं आला । सेना वैकुंठास गेला ॥ "

---

* पृष्ठ ९४, १०६, १३२, १६३, १७५ व १९२, संतकाव्य समालोचन खंड १ ला, लेखक गं. ब. ग्रामोपाध्ये, प्रकाशक चित्रशाळा प्रेस, पुणें, १९३९; व पृ. १४१, १४३, १४९, सर्व संग्रहगाथा, प्र. रावजी श्रीधर गोंधळेकर, आ. ३ री, पुणें १९०८.

" नाहीं माझा अधिकार । यातिहीन मी पामर ॥ "

" शरण शरण ज्ञानदेवा ।...मी तो अज्ञान यातिहीन ॥ "

—सेना न्हावी

" दीन पतीत अन्यायी । शरण आलें विठाबाई ॥ १ ॥ मीं तो आहें यातीहीन । न कळे कांहीं आचरण ॥ २ ॥ मज अधिकार नाहीं । भेटी देई विठाबाई ॥ ३ ॥ ठाव देई चरणापाशीं । तुझी कान्होपात्रा दासी ॥ ४ ॥ " —कान्होपात्रा

बहिणाबाई ही तुकाराम महाराजांना समकालीन. ती धर्म जाणणाऱ्या व धार्मिक क्रियाकर्मे चालविणाऱ्या 'वेदांत्या'ची पत्नी. तिनेंहि जे उद्गार* काढले आहेत त्यांवरून अखिल स्त्रीसमाज किती असहाय परिस्थितींत नांदत होता याचें चित्र दृष्टीपुढें येईल. तिनें आपल्या पतीबद्दलची जी माहिती दिली आहे ती तिच्या उद्गारांमागची भूमिका विशेष स्पष्ट करून देईल. ती आपल्या पतीबद्दल लिहिते :

" वैदिक व्यवहार स्वामी उदरार्थ । करीतसे तेथें देव कैंचा ॥१ ॥ वेद पाठ कांहीं नावडेची भक्ती । पराधीन युक्ति न चले माझी ॥ २ ॥ [ ५९ ]. नामाचा विटाळ आमुचिये घरीं । गीताशास्त्र वैरी कुळीं आम्हां ॥ १ ॥ [६५]."

आपल्या म्हणजे अखिल स्त्रीसमाजाच्या पारमार्थातील हतभाग्य व असहाय परिस्थितीबद्दल त्या लिहितात :

" स्त्रीयेचें शरीर पराधीन देह । ना चाले उपाव विरक्तीचा ॥ १ ॥ [६०].विरक्तीचें मूळ प्रपंचाचा त्याग । पहातांचि एक गृहशैल ॥१॥भ्रतार त्यागितां वेदासी विरुद्ध । परमार्थ तो शुद्ध सांपडेना ॥ ३ ॥ [६२]. वेद हांका देती पुराणें गर्जती । स्त्रियेच्या संगतीं हित नोहे ॥ १ ॥

* पृष्ठ १७ व १८, " संत बहिणाबाईचा गाथा " संपादक विश्वनाथ नारायण कोल्हारकर, आवृत्ति १ ली, शके १८४८ [ १९२६ इसवी ], पुणें.

मी तों सहज स्त्रियेचाच देह । परमार्थाची सोय आतां कैंची ॥२॥ बहिणी म्हणे ऐसा स्त्रीदेह घातकी। परमार्थ या लोकीं केवीं साधे ॥४॥ [६३]. काय पाप केलें पूर्वील ये जन्मीं । आतां पुरुषोत्तमीं अंतरलें ॥ १ ॥ लाधले नरदेह स्त्रियेचेनी रूपें । असंख्यात पापें फळा आलीं ॥ २ ॥ अधिकार नाहीं वेदार्थ श्रवणीं । गायत्री ब्राम्हणीं गुप्त केली ॥३॥ करूं नये मुखें प्रणवाचा उच्चार । बीजाचा संचार ऐकों नये ॥४॥ [६४]. पडो देह परी राहातसे हेत । पाहावा अनंत ज्ञानदृष्टि ॥ ५ ॥ करावी हे भक्ति स्वधर्म-आचारें। तुज ज्ञानद्वारें ओळखावें ॥६॥ [६७]."

आतां या धार्मिक व पारमार्थिक जाचणुकेची जाणीव करून देणारे तुकाराम महाराजांचेच थोडेसे उद्गार उद्धृत करतों :

"यातिं शूद्र वंश केला वेवसाव । ... ॥ १ ॥ निषेधाचा कांहीं पडिला आघात। तेणें मध्यें चित्त दुखविलें ॥ १६ ॥ [ ३९३९]. अधम मी यातीहीन । झांकूनी लोचन। दिवस तेरा राहिलों ॥२॥ [३५२३]. अधिकार जात वर्णधर्मयात । ठाव नाहीं सत्यअसत्याशीं ॥३॥ [३१७१]. काय याती शुद्ध आहे कूळ कर्म। तेणें पडे वर्म तुझे ठायीं ॥३॥ [३३००]. मीं तो सर्वभावें अनधिकारी। होईल कैसी परी नेणो देवा ॥१॥ पुराणींचा अर्थ आणितां मनास । होय कासावीस जीव माझा ॥ २ ॥ [३१९]. काय जाणो वेद । आम्ही आगमाचे भेद ॥१॥ कोठें अधिकार । रानट विचार ॥ ३ ॥ [ १४४४ ]. कोठें नाहीं अधिकार । गेले नर वांया ते ॥ १ ॥ [९००]. नाहीं अधिकार । कांहीं घोकाया अक्षर ॥ ३ ॥ [३४०]. यातिहीन मतीहीन कर्महीन माझें । सर्व लज्जा सांडोनियां शरण आलों तुज ॥१॥ [१९८१]. माझा कां हो करूं नये अंगिकार ॥२॥ यातिहीन नये ऐकों जया वेद । तया दिलें पद वैकुंठीचें ॥ ३ ॥ [१२२९]. शूद्रवंशीं जन्मलों। म्हणोनि दंभें मोकलिलों ॥१॥ अरे तूंचि माझा आतां । मायबाप पंढरिनाथा ॥ २ ॥ घोकाया अक्षर । मज

नाहीं अधिकार ।। ३ ।। सर्व भावें दीन । तुका म्हणे यातिहीन ।।४।। [१९९४]. उभी कामधेनु मांगाचे अंगणीं । तिसी काय ब्राह्मणीं वंदू नये ।।२।। यातिहीन झाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानूं नये ।।४।। [३१५७]. विष्णुमय खरें जग । येथें लागतसे लाग । वांटिले विभाग । वर्णधर्म हा खेळ ।।३।। अवघी एकाचीच वीण । तेथें कैंचें भिन्नाभिन्न । वेदपुरुष नारायण । तेणें केला निवाडा ।। ४ ।। [२०८]. कांस घालोनि बळकट । झालों काळिकाळावरी नीट । केली पायवाट । भवसिंधूवरूनि ।। १ ।। या रे या रे लहान थोर । याति भलते नारी नर । करावा विचार । नलगे चिंता कोणासी ।। २ ।। कामी गुंतले रिकामे । जपी तपी येथें जमे । लाविले दमामे । मुक्ति आणि मुमुक्षा ।। ३ ।। एकंदर शिका । पाठविलें इहलोकां । आलों म्हणे तुका । मी नामाचा धारक ।।४।। [२२१]. नये माझा तुम्हां होऊं शब्दस्पर्श । विप्रवृंदा तुम्हां ब्राह्मणांसी ।। १ ।। म्हणोनियां तुम्हां करितों विनंती । चावें शेष हातीं उरलें तें ।।२।। वेदीं कर्म जैसें बोलिलें विहित । करावी ते नीत विचारूनी ।। ३ ।। तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ।। ४ ।। [ २९७६ ]."

तुकाराम महाराजांची याति वैश्य वाणी अर्थात् द्विज. परंतु कलीयुगीं दोनच वर्ण व त्यांचें घराणें गोसावी. त्यामुळें नुसते हीन याति नव्हे तर यातीहीन अशा दोन मनस्तापांतील हे उद्गार आहेत. परंतु गुरूपदेशानंतर ते या जातिधर्मांची थट्टाच करीत. गाथेंतील बहुतेक सर्व अभंग या वृत्ती-नंतरचे असल्यानें त्यांच्या लेखांत उपहासच अधिक आढळतो. हिणव-ण्याच्या दृष्टीनें लिहिलीं गेलेलीं कांहीं वचनें पुढें देतों :

उदकीं कालवी शेण मल मूत्र । तो होय पवित्र कासयानें ।। १ ।। [१९१९]. वैष्णव तो —।।१।। तुका म्हणे याती । हो कां तयाची भलती ।। ४ ।। [२१४]. उत्तम त्या याती । देवा शरण अनन्यगती ।। १ ।।

[२१०६]. जपतो हरिनाम बीज। तोचि वर्णामाजी द्विज ॥ २ ॥ [१००२]. ब्राह्मण तो याती अंत्यज असतां। मानावा तत्त्वतां निश्चयेसीं ॥ १ ॥ [७०७]. याति वर्ण श्रेष्ठ। परि तो चांडाळ पापिष्ट ॥ ३ ॥ [२०३]. अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड। काय त्यासी रांड प्रसवली ॥१॥ वैष्णव चांभार धन्य त्याची माता। शुद्ध उभयतां कुळ याती ॥२॥ ऐसा हा निवाडा झालासे पुराणीं। नोहे माझी वाणी पदरींची ॥३॥ [७८०]. तुका म्हणे तुम्ही [चिंचवडचे देव] देवा द्विज वंद्य। मी तों काय निंद्य हीन याती ॥ ३ ॥ [३३३५]. तुका म्हणे तुम्ही [चिंचवडकर देव] आम्हां जी वेगळे। केलेति निराळे द्विज देवें ॥४॥ [३३३२]. बरा देवा कुणबी केलों। नाहीं तरी दंभें असतों मेलों ॥ १ ॥ [१७८]. न विचारी याति कुळ नांव। लागावया पाव संताचें ॥ २ ॥ [४१००]. न चळे हा मंत्र न म्हणों याती कूळ। न लगे काळ वेळ विचारावी ॥४॥ [९९१]. शुद्ध यातिकुळवर्णा चाड नाहीं। करी भलते ठायीं दास तुझा ॥ २ ॥ [११५४]. गुण दोष याती न विचारितां कांहीं। ठाव दिला पायीं आपुलिया ॥ २ ॥ [३१७५]. याति कूळ येथें असे अप्रमाण। गुणांचें कारण असे अंगीं ॥ २ ॥ [१९३]. नरनारी याति हो कोणी भलती। भावें एक प्रीती नारायणा ॥४॥ [११३३]. याति मती हीन रूप लीन दीन। आणीक अवगुण जाणोनियां ॥१॥ केला त्या विठ्ठलें माझा अंगिकार। ऐसा हा विचार जाणोनियां ॥२॥ [६९१]. वेद अनंत बोलिला। अर्थ इतुकाचि साधिला ॥ १ ॥ विठोबासी शरण जावें। निजनिष्ठें नाम गावें ॥ २ ॥ सकळ शास्त्रांचा विचार। अंतीं इतुकाच निर्धार ॥३॥ अठरा पुराणीं सिद्धांत। तुका म्हणे हाचि हेत ॥ ४ ॥ [३१२८]. अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें। तयाचीं पुराणें भाट झालीं ॥४॥ यातायाती धर्म नाहीं विष्णुदासा। निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ११ ॥ तुका म्हणे

तुम्ही विचारावे ग्रंथ। तारिले पतीत नेणों किती ।।१२।। [३२४१ ]. सकळांसी येथें आहे अधिकार। कलियुगीं उद्धार हरिच्या नामें ।।४।। तुका म्हणे नामापाशीं चारी मुक्ति। ऐसे बहुतां ग्रंथीं बोलियलें ।।५।। [२०९५]. सकळ शास्त्रांचें सार। हे वेदांचें गव्हार। पाहातां विचार। हाचि करिती पुराणें ।। ४ ।। ब्राह्मण क्षेत्रिय वैश्य शूद्र। चांडाळाही अधिकार। बाळें नारी नर। आदिकरोनि वेश्याही ।।५।। [६६९]. हीन माझी याती। वरी स्तुति केली संतीं ।। १ ।। [२०७२]. काय माझी याति नेणां हा विचार ।। ३ ।। [५१८]. बोलिलों जैसें बोलविलें देवें। माझें तुम्हां ठावें जाति कूल ।। १ ।। [ १३२४ ]. यातिहीन मज काय तो अभिमान। मानी तुज जन नारायणा ।।१।। [ ६४० ]. वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा। येरांनीं वाहावा भार माथां ।। १ ।। [१५४९]. असा जी सोंवळे। आम्हां तैसेचि निराळे ।। १ ।। आम्हीं न यो तुमच्या वाटा। काय लटिकाचि ताठा ।। २ ।। [ २३४१ ]. शास्त्रज्ञ पंडित नव्हे मी वाचक। यातिशुद्ध एक ठाव नाहीं ।। २ ।। कलियुगीं बहू कुशल हे जन। छळितील गुण तुझे गातां ।।३।। [५२२]. आतां मी सर्वथा नव्हे गा दुर्बळ। यातिहीन कूळ दैन्यवाणा ।।१।। माय रखुमाई पांडुरंग पिता। शुद्ध उभयतां पक्ष दोन्ही ।।२।। [१०९१]."

यातिधर्मातील हें हीनत्व पारमार्थिक क्षेत्रांत अवमानतांना यातिधंदा अगर रोजगाराची किंवा त्यांच्या अर्थविषयक बाबींपासून अलिप्त राहण्याची तुकाराम महाराज कशी काळजी घेत हे पुढील अभंगावरून दिसून येईल.

"द्रव्य घेऊनियां कथा जरी करी। तरी भंगो हरि देह माझा ।।१।। माझी कथा करा ऐसें म्हणें कोणा। तरी नारायणा जिव्हा झडो ।। २ ।। साह्य तूं जालासी काय उणें तूपें। आणीक भूतांपें काय मागों ।। ३ ।। तुका म्हणे सर्व सिद्धि तुझे पायीं। तूं माझा गोसावी पांडुरंगा ।। ४ ।। [ ३१३८ ]."

तुकाराम महाराजांनीं पारमार्थिक क्षेत्रांतील जातीय किंवा आचार-धर्मांतील ही विषमता दूर करण्यासाठीं स्वानुभवानें मार्गदर्शन केल्यानें नंतरच्या कान्होबादि साधुसंतांस जातीहीनतेची जाणीव भासली नाहीं. त्यांनीं आपली पारमार्थिक बाजू वर्णाश्रमधर्मापासून अलिप्त राखली. छत्रपति थोरले शिवाजी महाराजांनीं गागाभट्ट, अनंतभट्टासारख्या थोर व अधिकारी शास्त्र्यांच्या साहाय्यानें जातीजातींतील तंटे अगर ग्रामण्यें मिटविल्यानें व आचारधर्माच्या संगोपनार्थ पुन्हां जोसजोसीपणाच्या वृत्ती चालविल्यानें 'ब्राह्मणशूद्र' वाद बराचसा कमी झाला व सर्व द्विज याती पुन्हा आपापल्या संस्कारांचा उपभोग घेऊं लागल्या.* छत्रपती शिवाजी महाराजांनीं जशी महाराष्ट्राची सामाजिक घडी पुन्हां बसविली तशीच कालगतीनें पारमार्थिक क्षेत्रातील पारतंत्र्यापासून अखिल जनतेची मुक्तता तुकाराम महाराजांनीं केली व तत्त्वज्ञानाची योग्य दिशा दाखवून आपल्या सरळ, स्पष्ट व प्रासादिक वाणीनें, राजकृपेच्या अभावीहि, सर्वांना सारखेंच परमार्थसाधन प्राप्त करून दिलें.

४. तुकोबा :— संतशिरोमणी तुकोबांचा जन्म इ. स. १६०८ मध्यें झाला. निश्चित जन्मतिथि ठरविण्यास समकालीन पुरावा उपलब्ध नाही. तुकोबांच्या मातेचें नांव कनकाई व पित्याचें नांव बोल्होबा किंवा बाळोबा बावा होतें. कनकाई ही लोहगांवच्या मोझे घराण्यांतील होती. इसवी सनाच्या अठराव्या शतकांत तयार केलेली एक वंशवेल उपलब्ध आहे. त्या वंशवेलीवरून तुकोबांच्या सर्व पूर्वजांचा बोध होत नाहीं. फक्त विश्वंभराच्या बोल्होबापर्यंतच्या एकशाखीय वडील मुलांचेच त्यांत उल्लेख आहेत. या वंशवेलीप्रमाणें बोल्होबांचे वडील कान्होबा, आजे शंकरबावा

* Maharashtra of the Shivashahi Period, (Seventeenth Century) by V. S. Bendrey, Phœnix Publication, Bombay, 1946.

व पणजे पदाजी असावेत. पदाजीच्या बापाचें नांव विठोबा व आजाचें हरि असें होतें. हरीस मुकुंद नांवाचा एक भाऊ होता. हीं दोन्ही मुलें विश्वंभरास अमाईपासून झालीं. तुकारामांस वडील सावजी व धाकटे कान्होजी असे दोन बंधू होते. शिवाय बहिणीहि होत्या. तुकाराम महाराजांची पहिली बायको रखमाई हिचेपासून संताजी नांवाचा मुलगा झाला. परंतु हीं मायलेकें इ. स. १६३०च्या दुष्काळांत वारलीं. तुकारामांची दुसरी बायको अवलाई ऊर्फ जिजाई ही पुण्याच्या गुळवे घराण्यांतील होती. हिला महादेव, विठोबा व नारायण अशीं तीन मुलें व काशी, भागिरथी व गंगा अशा तीन मुली मिळून सहा अपत्यें इ. स. १६३७ ते १६५०चे अवधींत झाली. यांतील नारायणबावा हे ब्रह्मचारीच राहिले. त्यांची पुढें संतांत गणना झाली. तुकोबांच्या तिन्ही मुली मोझे, गाडे व जांभोलीकर घराण्यांत दिल्या होत्या. हीं सर्व कुटुंबें चांगलीं सुखवस्तु होतीं. लोहगांवचे मोझे हे तुकोबांचें मातुलगृह व तेथील ते शेटेमहाजन होते. गाडे हे येलवाडीचे शेटेपाटिल होते. जांभोलीकर घराण्यांतहि विपुल शेत जमीन होती. या तीन मुलींतील गाडे घराण्यांत दिलेल्या भागिरथीचें एक पद उपलब्ध आहे. तुकोबांचा वडील भाऊ सावजी यानें दुष्काळांत पत्नी वारल्यानंतर एकदोन वर्षातच वैराग्य धारण केलें व तो तीर्थाटणास निघून गेला. धाकटे भाऊ कान्होबा यांचे दोनशेवर अभंग, पदें वगैरे प्रसिद्ध आहेत. हेहि भगवद्भक्त होते. तुकोबा व कान्होबा तुकोबांच्या निर्याणापर्यंत तरी एकत्र राहत होते असें कान्होबा लिहितात. परंतु नंतर केव्हांतरी कान्होबा सुदुंबऱ्यास जाऊन राहिले. त्यांना एक गंगाजी नांवाचा मुलगा होता. त्याचा वंश तेथेंच वाढला.

तुकोबांचें आडनांव अंबिले; परंतु त्यांचे घराण्यांत हें आडनांव फक्त रोख्यासारख्या कागदपत्रांतून आढळतें. इतरत्र या कुटुंबांतील सर्व आबालवृद्धांस गोसावी म्हणूनच लेखलें आहे. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धा-

तील कागदपत्रांत कांहींनीं आपलें आडनांव गोसावी म्हणूनच लिहून दिलें आहे. मात्र गेल्या साठसत्तर वर्षांत या घराण्यांत मोरे हें आडनांव लावलें जातें. परंतु सामान्यतः ही मंडळी देहूकर म्हणूनच ओळखली जातात.

तुकोबा आपल्याला वाणी, वैश्य व कधीं कधीं यातिहीन असें म्हणवितात. त्यांना शूद्रवंशीय मानलें म्हणून त्यांच्या लेखनांत त्याबद्दल पुष्कळ उपहासात्मक उल्लेख आलेले आहेत. त्यांना शूद्रवंशीय मानण्याचें मुख्य कारण म्हणजे त्यांच्या घराण्यांत गोसावी पंथाची दीक्षा होती हें होय. या पंथांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य जातींचाच समावेश होतो. परंतु तत्कालीन कर्मठ विचारसरणीप्रमाणें कोणत्याहि इतर पंथाचा अनुयायी होतांच त्याची वर्ण जात लोप होते. अशा सर्व पंथीय माणसांस शूद्र म्हणून लेखण्यांत येतें. या नूतन तत्त्वाचा तुकोबांनीं आपल्या लेखनांत सर्वत्र निषेध केला आहे. तुकोबांनीं प्रथम वैश्य म्हणजे वणिज्याचा व्यवसाय केला. परंतु नंतर कुणबी म्हणजे शेतकरी झाले. त्यांनीं आपल्या गीतानुवादांत वैश्यवर्णाचे गुणधर्म दिले आहेत : "उदरार्थ कुटुंबार्थ। करी कृषिबळी स्वार्थ। परि तयांत परमार्थ। जें रक्षण गार्यांचें ॥ १ ॥ द्रव्य व्यवसाय तेवीं। वणिज्यांत उठाठेवी। वैश्यकर्म तृतीयभावीं। तूं ओळखे सुजाण ॥ २ ॥" [ गी. ६८६ ]. तुकारामकालीं कुणबी हा शब्द शेतकरी या अर्थानेंच वापरला जात असे. तो व्यवसायवाचक होता, जातिवाचक नव्हता. हल्लींहि तो तितका जातिवाचक म्हणून निश्चितपणें उपयोजला जात नाहीं. महाराष्ट्रीय वैश्य वाणी ही कांहीं गुजराथेंतील एखादी जात नसून ती महाराष्ट्रांत वणिज्य करणारी आणि म्हणून वैश्य वाणी या नांवानें ओळखली जाणारी एक लहानशी जात आहे. कोंकणांत या जातीच्या कुडाळे, संगमेश्वरी व पाटणी अशा पोटजाती आहेत. ठाणें कुलाबा जिल्ह्यांतील कुटुंबें वैश्य वाणी म्हणून संबोधलीं जाऊन तीं वणिज्य हाच मुख्यत: धंदा करतात. कांहीं कुलवंत किंवा कुणबवाणी म्हणविणारीं कुटुंबें असल्याचें सांगतात.

या पोट जातींत रोटीबेटी व्यवहार सांप्रत होत नाहीं. यांतील कांहीं कुटुंबें शेती करूं लागल्यामुळें कालावधीनें आपणांस कुणबवाणी किंवा कुणबी म्हणवून घेऊं लागलींसें दिसतें. त्यामुळें कुणबीपण करणाऱ्या बऱ्याच मराठे वाणी कुटुंबांचा मराठ्यांच्या किंवा सांप्रत 'कुणबी' नांवानें ओळखल्या जाणाऱ्या जातींत समावेश झाला आहे. सुतारादि कुटुंबेंहि मूळचीं वैश्य-वर्णीय. परंतु शेतकरी झाल्यानें त्यांतील बरींच कुटुंबेंहि मराठे म्हणूनच वावरत आहेत. उच्च कुलांतील मराठे हे त्यांच्या राजकीय दर्जामुळें व क्षात्रवृत्तीमुळें अलिप्त राहूं लागले. परंतु याहि उच्च मराठे कुटुंबांतील केवळ शेतकीवर निर्वाह करणारी मंडळी वरील पातळीवरून खालीं सरली. सारांश, वैश्य जातींतील वणिज्य करणारांना वाणी म्हणूनच संबोधलें जाई. एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापूर्वीच्या सर्व लेखकांनीं तुकोबा वाणी म्हणूनच लिहिलें आहे. यांत मतांतर नाहीं. मंबाजीनें 'आप्पाजी देश-पांड्यास' लिहिलेल्या पत्रांत 'तुकोबा, गोसावी शूद्र वाणी' असाच उल्लेख केल्याचें बहिणाबाई सांगतात. बहिणाबाई व इतर तत्कालीन लेखक तुकोबा वाणी म्हणूनच निर्देश करतात. सारांश, तुकोबा हे वैश्य वाणी होते. परंतु गोसावीपर्याय कुलांत जन्मल्यानें, मानभाव, बौद्धभिक्षूप्रमाणें, ते जातिहीन होऊन त्यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं कर्मठ आचारधर्मानुसार त्यांना शूद्र म्हणून लेखलें. तुकोबांनीहि आपल्या प्रतिस्पर्ध्यांचा तितक्याच बोचक शब्दांत समाचार घेतला आहे. तुकोबा तत्कालीन् वर्णाश्रमधर्मास चिकटून राहिले असते तर त्यांना कलियुगांत पारमार्थिक ज्ञानप्राप्तीस अनधिकारी म्हणून स्वस्थ बसावें लागलें असतें. तें तसें न होतां त्यांना उच्च वाङ्मय वाचण्याची व पारमार्थिक साधनमार्ग क्रमण्याची गोसावी म्हणून सवड मिळाली हें महाराष्ट्राचें भाग्यच होय. तुकोबांचे वंशज गेल्या शतका-वधींत आपल्या उच्च संस्कृतीनें व दर्जानें उच्च कुलीन मराठा समाजांत रोटीबेटी व्यवहार संपादून त्यांचेंत पूर्णपणें सामील झाले आहेत.

तुकारामकालीन कागदपत्रांच्या अभावीं महीपतीनें दंतकथांच्या आधारानें तुकोबांचें जें चरित्र ' भक्तलीलामृतांत ' दिलें आहे, त्यावरच बहुतेक लेखकांना विसंबावें लागलें आहे. महीपतीनें ऐकलेल्या सत्यासत्य हकीकती पुराणोक्त वचनांत, धाटणींत किंवा चकारींत बसविल्यानें त्यांतील पुष्कळ वास्तवतेस सोडून झाल्या आहेत. कित्येक पुराव्याभावींच रचल्या किंवा घुसडल्या आहेत. त्या सर्व तुकोबांच्या चारित्र्याला व त्यांच्या पारमार्थिक तत्त्वज्ञानाच्या शिकवणुकीला विरोधात्मक आहेत. अशा निराधार किंवा कल्पनेनें रचलेल्या गोष्टींची येथें चर्चा न करतां फक्त इतिहासशास्त्रास पटतात अशाच गोष्टींचा उल्लेख करण्याचें योजलें आहे. येथें तुकोबांचें सबंध चरित्र सांगण्याचा हेतु नसून त्यांचे चरित्रावर हातीं आलेल्या आधारांपुरतीच व विशेषतः गीतानुवादाचें लेखन व लेखक याबाबतच्या परीक्षणापुरतीच चर्चा करावयाची आहे.

तुकोबांच्या चरित्रांत समकालीन पुराव्यांवर आधारलेले व कालानिर्णित असे थोडेच प्रसंग ज्ञात आहेत. त्यांतील पहिला उल्लेख म्हणजे इ. स. १६३०च्या दुष्काळाचा. या दुष्काळापूर्वींच त्यांचे मातापिता वारले. वडीलभाऊ सावजीची पत्नी याच सुमारास वारली. नंतर सावजी तीर्थाटणास गेला. तुकोबांची बायको रखुमाई व तिचा मुलगा दुष्काळांतच वारला. त्यामुळें तुकोबा विरक्त झाले. नंतर स्वप्नांत गुरूपदेश झाला. तुकोबा आपल्या गुरूबद्दल म्हणतात : " राघव चैतन्य केशव चैतन्य । सांगितली खूण माळिकेची ॥५॥ बाबाजी आपलें सांगितलें नाम । मंत्र दिला 'रामकृष्णहरि' ॥६॥ माघ शुद्ध दशमी पाहुनी गुरुवार । केला अंगिकार तुका म्हणे ॥७॥" [३४२७]. हा तिथिवार योग इ. स. १६३३, १६४०, १६४३ व १६४७त येतो. इ. स. १६३३ हा काल असंभवनीय वाटतो. कारण महाराज म्हणतातः " माझीये मनींचा जाणोनियां भाव । तो करी उपाव गुरुराजा ॥१॥ आवडीचा मंत्र सांगितला सोपा । जेणें नव्हे गुंफा कांहीं

कोठें ॥२॥ " [ ३४२८ ]. स्वप्नांतील उपदेश घेण्याइतकी पूर्वतयारी होण्यास व अडचणी समजण्यास दोन तीन वर्षांचा काल फारच अपुरा वाटतो. जलदींत जलदी झाली म्हटलें तरी हा गुरूपदेश १९ जानेवारी १६४३ रोजीं झाला असें न मानलें तरी २१ जानेवारी १६४० च्यापूर्वी धरतां येणार नाहीं.

बहिणाबाई ही थोर अधिकारी संत होती. तिला तुकोबांचें दर्शन व गुरूपदेश कोल्हापुरीं स्वप्नांत झाला. त्यापूर्वी तिचे कानांवर आलेल्या हकीकतींचें निवेदन करतांना ती तुकोबांना महाराष्ट्रांत वेदांताचा अर्थ सांगणारा व आपल्या वह्या उदकांत घालून तेरा दिवस वांचविणारा 'सर्वद्रष्टा' असें म्हणते. शिवाय "पूर्वील हरिकथा आयकिल्या होत्या । त्या मनीं मागुत्या आठवती ॥ ५ ॥ तुकोबांचीं पदें अद्वैत प्रसिद्ध । त्यांचा अनुवाद चित्त झुरवी ॥ ६ ॥ तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदांसी कथेमाजी ॥ ८ ॥ तुकोबाचीं ऐकेन कानीं हरिकथा । होय तैसें चित्ता समाधान ॥ १० ॥ " [ २१ ]. स्वप्नांतील हकीकतीत तुकोबानें "ठेवोनियां कर मस्तकीं बोलिला । मंत्र सांगितला कर्णरंध्रीं ॥७॥ म्यांही पायांवरी ठेविलें मस्तक । दिधलें पुस्तक मंत्र-गीता ॥ ८ ॥ कार्तिकांत वद्य पंचमी रवीवार । स्वप्नींचा विचार गुरुकृपा ॥ ९ ॥" [२५]. याप्रमाणें बहिणाबाईना स्वप्नांत ७ नवंबर १६४७ रोजीं गुरूपदेश झाला. नंतर कांहीं कालानें बहिणाबाई व तिचा पति, माता, पिता व बंधु अशीं "होवो आतां कल्याण किंवा अकल्याण । आम्ही तों संपूर्ण भक्ति करूं ॥ ८ ॥" अशा निर्धारानें "तुकोबांचे गांवा जाऊनियां राहों । मनींचा दढावो धरोनियां ॥ ९ ॥ " [४१]. नंतर ही मंडळी इ.स. १६४८ च्या सुरुवातीस देहूस पोहोंचली. बहिणाबाई लिहितातः "वत्साचिये माय कपिला सांगातें । धावे एकचित्तें आम्हांपुढें ॥ १ ॥ मायबाप बंधू भ्रतारासहित । इंद्रायणी जेथ तेथें आलों ॥ २ ॥ करोनियां स्नान पांडुरंग भेटी ।

आनंदली सृष्टी अंतरंगें ॥ ३ ॥ तुकोबा आरती करित होते तेथ। नमस्कारें स्वस्थ चित्त केलें ॥ ४ ॥ " [४२].

या प्रत्यक्ष तत्कालीन पुराव्यावरून असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं कीं, तुकोबांस इ. स. १६३० नंतर उपरति झाली. त्यानंतर दहा वर्षांनीं त्यांची गुरूपदेश मिळण्याइतकी पारमार्थिक तयारी झाली. गुरूपदेशानें त्यांच्या पारमार्थिक साधनमार्गाची दिशा कायम झाली. पुढें काव्यस्फूर्ती झाली. प्रथम अनुवाद करण्याकडे नैसर्गिक प्रवृत्ति राहिली. कृष्णपर कवितांनंतर गीतानुवाद केला. हा गुरूपदेशानंतरचा म्हणण्यास त्यांत 'रामकृष्णहरि' मंत्राचाच पुरःस्कार केला आहे. या अनुवादास त्या कालीं सहज वर्ष दोन वर्षें लागलीं असतील. कारण या लेखनास आवश्यक असलेल्या अभ्यासाचीं साधनें वगैरे तेवढीं सुलभ व सहजसाध्य नव्हतीं. बहुधा गीतानुवाद इ. स. १६४३त पुरा झाला असावा. तुकोबांना त्यांच्या 'मंत्रगीते' मुळें त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें जाब द्यावा लागला. तुकोबांनीं सर्व लेखनाचा कर्ता परमेश्वर म्हणून निखालस हट्ट धरल्यानें त्यांना आपल्या वह्या बुडवून दिव्य करावें लागलें. हें अठरा दिवसांचें दिव्य बहुधा चिंचवडकर व चाकणकर वेदांत्यांच्या आग्रहामुळें दिवाणांतून देवविलें. कदाचित् चिंचवडचे देवच या दिव्याचे वेळीं अध्यक्ष असावेत. परंतु तुकोबा या दिव्यांतून यशस्वीपणें बाहेर आले. त्याचवेळीं त्यांना देवाचें प्रथम दर्शन झालें. आधींच दिव्याला दहा गांवचे मोकदम, शिष्ट यावयाचे. त्यांत हें तर महा दिव्य. प्रत्यक्ष परमेश्वरदर्शन. त्यामुळें "झाला हा डांगोरा। मुखीं लहानाही थोरा ॥ १ ॥ नागविला जनाचारी । कोणी बैसों नेदी दारीं ॥ २ ॥ "[ २६१९ ], असें तुकोबा म्हणतात.

तुकोबा दिव्यांतून यशस्वी झाल्यानें त्यांच्या मोठेपणाचा बराच बोभाटा झाला. त्यामुळें त्यांना त्रास झाला. स्वाभाविकच पाखंड्यांना तोंड देणें जरूर पडलें. या पाखांडवादाची कल्पना पुढील उक्तींवरून कळून येईलः

"कोणापासी आतां सांगो मी बोभाट। कवीं खटपट सरेल हे ॥ १ ॥ [ १८८९ ]. रात्री दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग। अंतर्बाह्य जग आणि मन ॥ १ ॥ तुका म्हणे तुझ्या नामाच्चिया बळें। अवघीयांचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥ [ ३१४० ]. पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला। तेथें मीं विठ्ठला काय बोलो ॥ १ ॥ न कळे तें मज पुसती छळूनी। लागतां चरणीं न सोडिती ॥ ३ ॥ तुका म्हणे खीळ पडो त्यांच्या तोंडा। किती बोलों भांडा वादकांशीं ॥ ५ ॥ [ ४०४ ]. नको दुष्टसंग। पडे भजनामधीं भंग ॥ १ ॥ तुज निषेधितां। मज न साहे सर्वथा ॥ ३ ॥ एका माझ्या जीवें। वाद करूं कोणासवें ॥ ४ ॥ तुझे वर्णू गुण। कीं हे राखो दुष्ट जन ॥ ५ ॥ [ १४१६ ]. नव जातां घरा। आम्ही कोणाच्या दातारा ॥ १ ॥ कां हे छळू येती लोक। दाट बळेंचि कंटक ॥ २ ॥ नाहीं आम्ही खात। कांहीं कोणाचें लागत ॥ ३ ॥ [ १४४२ ]."

ज्याप्रमाणें प्रतिपक्षीयांनीं जोर केला त्याचप्रमाणें वारकरी श्रद्धावान् भाविक संतजन तुकोबांची कीर्ति व शिकवणूक गांवोगांवीं गाऊं लागले. तुकोबा म्हणतात : "कोण सांगायास। गेले होते देशोदेश ॥ १ ॥ झाले वाऱ्याहातीं माप। समर्थ तो माझा बाप ॥२॥ [३११]." या प्रसिद्धीमुळें "लोक म्हणती मज देव। हा तो अधर्म उपाव ॥ १ ॥ अधिकार नाहीं। पूजा करिती तैसा कांहीं ॥ ३ ॥ [ २१२४ ]. हीन माझी याति। वरी स्तुती केली संतीं ॥ १ ॥ अंगीं वसू पाहे गर्व। माझें हरावया सर्व ॥ २ ॥ [ २०७२ ]." सारांश, वारकरी मंडळी तुकारामांच्या तत्त्वज्ञानावर इतकी लुब्ध झाली कीं त्यांचीं पदें येतील तशीं व आठवतील तशीं गाऊन अखिल महाराष्ट्रांत तीनचार वर्षांच्या अवधींत त्यांनीं तुकोबांच्या कट्टर अद्वैत-वादाचा प्रसार केला. हेंच बहिणाबाईच्या तत्कालीन उक्तींवरून शाबित होत आहे. बहिणाबाईसारखाच महत्त्वाचा पुरावा म्हणजे रामेश्वरभट्टांचा. रामेश्वरभट्ट हे तुकोबापेक्षां जवळजवळ चाळीस वर्षांनीं मोठे. त्यांना वेद-

शास्त्राचें काडीचेंहि ज्ञान नव्हतें. हे एक वैदिक किंवा वेदांती म्हणजे भिक्षुक होते. जोसपण-वृत्ति चालविण्याइतकेंच वेदाचें पाठांतर. खेड्यागांवांतील प्रयोग सांगण्यापलीकडे त्यांनीं वेदांचा अभ्यास केला नव्हता. परंतु ते थोर रामोपासक होते. तुकोबांच्या जन्मापूर्वीच त्यांनीं अयाचित वृत्ति धारण केली होती. अतियोगी म्हणून ते ख्यात झाले होते. शिष्यसांप्रदायहि होता. असे हे नाथपंथीय थोर व अधिकारी पुरुष तुकोबांचा वह्या तारण्याचा पुरुषार्थ पाहून धन्योद्गार काढतात व दुसऱ्या एका पदांत " तैसा नव्हे तुका वाणी व्यवसाई । भाव त्याचा पायीं विठोबाचे ॥ ४ ॥ **अमृताची वाणी वरुषाला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥ ५ ॥ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनियां** ॥ ६ ॥" वामनपंडितहि ( समाधिकाल १६५७ इ. स. ) तुकोबांची वाणी म्हणजे वेदांतवाणी व "त्यांच्या मुखीं भारती वेदमाता" म्हणून सांगतात. असो.

बहिणाबाई जेष्ठ अमावास्ये[ १२ जून १६४८ ]पूर्वीच देहूस आली. त्यानंतरच्या कांहीं प्रसंगांचें तिनें आत्मचरित्रांत शब्दचित्र रेखाटलें आहे. त्याचा सारांश तिच्याच शब्दांत देतों. बहिणाबाई आपल्या मंडळीसह देहूस आली त्या दिवशीं देवदर्शनानंतर "माध्यान्ह जालिया पाहिजे तें अन्न। भ्रतार जाऊन ग्राम हिंडे ॥ १ ॥ तंव तेथें एक ब्राह्मण कोंडाजी । म्हणे तुम्ही या जी भोजनासी ॥ २ ॥ " परंतु या पांच प्रवासी मंडळींनीं या स्वागताचा संकोच धरिला. तेव्हां कोंडाजी बोलतात कीं, " यावें नारायणा काय चिंता ॥ ४ ॥ जावें स्थळ तुम्हीं पाहोनी राहीजे । मध्यान्हीं येई जे गृहाप्रती ॥ ५ ॥" [ ४३ ]. राहावयास स्थळ शोधीत असतां, " मंबाजी गोसावी त्या स्थळीं नांदतां । गृह प्रवेशितां देखीयले ॥ १ ॥ जाऊनी तयासी मागितलें स्थळ । तो अति चंचळ क्रोध तया ॥ २ ॥ मारावया उठे घातले बाहेरी ।..." तेव्हां ही मंडळी तुकोबांच्या देऊळवाड्याकडे जाऊन " आनंदें वोवरी प्रार्थियेलें ॥ ३ ॥ तेथें राहोनियां

भोजनासी गेलों । बहुत पावलों समाधान ॥ ४ ॥ वृत्तांत [ कोंडाजीनें ] पुसिला कोठोनी आलांत । चालतसा पंथ कवण कार्या ॥ ५ ॥ कांहींबाही तया सांगितलें पूर्व । म्हणे रहा सर्व पर्वणीसी ॥ ६ ॥ सोमवारीं आहे अमावास्या [१२ जून १६४८] पुढें ।" – हा बहुधा जेष्ठी अमावास्येच्या सूर्यग्रहणाच्या पर्वणीचा उल्लेख असावा—" रहा भक्तिकोडें सुख घ्यावें ॥ ७ ॥ नित्य हरिकथा होतसे देऊळीं । तुकोबा माऊली वैष्णवाची ॥ ८ ॥ रहा येथें तुम्ही भक्षावया धान्य । देऊं हेंहि पुण्य आम्हां घडे ॥ ९ ॥ बहिणी म्हणे मग राहिलों देहूस । धरून हव्यास तुकोबांचा ॥ १० ॥ [ ४४ ]. देऊळांत कथा सर्वकाळ होत । श्रवण करीत दिनरात्रीं ॥ १ ॥ तुकोबाची कथा वेदांतील अर्थ । पावे माझें चित्त समाधान ॥ २ ॥ [ ४५ ]. कृपा केली देवें इंद्रायणीतीरीं । देहूग्रामीं थोर भक्तिपंथ ॥ २ ॥ तेथें पांडुरंग देवाचें देऊळ । रहावया स्थळ प्राप्त झालें ॥ ३ ॥ तुकाराम संत संताचें दर्शन । तिन्ही काळ तीन दृष्टीपुढें ॥ ४ ॥ नमस्कार तया न घडे पतिभयें । परि चित्त राहे सदा पायीं ॥ ५ ॥ बहिणी म्हणे ऐसे मास झाले सात । अवचेंचि संचित सरों आलें ॥ ६ ॥ [ ७३ ]". या अवधींत मंबाजीनें या मंडळींना घेरलें व त्रास देण्यास सुरुवात केली. ती हकीकत बहिणाबाई सांगतातः "मंबाजी गोसावी भ्रतारासी म्हणे । तुम्ही शिष्य होणें स्त्रियायुक्त ॥ १ ॥ माझा हेत आहे तुम्हीहि हरिभक्त । दिसतां विरक्त उभय वर्गे ॥ २ ॥ ऐकोनी ते गोष्टी दोनचार वेळां । मग त्या प्रांजळां सांगितलें ॥ ३ ॥ भ्रतारें त्याप्रती सांगितलें सर्व । कोल्हापुरीं पूर्व वर्तलें जें ॥ ५ ॥ ऐकोनियां द्वेष संचरला मनीं । म्हणे काय स्वप्नीं समाधान ॥ ६ ॥ नाहीं गुरुसेवा घडली जोंवरी । हस्तक हा शिरीं सद्गुरूचा ॥ ७ ॥ तोंवरी तो गुरु कासयाचा खरा । शूद्राचिया अंतरां ज्ञान कैचें ॥ ८ ॥ स्वप्नींचा अनुग्रह गुरु केला शूद्र । तोही बळीभद्र ज्ञानहीन ॥ ९ ॥

तुम्हांस वाळीस ब्राह्मणांचे पंक्तीं । तुम्ही गुरुभक्ती नका सांगू ॥ १० ॥ बहिणी म्हणे ऐसें मंबाजी बोलिला । द्वेषही मांडिला तेच क्षणीं ॥ ११ ॥" [ ४६ ]. नंतर कांहीं दिवसांनीं "एके दिवशीं वाटे दोखिलें आपण । मंबाजीस पूर्ण हेतयुक्त ॥ १ ॥ नमस्कार करावया गेलें जवें । येरू हा न शिवे दुरी पळे ॥ २ ॥ म्हणे तुम्ही काय कोण याती नेणें । मी तो शूद्र म्हणे तुम्हांलागीं ॥ ३ ॥ तुम्ही कोठें जाल भोजनासी जरी । दिवाणांत तरी घालीन मी ॥ ५ ॥ " [ ४७ ]. अर्थात् या भिक्षुक कुटुंबानें घाबरून तुकोबाच्या देऊळवाड्यांतील वोवरी सोडली व सर्वांना ब्राह्मणघरीं जाऊन राहावें लागलें. बहिणाबाई सांगतात : " महादजी कुळकर्णी कोंडाजीपंतासी । सांगितली कैसी गोष्टी तया ॥ १ ॥ मग तींही नेलें आपुल्या गृहासी । म्हणे की तयासी काय काज ॥ २ ॥ परंतु तो द्वेष चालवी अत्यंत । मारूं पाहे घात चिंतोनियां ॥ ३ ॥ म्हणे हे ब्राह्मण तरी गुरु शूद्र । हेंचि तया छिद्र सांपडलें ॥ ४ ॥ द्वेषही वाढला अत्यंत अद्भुत । सर्वही लोकांत कळों आलें ॥ ५ ॥ बहिणी म्हणे देव छळी नानापरी । निश्चय निर्धारीं पाहातसे ॥ ६ ॥" [ ४८ ]. परंतु मंबाजी एवढ्यावरच थांबला नाहीं. " आपाजी गोसावी पुण्यांत राहात । जो अति विख्यात राजयोगी ॥ १ ॥ तयाप्रती पत्र मंबाजी पाठवी । तुकोबा गोसावी शूद्र वाणी ॥ २ ॥ कथा करितसे देऊळीं सर्वदा । द्विज त्याच्या पदां लागताती ॥ ३ ॥ रामेश्वर भट अति योगी थोर । तेही नमस्कार त्यांसी करिती ॥ ॥ ४ आम्हांसी अन्याय हाची थोर वाटे । होत असे खोटें वेद-वाक्य ॥ ५ ॥ तुम्ही थोर आहां दंड करावया । बांधोनियां तया न्यावें तेथें ॥ ६ ॥ आणीकही एक स्त्रीपुरुष आहेती । तेही म्हणविती शिष्य त्याचे ॥ ७ ॥ म्हणविती ब्राह्मण आहेती सोनार । कुळकर्णीही फार मान्य केले ॥ ८ ॥ स्वधर्माचा लोप होतसे देखोन । धाडिले लेहोन

म्हणोनिया ॥९॥ याचा कीं अपमान करितां जाण । राज्यही बुडोन जाय तरी ॥ १० ॥ डोंबाळें मांडून स्वधर्म लोपला । पाहिजे रक्षिला स्वामीराजें ॥११॥ बहिणी म्हणे ऐसें पत्र पाठविलें । चोरोनी लिहिलें घरामाजीं ॥ १२ ॥" [४९]. या पत्रावरील प्रतिक्रियेबद्दल ती लिहिते : "आप्पाजी गोसावी वाचोनियां पत्र । क्रोधें फार नेत्र भोवंडीत ॥१॥ शूद्र होवोनीयां नमस्कार घेत । पाप हें अद्भुत होत असे ॥ २ ॥ सोनाराच्या जाती म्हणविती ब्राह्मण । तयांचें दर्शन घेऊ नये ॥ ३ ॥ शूद्राचा अनुग्रह घेताती ब्राह्मण । भ्रष्टाकार पूर्ण होत असे ॥४॥ त्याची शिक्षा द्यावी दोष नाहीं यासी । ऐसा निश्चयेसी नेम केला ॥ ५ ॥ बहिणी म्हणे याचें प्रत्युत्तर लिहीलें । होय यथाकालें कार्यसिद्धि ॥६॥" [ ५० ]. इतक्याच वर भागलें नाही तर " मंबाजी गोसावी द्वेष करी जीवें । म्हणे तुम्ही जावें येथोनियां ॥१॥" [५१ ]. परंतु हीं मंडळी तेथेंच राहिल्यानें मंबाजीनें त्यांचा सूड उगविण्याचें ठरविलें. बहिणा सांगते कीः "कोल्हापुरीं गाय होती जे सांगातें। कांहीं ते दुग्धातें देत होती ॥ १ ॥ गाय ते बांधोनी घातली घरांत । सोटेंहि मारीत तयालागीं ॥ २ ॥ पाहों गाय तंव न दिसे पाहातां । तुकोबासी व्यथा तेचि झाली ॥ ३ ॥ 'पाहातोसी काय होत असे कष्टी । तीन रात्रीं खुंटी बांधलीसे ॥ ४ ॥ नाहीं तृण पाणी मारिलेसें फार । धांवण्यासी थार नाहीं दिसे ॥ ५ ॥ ' तुकोबा जागृत जाले तंव पाठ । सुजेली ती नीट होयेचि ना ॥ ६ ॥ सोटे अंगावरी दिसती तुकोबा । आठवी विठोबा नानापरी ॥ ७ ॥ देखोनी तयासी कष्ट होती जनां । सांगितलें स्वप्नांतील सर्व ॥ ८ ॥ तुकोबा अंतरीं आठवूनी देवा । ' धांव रे माधवा सोड म्हणे ॥ ९ ॥ कोणे गाय कोठें बांधिली कळेना । धांव नारायणा गाय रक्षी ॥ १० ॥ ' तंव अकस्मात तयाचिये (मंबाजीच्या) गृहीं । अग्नि लागे तोही महा थोर ॥११॥ धांवोनियां लोक विझवती अग्नि । गाय तों निमग्नीं बैसलीसे ॥ १२ ॥

जे गाय पाहाती आजी तीन दिवस । चांडाळें तियेस बांधियेलें ॥ १३ ॥ गाय सोडोनियां आणली बाहेरी । तंव पाठीवरी मारीलेंसें ॥ १४ ॥ भ्रतार आपुला बोलावोनी पाहे । गाय सांभाळी हे ब्राह्मणा तूं ॥ १५ ॥ तुकोबा धांवोनी करी प्रदक्षिणा । नमस्कारी 'गुणा धन्य तुझें ॥१६॥ दाखाविलें स्वप्न मज माया तुवां । न कळेचि धांवा केला ॥ १७ ॥ तुझा माझा एक आत्मा सर्वांगत । ते साक्ष निश्चित आली मज ॥१८॥' ऐसा तुकोबानें केला फार धांवा । तंव माझ्या जीवा दु:ख झालें ॥ १९ ॥ मजही तैसेचि क्लेश झाले फार । साक्ष हे अंतर विठ्ठलाचें ॥२०॥ तुकोबाचे पाठी पाहाताती जन । गायही देखोन थोर कष्टी ॥ २१ ॥ बहिणी म्हणे ऐसें वर्तलें हें जाण । गायीचें निर्वाण हरि जाणे ॥२२॥" [ ५२ ]. हा चमत्कार सर्वत्र पसरतांच "रामेश्वरभट्टें ऐकिला वृत्तांत । धांवोनि त्वरित तेथें आला ॥ १ ॥ तुकोबाचें तींहीं घेतलें दर्शन । गाय तेही पूर्ण पाहियेली ॥ २ ॥ दोहींचें पाठीचा दिसे एक भाव । रुदनीं ते सर्व प्रवर्तलें ॥ ३ ॥ तुकोबाचा पार वर्णीलसा कोण । कलि-युगीं जाण प्रल्हाद हा ॥ ४ ॥ सर्वांतर साक्षी करोनिया स्तुती । स्वसुखें रमती आपुलिया ॥ ५ ॥ बहिणी म्हणे लोक बोलती सकळ । तुकोबा केवळ पांडुरंग ॥ ६ ॥" [ ५३ ].

बहिणाबाईच्या आत्मचरित्रांतील आणखी एक दोन प्रसंगचित्रें देऊन तिच्या लिहिण्यावरून निघणारे निष्कर्ष कोणते याची थोडीशी चर्चा करूं. बहिणाबाई कोल्हापुराहून निघाली तेव्हां ती चारपांच महिन्यांची गरोदर होती. "महादजी कुलकर्णी तयाचिये घरीं । असोनि निर्धारीं काळ क्रमूं ॥१॥ तंव तये काळीं झालिये प्रसूत । कन्या झाली तेथ आपणासी ॥४॥ काशीबाई तिचें ठेवियेलें नांव । दाखविला भाव पूर्ण कांहीं ॥ ५ ॥" [५४]. पुढें ही मंडळी तेथें वर्ष सव्वावर्ष राहिली. इ.स. १६५०च्या सुरवातीस ती पुन्हां गरोदर होती. त्या सुमाराची हकिकत लिहितांना बहिणा सांगतात

कीं, "आनंद ओवरी होती तये ठायीं वाटे तेथें कांहीं बसावेसें ॥१॥ करोनियां ध्यान लावावें लोचन । करावें स्मरण विठोबाचें ॥२॥ तुकारामा तंव देखतां देखत । आलें अकस्मात । मृत्युरूप ॥३॥" [७४]. नंतर तुकोबांच्या दर्शनाबद्दलची हकीकत देतांना बहिणाबाई लिहितातः "आनंद ओवरी देखियेली मग । देव पांडुरंग तयापासीं ॥२३॥ वाटलें मानसीं बैसावें एकांतीं । तीन अहोरात्री तये स्थळीं ॥२४॥ भ्रतार क्रोधाचा पुतळा सर्वही । एकांत तो पाहे केवीं साधे ॥२५॥ तंव अकस्मात कार्याच्या उद्देशें । भ्रतार आवेशें पुण्या गेला ॥२६॥ पुसोनी मातेसी इंद्रायणी स्नान । केलें पैं दर्शन विठोबाचें ॥२७॥ मनासीं आवेश सत्त्वाचा लोटला । आनंद दाटला आसनीं हो ॥२८॥ तीन अहोरात्री क्रमिल्या ते ठायीं । आनंद तो देहीं थोर झाला ॥२९॥ दुसरिया दिवशीं तुकारामरूपें । मंत्र तीन सोपे सांगितले ॥३०॥ तुझिये बो पोटीं आला असे पुत्र ॥३॥ तोहि आत्मनिष्ठ ज्ञानिया* ॥३४॥ बोलोनियां ऐसे जाला तो अदृश्य । लाविला अंगुष्ट भ्रुवामध्यें ॥ ३५ ॥ मग त्यां बाहेरी केलें गंगास्नान । घेतलें दर्शन विठ्ठलाचें ॥ ३६ ॥ पांच पदें एक आरती लिहून । विठ्ठला ध्यावून समर्पिली ॥ ३७ ॥" [ ९९ ].

बहिणाबाईनें जें प्रत्यक्ष पाहिलें व अनुभवलें त्याचा हा पुरावा अत्यंत महत्त्वाचा आहे. देऊळ हें देवघरांतील असल्यानें त्याचें स्वरूप बरेंचसें खाजगी होतें. नाहींतर मंबाजी वगैरेंनीं तुकोबांना तेथें बसूंच दिलें नसतें व बहिणाबाईला देवासमोरील आनंद ओवरींत [ बहुधा एकादशी वगैरे दिवशीं संकीर्तन करण्याची पडवी] तीन अहोरात्रपर्यंत एकांतात ध्यान करतांच आलें नसतें. तुकोबांच्या देऊळवाड्यांतील देवघरांत ज्या सिंहासनावर विठ्ठल-रखुमाईच्या मूर्ती होत्या तें अद्यापहि तेथील देवघरांत कायम आहे. त्या वाड्याला देऊळवाडा म्हणत व त्याचे शेजारील म्हणजे जेथें हल्लीं तुकराम

* विठोबा; यानें अभंग वगैरे केले आहेत.

महाराजांची पाषाणमूर्ती ठेविली आहे तें त्यांचें राहातें घर होतें हें कागद-पत्रांवरून स्पष्ट होत आहे.

पांडुरंगाचें देऊळ तुकोबांच्या खास मालकीचें होतें. म्हणूनच त्यांना तेथें तीनत्रिकाळ भजनपूजन करितां आलें. तुकोबा एकटेच भजनांत दंग असत, या बहिणाबाईंच्या निवेदनाला तुकोबांच्या अभंगांतहि आधार आहेत : "आम्ही नाचों तेणें सुखें । वाजऊं टाळी गातों मुखें ॥ १ ॥ [ १४१४ ]. आतां आम्हां हेंचि काम । वाचें गाऊं तुझें नाम । **वाहुनियां टाळी** । प्रेम-। सुखें आनंदें नाचावें ॥ १ ॥ [ ६१९ ]. मुखें गातों गीत **वाजवितों टाळी** । नाचतों राऊळीं प्रेमसुखें ॥३॥ [२३५]." असे आणखीहि त्यांचे उतारे देतां येतील, कीं ज्यांवरून तुकोबा **टाळ वीणा टाळकरी** वगैरेंच्या साहाय्याशिवाय तिन्हीत्रिकाळ भजन करीत असें म्हणतां येईल. उलट त्यांना मठ पट शिष्य शाखा वगैरे नको होत्या : "कपट कांहीं एक । नेणें भुलवायाचे लोक ॥ १ ॥ तुमचें करितो कीर्तन । गातो उत्तम ते गुण ॥ २ ॥ दाऊं नेणें जडी बुट्टी । चमत्कार उठाउठीं ॥ ३ ॥ नाहीं शिष्य शाखा । सांगों अयाचित लोकां ॥ ४ ॥ नव्हे मठपती । नाहीं चांहुराचि वृत्ति ॥ ५ ॥ नाहीं देवार्चन । असे मांडिलें दुकान ॥ ६ ॥ नाहीं हालवित माळ । भोंवतें मेळवूनि गबाळ ॥ ११ ॥ नव्हे यांच्या ऐसा । तुका निरयवासी पिसा ॥ १३ ॥" [१३७]. परंतु याचा असा अर्थ नाहीं कीं तुकोबा भजन करीत असतां तेथें कोणी जमलें तर त्यांनीं स्वस्थ बसावें. सर्वांनींच संकीर्तनांत भाग घ्यावा अशीच त्यांची इच्छा असे. म्हणून ते सांगतः "आम्ही गावें तुम्हीं कोणीं न कांही म्हणावें । ऐसें तंव आम्हां सांगितलें नाहीं देवें ॥१॥" [ ६०६ ]. एकादशी वगैरे निमित्तानें संकीर्तन करीत तेव्हां त्यांचा द्वैताद्वैतावर बोलूं न देण्याबद्दल पक्का कटाक्ष असे. ते म्हणतात : "गासी तरी एक विठ्ठलचि गाई । नाही तरी ठायीं राहे उगा ॥१॥ अद्वैतीं तो नाहीं बोलाचें कारण । जाणीवेचा सीण करिसी वांया ॥२॥ तुका म्हणे किती करावी फजिती । लाज नाहीं चित्तीं निलाजरा ॥३॥" [८८९].

यावरून असें दिसतें कीं 'टाळकरी' व 'फड' या कल्पनांचा उगमच त्या वेळीं झाला नव्हता. सर्वांनीं मिळून येईल तसें भजन करावें हाच धोपट मार्ग होता. 'चौदा टाळकऱ्यां'चें शुष्ककाष्ठ तुकारामांच्यामागें लावलें आहे तें बरेंच निराधार आहे. शेजारचे गांवांतून येणारी मंडळी सर्वांबरोबरच भजन करीत एवढेंच. बहिणाबाईनें कोणाला अभंग टिपून घेतांना सबंध दोन सव्वादोन वर्षांत पाहिलें नाहीं. नाहींतर एवढा मोठा मानाचा व महत्त्वाचा विषय तिच्या लिखाणांतून कधींच सुटला नसता. कचेश्वरांना महाराजांच्या निर्याणानंतर दहा वर्षांतन्न चार अभंग देहूस मिळेनात. कोणीहि जगनाडे किंवा मवाळ यांचें नांव सुचवीत नाहीत. हें आश्चर्य नसून अगदीं वस्तुस्थितीचा बोध करून देणारें तत्कालीन साधन आहे. जगनाड्यांच्या सध्यांच्या वह्या महाराजांचे हयातींतील नाहींत हें अंतर्गत पुराव्यावरून स्पष्टच आहे. कचेश्वर आपल्या आत्मचरित्रांत* लिहितात : "मला स्वस्त वाटे करावें कीर्तन । संतासी नमन करूं वाटे ॥ ४४ ॥ म्हणवुनी गेलों खेटक-ग्रामासी । नारायणापासी सर्व भावें ॥ ४५ ॥ तया विनविलें द्यावीं पांच पदें । लेहुन आल्हादें तुकोबांचीं ॥ ४६ ॥ पृच्छा ऐकूनी दिधलें उत्तर । अंबाजीचें घर तेथ जावें ॥ ४७ ॥ सर्वहि संग्रह तुकोबांच्या वह्या । जावें लवलाही तुम्ही तेथें ॥ ४८ ॥ आज्ञा करोनियां भावार्थे निघालों । देवळासी आलों विठोबाच्या ॥ ४९ ॥ देखोनियां देव आनंदलें मन । ऐकिलें कीर्तन संतामुखें ॥ ५० ॥". यावरून 'टाळकरां'चें लिगाड हें अवास्तव आहे. त्यांत कचेश्वर व तुकोबांच्या निर्याणानंतर जन्मलेल्या नीळोबांचीं नांवें येतात हाच पुरावा त्यांतील असत्यता सिद्ध करण्यास पुरेसा आहे. बहिणाबाई आपल्याला शिष्य म्हणविते, परंतु 'टाळकरी' म्हणून चुकूनसुद्धां कोठेंहि म्हणवीत नाहीं हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे.

---

* पृ. २४१, भा. इ. सं. मंडळ संमेलनवृत्त १८३५ शकेचें, पुणें.

बहिणाबाईनें मंबाजीबावाची बरीच माहिती दिली आहे. तिजवरून कित्येक गोष्टींतील विपर्यास दूर होतो. खरी वस्तुस्थिती कळते. मंबाजी हे देशस्थ ब्राह्मण नाथपंथीय होते. त्यांचे गुरु केशवराज देव. त्यांची समाधि मरकळ येथें आहे. मंबाजी इ.स. १६८४ व १६९०च्या दरम्यान वारले असावेत. तुकोबांच्या निर्याणानंतर जिजाईचीं मुलें लहान व कान्होजी सुदुंबऱ्यास गेल्यानें विठ्ठलदेवाच्या इनाम जमिनीची लावणीसंचणी झाली नाहीं. त्यामुळें तत्कालीन रिवाजाप्रमाणें त्यांतील अर्धी जमीन मंबाजीस भोगवटीयास दिली. त्याबद्दलचें शिवाजी महाराजांचें इ.स. १६५१–२ चें पत्रहि उपलब्ध आहे. बाकी राहिलेली अर्धी जमीन चापसेटकडे गेली. पुढें नारायणबुवा मोठे झाल्यावर त्यांनी आपल्या जमिनीच्या 'मिराशी'बद्दल गांवकीकडून निर्णय इ. स. १६७९च्या सुमारास करून घेतला. परंतु जमीन भोगवटीयास दिली गेल्यानें गांवकीनें महादेवबावास फक्त एक खंडी गल्ला व एक होन देण्याचें ठरविलें. पुढें मंबाजीबुवा मेल्यानंतर सर्व जमीन परत नारायणबावाकडे आली. तिचें उत्पन्न देवाकडे लागूं लागलें. बहिणाबाईनें आपल्या कपिलागाईची जी हकीगत सांगितली तींत नंतर विपर्यास झाला. मंबाजीनें तुकोबासच मारलें असें समजून त्या प्रसंगाला बरीच अवास्तव सजावट दिली व त्याचें खरें स्वरूप पार बदललें गेलें हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. तसेंच तुकोबांचा कुळस्वामी देवघरांत असल्यानें प्रदक्षिणेचा प्रश्नच उभा राहत नाहीं. इतकेंच नव्हे तर आनंद बोवरी, तुकोबांची राहण्याची जागा, कोंडाजीचें घर हीं मंबाजींच्या घरापासून दूर होतीं हें 'गाईचें हंबरणें, अग्नि लागल्यावर लोक धांवत जाणें, नंतर तुकोबानें धावत जाऊन गाईस नमस्कार करणें' वगैरे वर्णनावरून निश्चित ठरतें. विठ्ठलदेवाची अर्धी बागाईत जमीन इ. स.१६५१ नंतर मंबाजीकडे गेल्यानें [ मंबाजीच्या नांवावर एवढीच जमीन गांवझाड्यांतून आढळते ] जिजाई व मंबाजीचीं बागेवरून झालेलीं भांडणें

तुकोबांच्या निर्याणानंतरच होऊं शकतील. तीं पूर्वीचीं खास नाहींत. तुकोबांबद्दल मंबाजीचा दीर्घ द्वेष होता हें मात्र यांत चांगलेंच स्पष्ट होतें.

बहिणाबाईच्या या मंबाजीप्रकरणावरून आणखी एक खुलासा होतो. शिवाजी-तुकाराम पत्रव्यवहार अगर भेट झाली असती तर मंबाजीनें आप्पाजीस पत्र लिहून तुकोबांस बांधोन नेण्याची मागणी केली नसती व आप्पाजी देशमुख देशपांडयास महाराजांस पूज्य असलेल्या संताचें पारिपत्य करण्याचें धारिष्टच करवतें ना. विशेषतः शिवाजी आप्पाजी पुणें-शिरवळ-लाच राहणारे असल्यानें तर तसें होणें असंभवनीय होतें. परंतु ज्याअर्थी हें घडून आलें त्याअर्थी शिवाजी-तुकोबांच्या भेटीच्या विवादात्मक प्रश्नावर प्रकाश पडतो व तशा प्रसंगाची परिस्थिती तुकोबांच्या निर्याणापर्यंत नव्हती हें पटतें. जर भेट झालीच असती तर ती दहा वर्षांच्या अवधींत व्हावयाची व असा योग गांवकऱ्यांच्या व देशाधिकाऱ्यांच्या स्मृतिपटलावरून जाणें शक्य नव्हतें. शिवाय त्या वेळची कागदपत्रें पाहिलीं तर जीजाबाईसाहेब व शिवाजी यांचा इ. स. १६५२ पर्यंत तरी देहू, लोहगांव, पुणें टापूवर पूर्ण अंमल होता. परचक्राची त्यांना मुळींच भिती नव्हती. त्यांचा मुक्का-महि पुण्यासच होता. औरंगजेबाचा सल्ला मोडेपर्यंत शिवाजीस या बाजूकडे कोणीहि शत्रू नव्हता. अष्टप्रधानांबाबतचे अभंग प्राक्षिप्त असल्याचें वारकरीहि मानतात. जे कांहीं चार अभंग प्राक्षिप्त न मानतां गाथेंत दिले जातात त्यांत ते शिवाजी तुकोबा भेटीला अनुलक्षून आहेत असें दर्शविणारा प्रत्यक्ष पुरावा नाहीं. लोहगांवच्या जवळ जवळ सर्वच दंतकथा आधाराशिवाय प्रसृत झाल्यासें दिसतें. परंतु त्यांत पडताळून पाहण्यासारखा मजकूर नसल्यानें त्यांचें शास्त्रशुद्ध परीक्षण करतां येत नाहीं. मात्र त्या सर्व कथा तुकोबांच्या तत्त्वज्ञानाला, वागणुकीला व शिकवणुकीला हरताळ फांसणाऱ्या आहेत.

महीपतीनें दंडवत व नमस्कार या दोन्ही शब्दांचा उपयोग त्यांतील तत्कालीन रहस्य न जाणतांच केला आहे. तुकारामकालीं या शब्द-योजनेंतील

फरक फार मोठा मानला जाई. ब्राह्मणांशिवाय इतरांस नमस्कार करणें म्हणजे धर्माचरणाविरुद्ध मानलें जाऊन त्याबद्दल 'वैदिक' 'वेदांती' रणें माजवीत. बहिणाबाईनें जो मंबाजीच्या पत्रांतील मजकूर दिला आहे त्या पत्रांतहि त्याबद्दलचा तीव्र निषेध विशेष स्पष्टोक्तीनें केला आहे. त्यामुळेंच रामेश्वर भट्टाला आपल्या गैरवर्तनाचा जाब देतांना खुलासा करावा लागला. रामेश्वर लिहितात : "ऐसी वेदश्रुती बोलती पुराणें । नाहीं तें दूषण हरिभक्तां ॥ २ ॥ उंच निंच वर्ण न म्हणावा कोणा । जे कां नारायणा प्रिय झाले ॥ ३ ॥ चहूं वर्णांसी असे हा अधिकार । कारितां नमस्कार दोष नाहीं ॥४॥ जैसा शाळिग्राम न म्हणावा पाषाण । होय पुज्यमान सर्वत्रासी ॥५॥".

तुकोबांच्या चरित्रांत बरेच चमत्कार गोवण्याचा प्रयत्न केला गेला आहे. इतकेंच नव्हे तर कांहीं प्रसंगांस पोषक असे अभंग तुकोबांच्या नांवानें गाथेंत येऊन बसले आहेत. कित्येक अभंग प्रत्यक्ष त्या अभंगांत त्या प्रसंगांस पोषक असें कांहींहि नसतांना देखील ते अप्रत्यक्ष किंवा बादरायण संबंध जोडून कांहीं प्रसंगांस चिकटविले आहेत. या सर्वांचा प्रचलित गाथांत समावेश झाल्यानें ते सर्व प्रसंग खरे असल्याचा भाविकांस सहजच भास होतो. म्हणून गाथेंत ज्या प्रसंगांना स्थान मिळालें आहे अशांचेंच तत्कालीन पुराव्यांवरून प्रथम परीक्षण करूं.

तुकोबांनीं चिंचवडकर देवांकडे मोरयास व विष्णूस एका पंक्तीस आणल्याची कथा सांगतात. द्वैताद्वैताचा विचार न केला तरी जे तुकोबा गणपती देवतेची "गणेश विक्राळ । लाडू मोदकांचा काळ ॥ ५ ॥" [ १६२४ ]. म्हणून थट्टा करितात किंवा ज्या गणोबाला ते क्षुलक देवता लेखतात : "हरिहर सांडूनि देव । धरिती भाव क्षुल्लकीं ॥ १ ॥ पूजिती विकट दोंद । पशू सोंड गजाची ॥६॥" [३४४०] म्हणून म्हणतात, तेंच तुकोबा गणोबाची प्रार्थना करून विष्णूबरोबर त्यास जेवावयास आणतात हें संभवनीय वाटत नाहीं. शिवाय चिंतामणी देवांनीं "पौष वद्य ४ शक १५४७ क्रोधन रात्रौ चंद्रोदयीं भोजनोत्तर" [गुरुवार ८ जानेवारी १६२६इ.] रोजीं समाधी घेतल्यानें तर हा प्रसंग घडणेंच अशक्य होय.

रामेश्वरभट्ट हे भिक्षुक होते, वेदशास्त्रज्ञ नव्हते. त्यांचा द्वैताद्वैतावरून तुकोबांशीं वाद होणें असंभवनीय दिसतें. ते स्वतः 'श्रीरामा'ची उपासना करीत. ते नाथपंथीय होते. ते ज्ञानेश्वरांचे समाधिसंनिध श्रीरामाच्या देवळाला लागून असलेल्या ओवरींत शिष्यशाखा राखून होते. ते वाघोलीला नसत. आळंदीलाच अयाचितवृत्ति धारण केल्यापासून राहत. त्यांना आपल्या वाघोली गांवचें वाघेश्वराचें स्वयंभू स्थान फार मोठें वाटत असावें. त्यांना पुण्याच्या नागेशाला वाघोलीहून यावयाचेंच तर घोरपडीवरून रस्ता सरळ होता. त्या काळीं त्यांस अनघडशांच्या कबरीकडे दीड मैल आडवाट घेऊन जाण्याचें कांहींच प्रयोजन नव्हतें. शिवाय त्या वेळीं उंचवट्यावर मीरशा, अनघडशा व लकानशा अशा तीन मोठया कबरी होत्या. त्यांचेजवळ लागूनच एक तकियाहि होता. तेथील लहानशा चौकोनी विहिरीवर येण्यापूर्वी या कबरी व तकिया सहज दिसण्यासारख्या होत्या. कोणीहि कर्मठ ब्राह्मण हें दृश्य पाहून नागेशाच्या देवळांतील उत्तम पाण्याची सोय टाकून, भ्रष्ट झालेल्या पाण्यांत स्नान करण्याचें धाडस करणार नाहीं. परंतु हा अनघडशा इ. स. १६०० पूर्वीच मेला असावा. कारण त्याच्या नातवास इ. स. १६३२ सालीं त्या कबरींच्या जोपासनेबाबत सनद मिळाली आहे. यापूर्वी लकानशाकडे हें इनाम चालत असावें. अनघडशाच्या शापामुळें रामेश्वरभट्टांच्या अंगाची लाही झाली म्हणून ते तुकोबांस शरण गेले असें रामेश्वरभट्टहि म्हणत नाहींत. या प्रसंगाला धरून त्यांचा एक अभंग प्रसिद्ध आहे. त्यांत रामेश्वरभट्ट म्हणतात : " कांहीं द्वेष त्यांचा करितां अंतरीं। व्यथा या शरीरीं बहुत झाली ॥ २ ॥ दर्शनेंचि तुझ्या दोषपरिहार । होय तो विचार [ ज्ञानोबांनीं ] सांगितला ॥ ३ ॥ तोचि हा विश्वास धरोनी मानसीं। जाय कीर्तनासी नित्य काळ ॥ ८ ॥ म्हणे रामेश्वर त्यांच्या समागमें । झाले हे आराम देह माझे ॥ ९ ॥". खास रामेश्वरांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांच्या अंतरांत तुकोबांविषयीं द्वेष उत्पन्न झाला म्हणून जडलेली व्यथा—दाह नव्हे—नित्यकाळ कीर्तनास गेल्यानें बरी झाली. तेव्हां

तुकोबांना रामेश्वरभट्टांस अभंगपत्र लिहिण्याची जरूर पडली असेलसें वाटत नाहीं. त्या काळीं कागद फार कमी वापरीत. सर्व व्यवहार निरोपानेंच भागवला जाई. सारांश, अनघडशा व रामेश्वरभट्टांचा प्रसंग काल्पनिक आहे. अनघडशाची कबर देहूस दाखवितात. परंतु ह्या अनघडशाची कबर त्याच्या गुरु-शिष्यांच्या शेजारीं पुण्यास भवानी पेठेंत घसेटी पुलाजवळ आहे व तिच्या इनामाचे उल्लेख असलेलीं सनदपत्रेंहि दप्तरांत आहेत. हा अनघडशा निदान १६३२ इ. पूर्वी मेला असल्यानें रामेश्वर–अनघडशा व अनघडशाच्या तुंब्यांतील भिक्षेची कथा खरी मानणें सत्याला धरून होणार नाहीं.

यानंतर कांहीं इतर चमत्कारांचें परीक्षण करूं. शिवजी कासार हा बांगड्यांचा व्यापारी. यानें आपल्या मातापित्यांच्या स्मरणार्थ जी विहीर बांधली आहे ती १६१३ इसवींत बांधून पुरी झाली. तेथील शिलालेख या बाबतींत अगदीं स्पष्ट आहे. शिवाय मुंबईची वस्तीच मुळीं इ. १६६२ नंतरची. अर्थात् तेथें शिसें कथिल विकत घेणें, त्याची चांदी होणें व तुकारामांनीं या फायद्यांतून विहीर बांधण्यास सांगणें वगैरे सर्व कथा निराधार आहेत. त्याचप्रमाणें इ. स. १६१३त शिवजी ४०-५० वर्षांचा तरी असावा. म्हणजे तुकाराम महाराजांनीं लोहगांवास भजन केलेंच असेल तर तो त्या वेळीं ७०-८० वर्षांचा व त्याची बायको ६०-७० वर्षांची असावी. अशा वृद्ध गृहस्थानें कीर्तनांत कांहीं रात्री काढल्या असल्याच तर त्याच्या उत्तर वयाच्या बायकोला संकीर्तनकाराचा सूड उगविण्याइतकी भावना प्रदीप्त होण्याची परिस्थिती असणें शक्य दिसत नाहीं. तुकोबांच्या पाठीं कर्मठांचा लकडा असल्यानें ते कोठेंहि चव्हाट्यावर बाजारांत वगैरे संकीर्तन करीत नसत. लोहगांवला विठोबाचें देऊळ इ. स. १८०० पर्यंत नव्हतें. सध्यांचें देऊळ खाजगी व नंतरचें आहे. तेंहि एका ब्राह्मणाच्या पडवींत त्यानंतर मूर्ती ठेवून झालेलें आहे. लोहगांवचीं पुरातन देवळें अद्यापिहि पाहावयास सांपडतात. तीं इतकीं लहान आहेत कीं आंत चार

माणसांना नीट बावरतां येत नाहीं. शिवाय येथें ब्राह्मणांचीं दहापांच घरेंहि पूर्वापार होतीं. अशा परिस्थितींत लोहगांव व पुण्याच्या कीर्तनाबद्दलच्या कथांतून फारसें तथ्य दिसत नाहीं.

वारकऱ्यांबरोबर पत्र दिल्यानंतर गरुड येऊन तुकोबास घेऊन जाण्याचा प्रयत्न करतो ही कथाहि त्यांच्याच वारकरी आल्यानंतरच्या अभंगांनीं अवास्तव ठरते. श्राद्ध, पक्ष, ब्राह्मणभोजनें, दान वगैरे सर्व कथा त्यांच्या संकल्पित मार्गाला व पारमार्थिक तत्त्वज्ञानाला पूर्ण विरोधी आहेत. अशा दंतकथांनीं महाराजांच्या प्रज्वलित तत्त्वज्ञानावर मालिन्य आणलें आहे.

तुकाराम महाराजांस जें थोर द्रष्टे, मोठे तत्त्वज्ञानी व श्रेष्ठ संत म्हणून अमरस्थान प्राप्त झालें आहे तें असल्या दंतकथा त्यांच्या चरित्रास चिकटविल्या म्हणून नव्हे. त्यांनी उपरतीचे पूर्वी व नंतर भक्तीच्या साधनानें जें साध्य साधलें त्याचें तें फळ होय. सर्व चरित्रकारांनीं आपापल्यापरीनें तुकोबांचे संस्कृत ज्ञानाचें स्थान ठरविण्याकरितां गीता, भागवत, उपनिषदें वगैरेंतील वचनांच्या समानार्थ अभंग दाखविण्याची स्पृहणीय खटपट केली आहे. गाथेंतील अभंगांत ज्या ग्रंथांचा उल्लेख येतो त्यांवरून विष्णुसहस्रनाम पुराणें, भागवत, गीता, दर्शनें, संतवचनें म्हणजे मराठी ग्रंथ वगैरे वाङ्मय त्यांना पूर्ण परिचित होतें असा कयास बांधणें सत्याला धरूनच होईल.

तुकाराम महाराजांच्या लेखनावर ज्ञानोबा, एकनाथ किंवा इतर कोणा एखाद्या संताची छाप पडली हें ठरविणें मात्र कठीण आहे. त्यांचा गीतेचा अनुवाद अगदीं स्वतंत्र आहे. तत्कालीन रूपकें, संस्कृत ग्रंथांतील वचनें वगैरे बाबतींचें साम्य हीं कांहीं असल्या निर्णयाला फारशीं उपयुक्त नसतात. तत्कालीन भाषेचें स्वरूप त्यांवरून जाणतां येतें इतकेंच. शिवाय ज्या केशव ऊर्फ बाबाजी चैतन्यास त्यांनीं गुरुस्थानीं अधिष्ठित केलें त्यांचे चतुःश्लोकी भागवत वगैरेवर बारा तेरा ग्रंथ होते असा उल्लेख आढळतो. राघव चैतन्य व केशव चैतन्य यांची ग्रंथनिष्पत्ति जोंपर्यंत अज्ञात आहे तोंपर्यंत या

बाबतींत नक्की निर्णय घेणें कठीण. परंतु ज्याअर्थी त्यांनीं केशव चैतन्यांना गुरु मानलें त्याअर्थी त्यांच्याच विचारसरणीशीं तुकोबा तादात्म्य पावणें विशेष संभवनीय दिसतें. अध्यात्मिक उत्कृष्ट वाङ्मयाचें मनन व अभ्यासानंतर जो परमार्थसाधनमार्ग साधणें तो निश्चित व अनुभवसिद्ध अशाच प्रकारचा असावा लागतो. तुकाराम महाराजांच्या उपरतीनंतर त्यांनीं ज्या साधनमार्गाचा अवलंब केला तो बरोबर असल्याची ग्वाही एका अनुभवी थोर संतानें दिल्यावरून त्यांचे मार्गांत त्यांना ज्या गुंफा वाटत होत्या त्यांचें निरसन झालें. महाराजांस आपल्या साधनांविषयीं पूर्ण आत्मविश्वास वाटूं लागला. अशा तऱ्हेनें व्यावहारिक भाषेंत बोलावयाचें तर त्यांनीं आपली परमार्थ-प्राप्तीची पहिली परीक्षा यशस्वीपणें दिली.

आत्मविश्वासानें तुकोबांचा देवांवरील विश्वास अधिक दृढ झाला. परमात्म्यापाशीं अप्रत्यक्षपणें सायुज्यता साधण्याच्या जवळपास गेले. देवांनीं महाराजांच्या हातून लिहवलेल्या तत्त्वज्ञानाचें कर्तृत्व देवांनींच मान्य केल्यानें महाराजांनीं अवर्णनीय असें दुसऱ्या उच्च परीक्षेंत यश मिळविलें. त्यामुळें प्रत्यक्ष ओळख न पटली तरी महाराजांचे थोरवीनें संतांनाहि दिपवून टाकलें. त्यांच्या तत्त्वज्ञानांतील सत्यता पटविण्यास अधिक पुराव्यांची किंवा परीक्षेची जरूरच राहिली नाहीं.

कोणत्याहि तत्त्वज्ञानाची परीक्षा प्रत्यक्ष अनुभवावरून होत असते. ज्ञानी संतांस बहिणाबाईच्या गाईच्या अंगावरील वळीची हकीकत हा एक प्रत्यक्ष अनुभव ठसविणारा प्रसंग आहे. बहिणाबाई सांगतात : 'तुझा माझा एक आत्मा सर्वांगत। ते साक्ष निश्चित आली मज ॥१८॥ ऐसा तुकोबानें केला फार धांवा। तंव माझ्या जीवा दुःख झालें ॥ १९ ॥'. नंतर आत्मैक्यभावाची प्रत्यक्ष साक्ष पटल्यानें रामेश्वरभट्टासारखे अतियोगीहि तुकोबांचा हा प्रत्यक्ष अनुभव सिद्धान्त पाहून प्रेमातिशयानें 'रुदनीं ते सर्व प्रवर्तले ॥३॥'. म्हणून बहिणी पुढें सांगते : ' बहिणी म्हणे लोक बोलती सकळ। तुकोबा

केवळ पांडुरंग ॥ ६ ॥'. रामेश्वरभटजींनीं बहिणीच्या भाव अधिक स्पष्ट शब्दांत मांडला आहे : 'म्हणे रामेश्वरभट्ट द्विजां। तुका विष्णु नाहीं दुजा ॥४॥'. वामनपंडितहि म्हणतात कीं, 'परब्रह्मरूपीं असा हा तुकोबा। तयाचे तुकीं कोण दुजा तुकावा ॥'. खास तुकारामहि आपला अनुभव सांगतात : 'ब्रह्मीभूत काया होतसे कीर्तनीं। भाग्य तरी ऋणी देवा ऐसा ॥ २ ॥' [ ३५९८ ]. आणखीहि उतारे देतां येतील. परंतु विस्ताराची जरूर आहेसें नाहीं. तुकोबा किती श्रेष्ठ दर्जाला जाऊन पोहोंचले होते व तत्कालीन लोकांस त्याची कशी साक्ष पटत होती हें यावरून लक्षांत येईल. रामेश्वरभट्टांचा अभिप्राय अनुभवावर आधारल्यानें महत्त्वाचा आहे. ते म्हणतात : 'भक्ति-ज्ञानें आणि वैराग्यें आगळा। ऐसा नाहीं डोळां देखियेला ॥ ८ ॥ गुरु परब्रह्म देवाचा तो देव। त्यासी तो मानव म्हणूं नये ॥ ९ ॥'.

तुकोबांनीं परमात्म साधनाच्या श्रेष्ठ पदाप्रत जातांना संसाराचा संन्यास केला होता ही कल्पना वृथा आहे. तत्कालीन परिस्थितीच्या अज्ञानांतून ती निर्माण झालेली असून इतरेजनांनीं त्यांच्या नांवानें केलेल्या अभंगांमुळें बाढीस लागलीसें दिसतें. तुकोबांनीं कर्मसंन्यासांतील असत्यता ठिकठिकाणीं प्रदर्शित केली आहे. 'भोग भोगावरी न्यावा। पूर्ण संचिताचा ठेवा ॥१॥' [ १०३० ] असें त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे. त्यांच्या निर्याणापर्यंत विठ्ठल-देवाची पंधरा बिघे बागाईत जमिनीचा अखंड भोगवटा ते घेत होते. दुष्काळांत घर बसल्यामुळें घरांत माणसें थोडीच होतीं. कान्होबा सांगतात : 'निसूर संसार करून। होतो पोट भरून। केली दिवसी निर्माण। देवपण दाखविलें ॥१॥ ऐसा काढीला नीस। काय म्हूण सहित वंश। आणिलें शेवटास। हाऊस तरी न पुरे ॥ २ ॥ आलो पालव्या शेवटीं। तेहि न देखवे दृष्टि। दोघांमध्यें तुटी। रोकडीच पाडिली ॥ ३ ॥ तुकयाबंधु म्हणे गोड। बहु जाले अति वाड। म्हणूनि कां बूड। मुळांसहित खावें ॥४॥' [ ३६३९ ]. कान्होबा तुकोबांना उद्देशून लिहितात कीं, 'तुज ठावें

आम्हां कोणी नाहीं सखा । उभय लोकीं तुका तुजवीण ।। ५ ।। कान्हा म्हणे तुझ्या वियोगें पोरटीं । जालों दे रे भेटी बंधुराया ।।६।।' [३८१८]. देवास म्हणतात कीं, "मायबाप निमाल्यावरी । घातलें भावाचे आभारीं । तोही परी हरि । तुज जाला असमाई ।। १ ।। हे कां भक्तीचा प्रकार । नांदतें विध्वंसिलें घर । प्रसन्नता व्यवहार । शेवटीं हे जालासी ।। २ ।। एका जीवावरी । होतो दोनी कुटुंबारी ।। ३ ।। [ ३६३७ ]. माझें नेलें पांघरूण । ठावें असोनि दुर्बळ दीन । माणसांमधून । उठविलें खाणोऱ्या ।। २ ।। [ ३६३३ ]. आंधळ्याची काठी । माझी गुदरसीच ना ।। ३ ।। [३६३५]. माझें बुडविलें घर । लेकेंरें बाळें दारोदार । लाविला कहार । तारातीर करोनी ।। २ ।। [३६३६]." सारांश, तुकोबांचें ओझें घरावर नव्हतें तर तेच संसाराचें ओझें घेऊन होते. गांवढ्या गांवांतील शेती व सावकारींत किंवा दुकानदारींत वडील माणसाचा किती अल्प वेळ खर्च होतो हें गांवढ्या गांवांत राहाणारांसच समजेल. अडीअडचणींखेरीज फारसें करावयाचें नसतेंच. एकंदरींत तुकोबांनीं आपला परमार्थ चोखपणें साधून, पूर्ण विरक्त राहून संसार केला, घरदार राखलें, हें त्यांचा भाऊच सांगत आहे. त्यांच्या निर्याणानंतर जिजाईनेंहि तें कांहीं दिवस चालविलें. परंतु कान्होबा त्यांना सोडून सुदुंबऱ्यास गेल्यावर त्यांची हलाखी झाली असें जिजाईच्यीं मुलेंच सांगतात. संसार, घरदान, कर्जरोख्यांचें निर्दालन वगैरे सर्व कल्पनासृष्टींतील गोष्टी असाव्यात.

तुकोबांचा निर्याण काल [शास्त्रमान्य] "शके १५७१ विरोधी संवत्सर फाल्गुन वद्य ५ मी सोमवार"* हा होय. त्यांचे पुत्रपौत्र फाल्गुन वद्य ५ मीसच पुण्यतिथि साजरी करीत. इ. स. १७७५ नंतर द्वितीया ते पंचमीपर्यंत उत्सव होऊं लागला. अर्थात्च द्वितीयेचे उल्लेख उत्तरकालीन लेखनांत येऊं लागले. मात्र पंचमीची द्वितीया करतांना सोमवारचा शनवार

* घोडेगांवकर वहींतील शकावली, पृ. ७०, शिवचरित्रप्रदीप, सं. स. वि. दिवेकर, भा. इ. सं. मंडळ पुरस्कृत ग्रंथमाला, क्र. ४, पुणें १९३०.

करणें राहून गेलें. अशा चुका नेहमीं सहजासहजीं होतात. नंतर मात्र अशा चुकीवरून बऱ्याच चुकीच्या कल्पना रूढ होतात इतकेंच. तुकोबांच्या निर्याणाबद्दलची नारायणबावांनीं इ. स. १७०४ त दुसऱ्या शिवाजीस दिलेल्या माहितींत " तुकोबा गोसावी-देहू-येथें भगवत् कथा करतां आद्रश जाले हे गोष्टी विख्यात आहे " असें आहे. बहिणाबाई त्या वेळीं देहूसच होती. ती म्हणते कीं, " तुकारामा तंव देखतां देखत। आलें अकस्मात मृत्युरूप ।।३।।" [ ७४ ]. नंतर कांहीं वर्षांनीं काढलेल्या शुद्धि-पत्रांत ' गुप्तरूप ' असें म्हटलें आहे. ही शब्दयोजना भाषेनें जुळत नाहीं. मूळ शब्दच अधिक स्पष्ट कल्पना देणारा अर्थानें त्या चरणांत बसणारा आहे. तुकोबांचा देह पंचमहाभूतांत एकदम विरला, निमाला असेंच तिला सूचवावयाचें आहे. तत्कालीन रामेश्वरभट निर्याणाचे वेळीं देहूस नव्हते. ते लिहितातः " मागें कबीश्वर झाले थोर थोर। नेलें कलेवर कोण सांगा ।।१०।। म्हणे रामेश्वर सकळां पुसोनी। गेला तो विमानीं बैसोनियां ।।११।।". विमानांतून गेले म्हणून म्हणण्याची प्रथा फार पूर्वींची आहे. यांतील शब्दांचा वाक्यार्थच घ्यावयाचा असतो. मुख्य मुद्दा 'कलेवरांचा' होय. त्यांचा देह हातीं लागला नाहीं हें या वरून स्पष्ट आहे. नारायणबावांच्या व बहिणाबाईच्या म्हणण्याला त्यांचा दुजोराच आहे. तुकयाबंधु लिहितातः " लालुचाइसाठीं बळकाविसी भावा। परि मी जाण देवा जिरों नेदी ।।१।। असो द्या निश्चय हा मनीं मानसीं। घातली यंविशी दृढ कास ।।२।। मज आहे बळ आळीचें सबळ। फोडीन अंतराळ हृदय माझें ।।३।। करुणा रतें तुकयाबंधु म्हणे भुलवीन। काढूनि घेईन निज वस्तु ।।४।। [३६२९]. जालासी कोठोनी। पैदा चोरा देहाच्या ।।३।। [३६३३]. जीव आमुचा नेला। अंत पाहिला कांहीं तरी ।।४।। [ ३६३२]. आतां श्रमाचें कारण। न व्हावें उदासीन। न पडे तयावीण। गांठी तुकयाबंधु म्हणे ।।४।। [३६४९]. " आपला भाऊ सत्यार्थानें ब्रम्हस्वरूपांत लीन झाला म्हणून अभिमानास चढण्याची कान्हो-बाची तेव्हां मनःस्थिती नव्हती. तो मायातीत नव्हता. वनांतरीं गेले म्हणून

साहजिकच शोध केला. आदृश होणें ही योगमार्गातील शेवटची दुर्घट पायरी मानण्यांत येते हें निश्चित. रंगनाथस्वामीहि याच तुकोबांच्या प्रसंगाला अनुलक्षून लिहितातः 'अदृश्य मरण योग्यांचे निजरंगीं अघटित घर्म ॥६॥'. परंतु या घटनेचें कचेश्वरांनीं आपल्या तुकोबावरील आरतींत फारच उत्कृष्ट रीतीनें वर्णन केलें आहे :'संतांत कीर्ति केली, कुडी सायोज्जीं नेली। आश्चर्य थोर केलें, जना देख दाविली ॥२॥". बृहदारण्यक श्रुति कण्व-शाखेमध्यें " याज्ञवल्क्येति होवाच यत्रायं पुरुषो म्रियत उदस्मात्प्राणाः क्रामन्त्याहो । नेति नेति होवाच याज्ञवल्क्योऽत्रैव समवलीयन्ते ॥ अत्र ब्रह्म समश्नुते ॥" त्याचप्रमाणें इतरत्र 'तानि परे तथा ह्याह ॥", " भोगेन त्वितरे क्षपयित्वा संपद्यते" "न तस्य प्राणा उत्क्रामंति इहैव स विलीयते", "ब्रह्मविदाप्नोति परम्." इत्यादि वचनांनीं परासिद्धि सांगितली असून परम गतीचें महत्त्व प्रतिपादलें आहे. निष्कामकर्में ईश्वरार्पण करून सत्त्वशुद्धि झाल्यानें ज्यास परममुक्ति मिळते त्यांस पुनर्जन्म नाहीं. " हिलाच सायो-ज्यता मुक्ति-तुज सांगितली निगुती । तेथें नाहीं पुनरावृत्ती । कदापि पै॥" म्हणून विवेकसिंधूंत म्हटलें आहे. रामदासहि दासबोधांत सांगतात कीं, "निर्गुणीं अनन्य असतां। तेणें होय सायुज्यता। सायुज्यता म्हणजे स्वरूपता। निर्गुणभक्ति ॥" एकनाथी भागवतांतहि सायुज्यतेबद्दलच्या विवरणांत जीं लक्षणें दिलीं आहेत त्यांत असें म्हटलें आहे कीं, " सांडूनी देहाची विषयासक्ती । जो करी भावें अभेदभक्ती । त्यासीचि सायुज्यमुक्ती । जाण निश्चितीं उद्धवा॥ जेवढी मज आत्म्याची व्यक्ती । तेवढीच त्याची प्रतिति। त्यासीच सायुज्य मुक्ती । सहज आपैती उद्धवा ॥ मीच एक एकला । एकपणेंचि संचला । ज्यासि द्वैताचा दुकाळ पडिला । सत्य पावला सायुज्या ॥ असो. रामायणांत सत्यवती, त्रिशंकू, लक्ष्मणादिकरून व महाभारतांत धर्मराजांचे ' सशरीरो दिवंगतः 'चीं उदाहरणें आहेत. कबीर, गुरु नानक, जंगली महाराज, वगैरेंचीं मृत शरीरें अदृश्य झाल्याचे दाखले आहेत. तिरुपन्न माणिक्य मायकर सदेह हरिरूप झाल्याच्या

कथा आहेत. तुकोबांसारखे कृष्णरूपांत दिसणारे गोरांग चैतन्य प्रभु तुकोबांच्या सारखेच शंभर वर्षांपूर्वी अदृश्य झाल्याचा दाखला आहे. रामकृष्ण परमहंसाचे चरित्रांत कायापालटेचें व अदृश्य झाल्याचीं उदाहरणें आहेत, तरी सुद्धां हा प्रश्न प्रत्यक्ष अनुभवाभावीं विवादात्मक राहणारच. परंतु जेव्हां योगबलाचा आधुनिक शास्त्रज्ञ शास्त्रातीत म्हणून उल्लेख करून जितपत्रें देतात तेव्हां तुकोबांना वैकुंठीचें माहेरचें भातुकें येतांच त्यांची काया पंचमहाभूतांत विलीन होऊन त्यांचा आत्मा परमात्म्यांत सायुज्य पावला असें मानण्यांत कांहीं अवास्तवता आहे असें नाहीं. हीच त्यांची कीर्ति व महती. अखिल मानवसृष्टींत अमर होण्याची ही एक दुर्घट परीक्षा. हिलाच श्रुतींत व योगांत परा मुक्ती म्हणतात. आणि ही चवथी श्रेष्ठ मुक्ती साधल्यानें तुकोबांचें श्रेष्ठत्व संतांना व योग्यांना आश्चर्यभरानें वंदावें लागलें.

तुका मुक्त झाला या मार्गे जो गेला । तोचि या जनाला उपदेश ॥

[ गी. १९७ ].

५. <u>गीतानुवाद व उपलब्ध नकला</u> :– तुकाराम महाराजांच्या अभंगात्मक भगवद्गीतानुवादाची त्यांची मूळ प्रत अद्यापि मिळाली नाहीं. या अभंगात्मक गीतापोथीच्या उत्तर पेशवेकालीन नकला व हा अनुवाद अंतर्गत केलेल्या निरनिराळ्या 'भगवद्गीताटीकेच्या' तीन हस्तलिखित स्वतंत्र प्रती हातीं आल्या. गीताटीकेच्या भिन्नभिन्न आवृत्त्या किंवा टीकासमुच्चय बरेच आढळतात. त्यांचें संशोधन झाल्यास आणखीहि कांहीं प्रती सांपडणें संभवनीय आहे. आतांपर्यंत अशा टिप्पण्या व तुकोबांच्या अनुवादाचीं दहा प्रकाशनें माझे हातीं आलीं. त्यांची माहिती पुढें येणारच आहे. आणखीहि कांहीं प्रकाशनें झालीं असण्याचा संभव आहे. शोध करणें प्राप्त आहे.

अ.–' ज्ञानचंद्रोदय ' नांवाचें मासिक १८३८ इ.पासून प्रसिद्ध होत असावें. या मासिकांत 'गीतार्थबोधिनी' नांवाच्या भगवद्गीतेवरील टीकाग्रंथास प्रथम प्रसिद्धि मिळाली. हा 'ज्ञानचंद्रोदय' गणपत कृष्णाजी यांचे

शिळा छापखान्यांत ( बोरीबंदरचे लैनीजवळ, बाबदेवाचे आळींत ) मुंबई येथें प्रकाशित होत असे. या मासिकांत 'गीतार्थबोधिनी' खंडशः प्रसिद्ध झाली. प्रसिद्धीचा तपशील येणेंप्रमाणें :–

| अंकाचा मास शक संवत्सर | इंग्रजी सन व महिना | अध्याय क्रमांक | अभंग संख्या | |
|---|---|---|---|---|
| शके १७६३ | इ. स. १८४१ | | | |
| वैशाख | मे | १ | ४५ | |
| जेष्ठ | जून | २ | ७२ | |
| आषाढ | जुलै | ३ | ४३ | |
| श्रावण | आगष्ट | ४ | ४२ | |
| भाद्रपद | आक्टोबर | ५ व ६ | ७६ | |
| आश्विन | नवंबर | ७ व ८ | ६० | |
| कार्तिक | दिसेंबर | ९ | ३५ | |
| | इ. स. १८४२ | | | |
| मार्गशीर्ष | जानेवारी | १० | ४३ | |
| पौष्य (क्षय) | फेब्रुवारी | ११ | ५८ | |
| माघ | फेब्रुवारी | १२–१३ | ५६ | |
| फाल्गुन | मार्च | १४–१५ | ४९ | |
| शके १७६४ | | | | |
| चैत्र (अ) व चैत्र | मे | १६–१७ | ५४ | |
| वैशाख | जून | १८ | ७९ | |
| | | एकूण | ७१२ | ३२६ पृष्ठें |

या 'गीतार्थ बोधिनी'च्या प्रकाशनास ग्रंथ ३ रा म्हणून संबोधलें आहे व ह्या ग्रंथ प्रकाशनाचें काम इ. स. १८४१ च्या मे महिन्यांत सुरू झालें. या गीतार्थबोधिनींत सर्व संस्कृत श्लोकांचा अनुवाद आहे. ही प्रत "मुंबईत सदाशिवशास्त्री सातासकर आणि पाडुरंग जोशी पावसकर यांनीं शुद्ध करून

सखाराम अमनाजी याचें हस्तें लिहवून गणपत कृष्णाजी यांचे शिला छापखान्यांत छापली.' या प्रतींत पदपाठ दाखविले असले तरी शब्द तोडले नाहींत. चरणांतील अक्षरें जोडूनच लिहिलीं आहेत. या 'गीतार्थबोधिनीं'त वामन पंडिताची टिप्पणी अध्यायाचे सुरवातीस दिली असून नंतर संस्कृत श्लोक, त्या श्लोकांची वामनपंडितांची समश्लोकी, मोरोपंतांची आर्या, तुळसीदासाचा दोहरा, मुक्तेश्वराची ओवी व तुकोबांचे अभंग याप्रमाणें मूळ गीतापाठ दिला आहे. सुरुवातीचे विषयप्रवेशाचा अभंग फक्त ११व्या अध्यायांतच आहे. शेवटचे मात्र ६-१८ अध्यायांतील सर्व आहेत. समाप्ती 'इति श्री गीतार्थबोधिन्यां श्रीभगवद्गीताटीकायां अष्टादशाध्यायः। इति श्री गीतार्थबोधिनी समाप्त :' म्हणून केली आहे. मूळ प्रतीची माहिती चंद्रोदयांत आली नाहीं. परंतु या चंद्रोदयाचा उद्देश* मलपृष्ठावर दिला आहे. त्यावरून हा ग्रंथ जुन्या हस्तलिखित बाडांवरून शुद्ध करून छापला असावा असें सहजच अनुमान होतें. हा मूळ ग्रंथ कोणीं व केव्हां तयार केला हें आणखी कांहीं हस्तलिखित प्रती मिळाल्यानंतर समजणें शक्य होईल. सध्यां अनुमानावरच भागवणें प्राप्त आहे.

या खंडशः प्रसिद्ध झालेल्या प्रतीची प्रथमावृत्ति याच छापखान्यांतून शके १७६४ (इ. स. १८४२) त प्रसिद्ध झाली. हीहि सदाशिवशास्त्री सातारकर व पांडुरंग जोशी पावसकर यांनीं शुद्ध केली. नंतर या ग्रंथाची द्वितीयावृत्ति विसाजी भास्कर भागवतांनीं शुद्ध करून याच छापखान्यांत शके १७८३ (इ. स. १८६१) त छापली. यांत प्रत्येक अध्यायाला स्वतंत्र पृष्ठक्रमांक दिले आहेत. इ. स. १८७०त याच छापखान्यांतून

---

* "हा ज्ञानचंद्रोदय नूतनग्रंथाचे कागद शिळा छापावर छापणार... याचे कागद...होतील. त्यांमध्यें एकेका कागदांत प्राचीन साधूंनीं केलेले चरित्र भाग ...व दुसऱ्यां राहिलेल्या कागदांत चमत्कारिक प्राकृत ग्रंथ छापले जातील."

चतुर्थावृत्ति* बाहेर पडली. हा ग्रंथ पुस्तक-रूपांत असून याची पृष्ठसंख्या ६७१ आहे.

गणपत कृष्णाजीच्या चतुर्थ आवृत्तीचें पुनर्मुद्रण इ. १८७७त काशिनाथ वासुदेव खांडेकर यांनीं जगदीश्वर छापखान्यांत छापवून केलें. हा ग्रंथ पोथीरूपांत असून सुरुवातीस एक चित्र व 'श्लोक' 'आर्या' 'दोहरा' 'अभंग' वगैरे मथळे डोक्यावर न छापतां बाजूस दिले आहेत. बाकी पुस्तकाच्या नांवापासून तों थेट समाप्तिपर्यंतचा मजकूर इ. १८७०च्या आवृत्ती-सारखाच आहे. प्रकाशनाची तिथि "पौष वद्य १० भौमवार शके १७९८, सन १८७७ इसवी" अशी दिली आहे. पृष्ठसंख्या ४४४.

इ. स. १८८१त गीतार्थबोधिनीची सहावी आवृत्ति पुणें येथें रा. श्री. गोंधळेकर यांनीं आपल्या जगद्धितेच्छु शिळाछापखान्यांत छापून प्रसिद्ध केली. या आवृत्तीची पृष्ठसंख्या ३५३ होती. सातवी आवृत्ती इ. स. १८८५त बाहेर पडली. ही पुणें येथील वेदांतप्रकाश शिळाछापखान्यांत काशिनाथ महादेव थत्ते यांनीं प्रसिद्ध केली. पृष्ठसंख्या ३४४ होती.

या सातहि आवृत्त्यांचा विशेष म्हणजे त्या मूळ चंद्रोदयांत छापलेल्या प्रतीच्या नकला असून त्यांत शब्द तोडण्याचा प्रयत्न केलेला नाहीं व विशेष माहितीहि मिळवून जोडली नाहीं. हीं सर्व निव्वळ पुनर्मुद्रणें आहेत.

या प्रती माझ्या हातीं फार उशीरा आल्या. त्यामुळें पहिल्या आठ अध्यायां-पर्यंत यांतील पाठ दर्शवितां आले नाहींत. नतर प्रत ८ म्हणून या गीतार्थ बोधिनींतील अभंगानुवादाचा उल्लेख केला आहे. ही व केळुसकर यांची प्रत सारखीच असल्यानें प्रत ४चा पाठ या प्रत ८लाहि लागू पडतो असें समजण्यास सामान्यपणें हरकत नाहीं.

---

* "गीतार्थबोधिनी म्हणजे मूळ गीतेवर समश्लोक, आर्या, दोहरा, ओवी आणि अभंग अशा पांच प्रकारच्या टीका आहेत. हा ग्रंथ मुंबईमध्यें गणपत कृष्णाजी यांच्या छापखान्यांत एक्झिक्यूटर्स यांच्या हुकुमाने बा. कृ. दु. यांनीं छापून प्रसिद्ध केला. शके १७९२, इसवी १८७०."

आ. : तुकारामतात्या यांनीं आपली तुकोबांची बृहत् गाथा इ. स. १८८९त छापून प्रसिद्ध केली. या गाथेच्या दुसऱ्या भागांत* पृ.४४९ ते ५५६ वर तुकोबांचा गीतानुवाद दिला आहे. त्यांतील अभंगानुक्रमांक ७२३५ व ७२३६ यांत गीताप्रशस्ती असून ७२३७ ते ७९५३ पर्यंत गीतानुवाद व ७९५४त प्रार्थना आहे. म्हणजे यांत एकंदर ७२० अभंग समाविष्ट झाले आहेत. गीतार्थबोधिनीपेक्षां या प्रतींत गीतानुवादांतील अभंग क्रमांक ४९८, ४९९, ५६४, ६१२ व ६४२ असे प्रारंभींचे पांच, प्रशस्तीचे दोन व प्रार्थनेचा एक असे आठ अभंग अधिक आहेत. ही प्रत गीतार्थबोधिनीचीच नक्कल दिसते. मात्र यांत शब्द तोडून अभंग दिले आहेत. या प्रकाशित प्रतीला संदर्भांत प्रत ७ म्हणून उल्लेखिली आहे. हाहि ग्रंथ माझे हातीं फार उशिरां आला. त्यामुळें पहिल्या आठ अध्यायांत या प्रतीचे पाठ समाविष्ट करतां आले नाहींत. ही प्रत केळुसकरांच्या प्रतीसारखीच असल्यानें त्या प्रतींतील पाठभेद हे याहि प्रतींतील होत असें समजण्यास हरकत नाहीं. तुकारामतात्यांनीं हे अभंग कोणत्या प्रतीवरून घेतले याचा निर्देश केलेला नाहीं.

इ. : 'आध्यात्मिकज्ञानरत्नावलीं'त† इ. स. १८९७ ते १८९९ च्या अंकांतून जी 'श्रीमद्भगवद्गीता' प्रसिद्ध झाली आहे, तिच्या टीकेंत तुकाराम महाराजांचा अभंगात्मक अनुवाद स्वतंत्रपणें कै. कृष्णराव अर्जुन केळूसकर यांनीं प्रसिद्ध केला. या प्रकाशनांत 'श्रीमद्भगवद्गीतें'तील मूळ

---

* "श्री. तुकारामबावा आणि त्यांचे शिष्य यांच्या अभंगांची गाथा"– तुकारामतात्या यांनीं तत्त्वविवेचक ग्रंथ मंडळीसाठीं छापून प्रसिद्ध केला. भाग दुसरा, सन १८८९; सुबोध प्रकाश छापखाना, मुंबई.

† "आध्यात्मिकज्ञानरत्नावलि [अध्यात्मविद्येचा लाभ आणि त्यांतच आयुष्याचा विमा] मासिक पुस्तक, प्रकाशक एल्. पी. नागवेकर आणि कंपनी, काळबादेवी रस्ता, सुबोधप्रकाश छापखाना, मुंबई," अंक १ ते १२ प्रतिवर्षीं, वर्ष १,२,३ व ४ [फेब्रुवारी १८९७ ते १८९९].

श्लोक, अन्वय, पदच्छेद, पदांचा अर्थ, सरलार्थ टीका, वामन पंडितांची फक्त समश्लोकी, मोरोपंतांची आर्या, मुक्तेश्वरांची ओवी व तुकारामांचा फक्त श्लोकानुवाद आणि उद्धवचिद्धनांची सवाई अशीं प्रत्येक श्लोकाखालीं दिलीं आहेत. या खंडशः प्रसिद्ध झालेल्या 'श्रीमद्भगवद्गीते'चीं पानें स्वतंत्र बांधूनहि इ. स. १८९९–१९००त पुस्तक-रूपांत प्रसिद्ध झालीं. त्यानंतर या ग्रंथाची द्वितियावृत्ति* इ. स. १९३०त दामोदर सावळाराम आणि मंडळीनें मुंबई येथें प्रसिद्ध केली. या टीकेंत तुकाराम महाराजांचे ६९८ अभंग ग्रथित केले आहेत. परंतु या अभंगात्मक किंवा उपयोगांत आणलेल्या इतर अनुवादांची माहिती या दोन्हीहि आवृत्तींत दिलेली नाहीं. दुसऱ्या आवृत्तींत ८१० पृष्ठें आहेत. द्वितीयावृत्तींत थोडे फार शाब्दिक फेरफार केले आहेत. चौकशी अंतीं असें समजलें कीं, कै. केळुसकर यांनीं ही 'श्रीमद्भगवद्गीता' टीका खिस्ती मिशनकडून मिळालेल्या एका हस्त-लिखित टिप्पणीच्या आधारें संपादली. या पांच टीकासमुच्चयाची एक हस्तलिखित परंतु आधुनिक प्रत मला पाहावयास मिळाली. या प्रतीवरून ही छापील प्रत तपासली. किरकोळ फरकांशिवाय त्यांत कांहीं अधिक उणें सांपडलें नाहीं. कै. केळुसकर हे विल्सन हायस्कूलमध्यें मराठीचे शिक्षक होते. बहुधा त्यांनीं वापरलेली प्रत डॉ. विल्सनचे संग्रहांतील असावी. डॉ. विल्सन, कॅ. साइक्स, रेव्ह. मरे मिशल यांनीं एकोणिसावे शतकाचे पूर्वार्धांत तुकाराम, चिंचवडकर देवादिकांची माहिती

---

* "सान्वय-सार्थ सटीक 'श्रीमद्भगवद्गीता"—मूळ श्लोक, अन्वय, पदच्छेद, पदांचा अर्थ, सरलार्थ, टीका, वामनाची समश्लोकी, मोरोपंतांची आर्या, मुक्तेश्वरांची ओवी, तुकारामांचा अभंग आणि उद्धवचिद्धनांची सवाई–पांच प्राचीन संत कवींचा पद्यमय अर्थ आणि श्लोकसूचि यांसह–संपादक श्रीयुत कृष्णराव अर्जुन केळूसकर, प्रकाशक दामोदर सावळाराम मंडळी, ३८० ठाकूरद्वार, मुंबई २, ग्रंथ संपादक व ग्रंथ प्रकाशक मंडळाची आर्यधर्म ग्रंथमाला, ग्रंथ १ ला, द्वितियावृत्ति, शके १८५२, सन १९३० इसवी.

देहू-चिंचवडहून मिळविली होती. कदाचित् देहूच्या वह्या यांचे अगर इतर एकाद्या मिशनच्या संग्रहांत मिळणें संभवनीय आहे. प्रयत्न झाला पाहिजे. या गीताटीकेच्या दोन छापील प्रती व पडताळून पाहिलेली हस्त-लिखित प्रत या एकाच अनुवादाच्या गीताटीकेच्या नकला असल्यानें या तीहींतील अनुवादाला माझ्या टिपांत संदर्भासाठीं प्रत ४ म्हणून संबोधलें आहे. तसें पाहिलें तर गीतार्थबोधिनी, तुकारामतात्या व केळुसकरांच्या प्रतींत फारसे महत्त्वाचे पाठभेद नाहींत. शब्दलेखनांतच विशेषतः भिन्नत्व दिसतें. सकृद्दर्शनीं तुकारामतात्यांनीं गीतार्थबोधिनीवरून आपले अभंग घेतले म्हणावे तर त्यांनीं त्यांत ८ अधिक अभंगांची भर टाकली आहे. तेव्हां तुकारामतात्यांसमोर गीतार्थबोधिनीच्या छापील प्रतीपेक्षां निराळी प्रत होती यांत संशय नाहीं. शब्द तोडून अभंग छापले आहेत. हा तुकारामतात्यांचा विशेष दिसतो. कै. केळुसकरांसमोर या दोन्हींहि प्रती असणें संभवनीय होतें. परंतु जर गीतार्थबोधिनीचेच टीकापाठ घ्यावयाचे तर तुळशीदास गाळून उद्धवचिद्धनांची सवाई घालण्याचें कारण नव्हतें. उद्धवचिद्धन अधिक घालतां आला असता. दोन अगर अधिक लेखकांचे अनुवाद एकत्र करून गीतेच्या टीकांचीं पुष्कळ हस्त-लिखितें उपलब्ध आहेत. अशा तऱ्हेचा समुच्चय करण्याचा परिपाठ एकोणिसाव्या शतकांत विशेष आस्थेनें केला जात होतासें दिसतें. सारांश केळुसकरांनीं छापील प्रतीवरून आपला ग्रंथ तयार केला असें म्हणण्याचें कारण दिसत नाहीं. शिवाय केळुसकरांसमोर या छापील पुस्तकांपैकीं एखादेंहि पुस्तक असतें तर शेवटचे अभंग त्यांना देतां आले असते व त्यांच्या अनुवादांतील बऱ्याच चुका व दोष सुधारले गेले असते.

ई : दहावी छापील पण स्वतंत्र गीतानुवादाच्या त्रुटित पोथीवरून घेतलेली प्रत चापेकर देसाई आणि मंडळीनें प्रकाशित केलेल्या तुकाराम महाराजांच्या गाथेंत शेवटीं दिली आहे.* यापूर्वी प्रकाशित झालेल्या प्रती जर या प्रकाशकांना ठाऊक असत्या तर त्यांनीं आपली प्रत पूर्ण करण्याचा

---

* पृ. ४८९ ते ५४३, "साधुवर्य तुकाराम महाराज यांच्या ५००० अभंगांची गाथा" सचित्र, भाग, १ व २, प्रकाशक चापेकर देसाई आणि मंडळी, माधवबाग, इंदुप्रकाश छापखाना, मुंबई, १९०५ इसवी.

सहज साध्य प्रयत्न अवश्य केला असता. परंतु ज्याअर्थी तसा प्रयत्न झाला नाहीं त्याअर्थी चापेकर देसाईंनें कोणत्यातरी अर्धवट हस्तलिखित प्रतीचा उपयोग केला असावा असें अनुमान केल्यास चूक होणार नाहीं. त्यांना 'गीतार्थबोधिनी'चें व ' अध्यात्मज्ञानरत्नावली 'चें अस्तित्व माहित नसावें हें उघड आहे. त्यामुळें जे अभंग सांपडले ते एका सबंध गीतापोथीची अर्धवट नकल आहे हें त्यांचे ध्यानांत आलें नसावें. या अनुवादाचें लेखन एक स्वतंत्र पोथी म्हणूनच केलें गेलें असावें यांत संशय घरण्याचें कारण उरत नाहीं. ही प्रत मात्र एखाद्या त्रुटित बाडांतून घेतली असावी. इतकेंच नव्हे तर गीतेंतील श्लोकांच्या अनुसंधानानें त्या त्या अभंगास संदर्भ क्रमांक न देतां प्रत्येक अध्यायांत सांपडले तितक्याच अभंगांस सरळानुक्रमांक दिला आहे. या अपूर्ण प्रतींतील ४०० अभंगांची अध्यायवारी व गळलेल्या अभंगांची वर्गवारी पुढें दिली आहे :

| गीताध्याय क्रमांक | चापेकर देसाईंची अभंग संख्या | चापेकर-देसाई प्रतींत गळलेल्या अभंगांचे या पुस्तकांतील क्रमांक | | | | कमी असलेल्या अभंगांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| | | गीतानुवाद | प्रारंभींचे | उपसंहाराचे | अधिक | |
| १ ला पूर्ण | ४५ | ... ... | ... | ... | ५ अ<br>५ आ | २ |
| २ रा पूर्ण | ७२ | ... ... | ... | ... | ... | ... |
| ३ रा | ३९ | १३९, १४०, १४१ व १४६. | ... | ... | ... | ४ |
| ४ था | ३९ | १९१, १९२ व १९५. | ... | ... | ... | ३ |
| ५ वा | २४ | २२७,२२८, २२९, २३० व २३१. | ... | ... | ... | ५ |
| ६ वा | १२ | २३२ व २४५ ते २७८. | ... | ... | ... | ३५ |
| ७ वा | १४ | २९३ ते ३०८. | ... | ३०९ | ... | १७ |
| ८ वा | १६ | ३२६ ते ३३७. | ... | ३३८ | ... | १३ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १० वा | ८ | ३७४,३७५, ३७६, ३७९,३८०, ३८२ ते ३९३, ३९५ ते ४०५,४०७ते४११, ४१३ व ४१४. | ... | ४१७ | ४१२ | ३६ |
| ११ वा | ७ | ४१८ते४२२,४२४, ४२५, ४२६, ४२८ ते ४३२, ४३४ ते ४४३, ४४६ ते ४४९,४५१, ४५२, ४५४ ते ४५८ व ४६० ते ४७४. | ४१८ | ४७५, ४७६ | ४५३ | ५२ |
| १२ वा | ५ | ४७७,४७९,४८०, ४८१,४८३,४८५, ४८७ ते ४९२, ४९४ व ४९६. | ... | ४९७ | ... | १६ |
| १३ वा | ४ | ४९९, ५००, ५०२ ते५०६,५०८,५१० ते ५१३ व ५१५ ते ५३३. | ४९८ | ५३४ | ... | ३२ |
| १४ वा | ४ | ५३७ते५४२,५४४ ते ५४६ व ५४८ ते ५६१. | ५३५ | ५६३ | ... | २५ |
| १५वा पूर्ण | २० | ... ... | ५६४ | ५८५ | ... | २ |
| १६ वा | ८ | ... ... | ५८६ | ६११ | ... | १९ |
| १७ वा | ६ | ... ... | ६१२ | ६४१ | ... | २४ |
| १८ वा व प्रशस्ती | ४२ | ... ... | ... | ... | ... | ४० |
| एकूण | ४०० | ३०२ | ८ | ११ | ५ | ३२६ |

याशिवाय कित्येक अभंगांतील चरण गळलेले आहेत. ह्या प्रतींत शब्द तोडलेले आहेत व पाठ बरेच चांगले आहेत. ते अर्थबोधाला धरून आहेत. या प्रतींत नवव्या अध्यायाचे उपसंहाराचा अभंग केळुसकर प्रतीपेक्षां अधिक आहे. या प्रतीचा संदर्भ क्रमांक प्रत ६ म्हणून उल्लेखला आहे.

उ : तुकाराम महाराजांच्या गीतानुवादाचें प्रकाशन इ. स. १९३५ नंतरच्या श्रीमद्भगवद्गीतेवरील मराठी टीकांच्या बृहत्समुच्चयांत* होण्याची संधी आली होती.या योजनेप्रमाणें हा बृहत्टीका ग्रंथ ८००० पृष्ठांचा व १६ भागांचा व्हावयाचा होता.परंतु आतांपर्यंत पहिल्या अध्यायाचा एकच भाग निघाला आहेसें दिसतें.माझ्या हातीं या ग्रंथाचे सुटेच कागद आले. पहिल्या अध्यायाचीं २४२ पृष्ठें असून नंतर ५-६ पानें परिशिष्टें असावींत. या पहिल्या अध्यायांत मूळ श्लोक व त्याखालीं टीका आहेत त्याः (१) यादव प्रभाकर वटक [ गीतार्थप्रभाकर ]; (२) ज्ञानेश्वर [ ज्ञानेश्वरी, ज्ञानदेवी किंवा भावार्थदीपिका ]; (३) वामनपंडित [ यथार्थदीपिका ]; (४) रंगनाथ ( मोगरेकर ) [चित्सदानंदलहरी]; (५) रमावल्लभदास [ चमत्कारी]; (६) निवृत्तिदेव [ निवृत्तिदेवी ]; (७) सोपानदेव [ सोपानदेवी ]; (८) उद्धवचिद्धन [ सवाई समश्लोकी ]; (९) तुकाराम [ अभंग ]; (१०) दासोपंत [गीतार्णव]; (११) दासोपंत [गीतार्थबोधचंद्रिका]; (१२) माधव (नारायणदास ) [ नारायणकीर्ति ]; (१३) मुक्तेश्वर [ मुक्तेश्वरी ]; (१४) दासोपंत [ आर्या समश्लोकी ]; (१५) रत्नाकर [रत्नाकरी ]; (१६) वामन शांडिल्य [ अनुष्टुप् समश्लोकी ]; (१७) अच्युताश्रम [ बालबोधिनी ]; (१८) वामन द्विजोत्तम; (१९) हरिपंडित [ गीतार्थप्रकाश ]. या ग्रंथमालिकेच्या जाहीरपत्रकांत तुकाराम महाराजांचे अभंग ६९८ येणार असून ते छापील प्रतीवरून घेतले असें लिहिलें आहे. अर्थात् हे कै. केळुसकरांच्या 'भगवद्गीतेंतून' घेतले असणार. पहिल्या अध्यायाचे अभंग या प्रतीशीं ताडून पाहतां ते केळुसकरांच्याच प्रतीबरोबर जुळतात. वर दर्शविल्याप्रमाणें

* "श्रीमद्भगवद्गीता," संपादक : रामचंद्र स्वामीराव नाईक, जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर व कल्याण श्रीराम अंबेवाडीकर; प्रकाशक : रामचंद्र स्वामीराव नाईक, १६९३ बोगार वेस, बेळगांव.

६९८ ही संख्या फक्त केळुसकर प्रतीचीच आहे. त्यामुळें या प्रतीला स्वतंत्र संदर्भांक न देतां प्रत नंबर ४ मध्येंच हिचा समावेश केला आहे.

ऊ : तुकाराम महाराजांच्या चरित्रासाठीं जुन्या काव्येतिहास वाङ्मयाचा शोध घेत असतां 'रामदास रामदासीं'तील* जुन्या बाडांची यादी तपासली. ही यादी प्रथमतः जरी 'रामदास रामदासीं'तून खंडशः प्रसिद्ध झाली असली तरी ती नंतर दोन भागांत ग्रंथरूपांत उपलब्ध केलेली आहे. या यादींत तुकोबांच्या अभंगात्मक अनुवादाची प्रत† असल्याचें आढळलें. याशिवाय आणखीहि फक्त बाराव्या अध्यायाच्या एका प्रतीचा‡ उल्लेख सांपडला. हा अध्याय टाकळी संग्रहांतील असल्याचें दिसून आलें. त्यावरून धुळ्यास जाऊन श्रीसमर्थवाग्देवता मंदिरांतील या दोन प्रतींचें संशोधन केलें. श्रीयुत शंकरराव देवांसारखा संशोधनास अपेक्षे-बाहेर उत्तेजन, सवलत व साहाय्य देणारा तपस्वी त्यांचेच पिढीत लाभेल! त्यांची आपुलकी, अव्याहत काम करण्याची तळमळ, कार्यांतील चिकाटी व संशोधन करण्यास लावण्याची व मार्गदर्शनाची पद्धत पाहून मला थोडें विरमल्यासारखें झाल्यास नवल कोणतें! त्यांच्या तीन दिवसांच्या सान्निध्यांत मला भारत इतिहास संशोधक मंडळांतील पांडोबा पटवर्धन, तात्यासाहेब मेहेंदळे, खरे शास्त्री, आबा चांदोरकर, यांची सारखी आठवण होत होती. अशी तळमळ व कळकळ यापुढें आढळेल काय? असो. श्री. देवांच्या कृपेनें मला गीतानुवादाची एक पूर्ण प्रत व दुसरी अर्धवट प्रत अशा दोन स्वतंत्र पोथ्या मिळाल्या. त्यांच्यांतील पाठभेद उतरून घेतल्यानंतर इतर बाडें शोधलीं.

---

* 'रामदास आणि रामदासी' मासिक पुस्तक–रामदासी मठांतील संग्रह, वर्ष १२ ते १५, अंक १२५ ते १७९.

† "रामदास आणि रामदासी," अंक १७१, २२ मे १९३७ चा, पृ. ४३५, "चांदोरकर संग्रह"–बाड नंबर १६०५–तुकारामविरचित गीता अभंगात्मक पोथी, पत्रें सुमारें २००."

‡ " रामदास आणि रामदासी ", अंक १३५ वर्ष १२ पृ. ६८–बाड ११, भाग दुसरा, श्रीमद्भगवद्गीता, अध्याय बारावा–तुकारामकृत समअभंगांसह, टाकळी संग्रह.

पहिली प्रत रामदासी बाड नंबर १६०५तील असून तिनें सुमारें ३०० पाठपोट पानें व्यापिलीं आहेत. प्रत्येक अध्यायास स्वतंत्र पृष्ठांक दिला आहे. या पोथींतलि प्रत्येक अध्यायाची पृष्ठ संख्या किंवा पत्रसंख्या अशी :

| अध्याय | पत्र संख्या | अध्याय | पत्र संख्या | अध्याय | पत्र संख्या |
|---|---|---|---|---|---|
| प्रशस्ती | १–४ अ | ७ वा | १२ अ | १४ वा | १२ |
| १ ला | ४ आ २२ अ | ८ वा | ११ अ | १५ वा | ९ |
| २ रा | २९ अ | ९ वा | १४ | १६ वा | १० अ |
| ३ रा | १६ | १० वा | १८ अ | १७ वा | १३ अ |
| ४ था | १६ अ | ११ वा | २५ अ | १८ वा | ३३ |
| ५ वा | १० | १२ वा | ८ अ | | |
| ६ वा | १८ | १३ वा | १३ | एकूण | २८८ |

पहिल्या अध्यायाचीं पहिलें व सातवें अशीं दोन पानें गहाळ आहेत. पहिल्या पानावर गीतामंत्र, बीज, न्यासादि संस्कृत मजकूर असावा. कारण दुसऱ्या पानावर न्यासाचा उत्तर भाग आला आहे. शेवटचें ध्यान पृष्ठ ४–अ वर संपतें. पृष्ठ ४–आ पासून गीतानुवाद सुरू होतो. सातव्या पानावर ६ ते १० अभंग असावेत. ते गहाळ आहेत. या प्रतींत प्रथम गीता श्लोक व त्याखालीं अभंग दिला आहे. प्रत्येक श्लोकाच्या व अभंगाच्या माथ्यावर अगर सुरुवातीस 'श्लोक' अथवा 'श्लो.' किंवा 'अभंग' अथवा 'अ.' असें लिहिलें आहे. कांहीं कांहीं अभंगांच्यापुढें कोठें कोठें 'दिडकी', 'द्विचरणी', 'दुचरणी', 'त्रि.', 'त्रिपादी', 'त्रिचरणीं' 'चरण ३', 'चौ.' अथवा 'चौचरणी' अशा अभंगांच्या चालींचीं किंवा प्रकारांचीं नांवें दिली आहेत. सामान्यतः गीतेची ७०० श्लोकसंख्या मानतात. परंतु या प्रतींत तेराव्या अध्यायाचे सुरुवातीचा पहिला श्लोक* अधिक आहे.

---

* श्लोक क्रमांक०, तेरावा अध्याय, अभंग क्रमांक ४९९.

प्रत्येक अध्यायाच्या शेवटच्या 'इति श्रीमद्भग.' या ऐवजीं सर्वत्र 'हरि ॐ तत्सदिति श्रीमद्भग.' असें लिहिलेलें आहे. याशिवाय मराठींतहि अध्याय-पूर्तीचा मजकूर आहे. आरंभींचा 'श्रीगणेशाय नमः' फक्त ३,५ व १२ व्या अध्यायांत लिहिला आहे; इतरत्र नाहीं. अध्याय ६ व १८ चे प्रारंभीं 'श्रीकृष्णाय नमः', अध्याय ११ व्याचे सुरुवातीस 'श्रीगजवदनप्रसन्न', व अध्याय १३, १४, १५ व १६ व्याचे सुरुवातीस 'श्रीगजाननप्रसन्न' व सतरावे अध्यायाचे प्रारंभीं 'श्रीदत्तात्रयप्रसन्न' असें लिहिलें आहे.

पांचव्या अध्यायांतील 'श्रीगणेशाय नमः' पुढें 'श्रीकुळदेवताय नमः। गीता प्रां' व पंधराव्या अध्यायांतील 'श्रीगजाननप्रसन्ना'नंतर 'श्रीराम' असें आहे. अध्याय १, २, ४, ७, ८, ९ व १० चे प्रारंभीं देवतानमन नाहीं. यावरून तें मूळ प्रतींत नसावें असा तर्क करण्यास जागा आहे. त्याचप्रमाणें जेथें देवतानमन येतें तेथें तें नकलकाराचें असावें. प्रत्येक अध्यायाचे शिरोभागीं "श्रीभगवद्गीता अभंगात्मक...योध्याय" अगर 'प्रा' किंवा 'प्रसंगः' [ अध्याय २, ७ व ८ ] व फक्त ९व्या अध्यायाचे डोक्यावर 'श्री भगवद्गीता अभंग नवम प्रसंग' असें म्हटलें आहे. तसेंच शेवटीं 'इति श्री गीता अभंग...ध्यायः' असें अध्याय १, २, ७, ९ व १०त लिहिलें आहे. अध्याय ३, ४, ५, १२ व १८चे शेवटीं "इति श्रीभगवद्गीता अभंगात्मक...ध्यायः" असें असून 'अभंगात्मक' ऐवजीं 'अभंगकृत' असें ११, १३ व १४ या अध्यायांचे शेवटीं व 'अभंगांकित' असें ६ व १६ व्यांत अध्यायाचे शेवटीं आलें आहे. चवथ्या अध्यायाचे शेवटीं 'अभंगात्मक टीकायां', बाराव्या अध्यायांत 'अभंगात्मक तुकयाकृत', अध्याय १३ व्यांत 'क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम' असे 'त्रयोदशाध्यायः' पूर्वी उल्लेख आले आहेत. त्याचप्रमाणें १५ व्या अध्यायांत अध्यायाचें नांव दिलें आहे. अध्याय ८, १४, १७ व १८च्या पूर्ती पुढें उद्धृत करीत आहें.

अध्याय ८ : 'इति श्री भगवद्गीता अभंगात्मक॥ श्री तुकाराम वाक्य सिद्धांत। अष्टमोऽध्यायसंपूर्णमस्तु ॥ श्री पांडुरंगार्पणमस्तु ॥'

अध्याय १४ : ' इति श्री भगवद्गीता योगशास्त्रे अभंगदीपिके गुणातीतयोगोनाम चतुदर्शोध्यायः।। श्रीकृष्णार्पणमस्तु।।श्री गुरुनाथार्पणमस्तु।।'

अध्याय १७ : ' इति श्री भगवद्गीता श्रीकृष्णार्जुनसंवादे । तुकयाविरचिते त्रिगुणश्रद्धावर्णनोनाम सप्तदशोऽध्यायः ।। १७ ।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।। श्रीरस्तु ।। अभंग संख्या ३० श्लोक संख्या २८ ।।श्रीकृष्णाय नमः।।'

अध्याय १८ वा : ' इति श्री भगवद्गीता अभंगात्मक तुकारामविरचिते अष्टदशोऽध्यायः संपूर्णतायां ।। '

या नकलेच्या लेखनकालाचा निर्देश पुढील उल्लेखांत आला आहे :

"इदं पुस्तकं राजेश्री ———————————— *श्लोक संख्या २७२५† पुस्तक समाप्त लेखन शके १७३४ अंगिरानाम संवछरे आषाढ मास शुक्लपक्ष एकादसी [ २० जुलै १८१२ सोमवार ] समाप्त."

हा उल्लेख सर्व बाडाच्या शेवटीं आहे. ही प्रत नकलेची नकल आहे.

वरील उल्लेखांशिवाय या अनुवादाच्या नकलेंत पहिल्या अध्यायाच्या शेवटच्या पानावर "श्रीकृष्णार्पणमस्तु ।। श्री ।।"; दुसऱ्या अध्यायांतील ५५व्या श्लोकानंतर "श्रीराम"; सहाव्या अध्यायाचे शेवटच्या पानावर "श्रीकृष्णार्पणमस्तु । श्रीदत्तात्रयार्पणमस्तु ।। श्री रामः ।।"; सातव्या अध्यायांतील १६व्या श्लोकानंतर "श्री अवधूत दत्तात्रयः"; आठव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकानंतर "श्रीसांबाय नमः"; नवव्या अध्यायांतील पहिल्या श्लोकानंतर "श्रीरामाय" व शेवटीं "श्रीपांडुरंगार्पणमस्तु"; दहाव्याचे शेवटीं "श्रीद्वारकानाथार्पणमस्तु प्रसंग १० ।।"; अकराव्या अध्यायाचे शेवटीं "संपूर्णमस्तु । श्रीपांडुरंगार्पणमस्तु ।।"; बाराव्याचे शेवटीं "संपूर्णमस्तु ।। श्री ।।"; चौदाव्या अध्यायाचे शेवटीं "श्रीरामाय ।। श्री ।।"; सोळाव्याचे शेवटीं "श्रीकृष्णायनमः ।।" असे उल्लेख आहेत. अर्थात् हे सर्व नकलकाराचे असावेत. या तपशिलावरून

---

* नकलेंत येथें जागा कोरी सोडून फक्त शिरोरेघ काढली आहे.

† ही संख्या सबंध बाडाची आहे.

या रामदासी नंबर १६०५च्या बाडाचें स्वरूप लक्ष्यांत येईल. या प्रतीस प्रत नंबर १ म्हणून संदर्भ दिलेला आहे. या बाडांत नाहींत असे दोनच पाठभेदाचे अभंग फक्त प्रत नंबर ३ मध्यें आढळले. सर्वांत संख्येनें अधिक अभंग याच बाडांत आहेत.

ए : श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरांतील दुसरी प्रत म्हणजे टाकळी संग्रहांतील बाड नंबर ११ ही होय. या बाडांतील दुसऱ्या भागांत या अनुवादाचा बारावा अध्याय नकललेला आहे. या नकलेचीं फक्त बारा पृष्ठें असून हींत संस्कृत श्लोक दिलेले नाहींत. शेवटीं "इति श्रीमद्भगवद्गीता|| आध्या बारावा समाप्तमस्तु छ छ" इतकाच उल्लेख आहे. या प्रतींत विशेष असें कांहींच नाहीं. लेखन अशुद्ध, किजबीड व अक्षरांची गाळागाळी फार. या नकलेला संदर्भार्थ प्रत नंबर २ असा क्रमांक ठरविला होता. परंतु पुष्कळ ठिकाणीं ३ ऐवजीं २ चुकीनें पडलें आहे. बाराव्या अध्यायाखेरीज जेथें प्रत २ म्हणून उल्लेख येईल तेथें तेथें तो प्रत नंबर ३चा आहे असें समजावें. बाराव्या अध्यायांत भाक्तियोग असल्यानें पाठांतरांत हाच अध्याय विशेष असतो. अर्थातच या अध्यायाच्या स्वतंत्र नकला मिळणें साहजिकच होय.

ऐ : रामदासी संग्रहांतील आणखी १४ बाडें चरित्रविषयक माहितीसाठीं निवडलीं होतीं. त्यांत नंबर १७१४चें एक बाड* होतें. रामदासी बाडांचे यादींत या बाडाची नोंद "बाड नं. १७१४ सटीक भगवद्गीता-अभंग-दोहा-आर्या" म्हणून केली असल्यानें यांतील अभंग हे तुकाराम महाराजांचेच असावेत असें वाटलें. तपासाअंतीं हा तर्क खरा ठरला व आणखी एक स्वतंत्र नकल मिळाल्यानें पाठभेद ठरविण्यास हिचा फार उपयोग झाला. या बाडाचें नांव "श्रीभगवद्गीता सटीक – कृत अभंग व दोहा" असें मलपृष्ठावर दिलें आहे. प्रथमाध्यायांचे प्रारंभींचा मजकूर याच अर्थाचा आहे. तो असाः

* 'रामदास आणि रामदासी' मासिक, वर्ष १५ वें, अंक १७१, २२ मे १९३७ चा, कुलकर्णी संग्रह, पृ. ४३५.

" श्रीभगवद्गीता सटीक —कृत अभंग व दोहा : ।। तुकारामकृत [ अभंग ] व आनंदराम [ कृत ] दोहे अध्याय प्रः ।। अध्याय १।। आरंभ ।। आर्यारंभ ।। "

नंतर अभंगलेखनापूर्वी प्रशस्ती आहे ती:

" श्रीगणेशाय नमः ।। श्री सर० ।। श्री सद्गुरुनाथ ज्ञानराजाय नमः ।। श्री परमात्मने नमः ।। श्री नाथसमर्थ ।। श्री गीता सटीक ग्रंथ कृत आनंदराम तथा कृत अभंग तुकाराम प्रारंभ ।। "

या बाडांत प्रथम संस्कृत श्लोक नतर आर्या, अभंग व दोहे असे क्रमानें एकापुढें एक लिहिले आहेत. फक्त श्लोकार्थांचेच अभंग न देतां प्रारंभींचे, शेवटचे, पूर्ततेचे व पाठभेदाचेहि अभंग त्या त्या ठिकाणीं उद्धृत केले आहेत. त्यामुळें प्रत नं. १ पेक्षां २-३ पाठभेदाचे अभंग यांत अधिक सांपडले. याहि बाडांत प्रत्येक अध्यायाला स्वतंत्र पत्रांक दिले आहेत ते :

| अध्याय | पत्र संख्या | अध्याय | पत्र संख्या | अध्याय | पत्र संख्या |
|---|---|---|---|---|---|
| १ ला | २४ | ८ वा | १० | १५ वा | ११ |
| २ रा | ३४ | ९ वा | १९ | १६ वा | १४ |
| ३ रा | २१ | १० वा | २० | १७ वा | १६ |
| ४ था | २१ | ११ वा | २८ | १८ वा | ४० |
| ५ वा | १४ | १२ वा | ७ | | |
| ६ वा | २४ | १३ वा | १८ | | |
| ७ वा | १७ | १४ वा | १६ | एकूण | ३५४ |

अठराव्या अध्यायाचे शेवटीं पृष्ठ ४१ वर 'अभंग प्रार्थना' म्हणून एक अभंग* आहे. हें बाड मूळ टांकेच्या नकलेची नकल असावी. यांत बरेच हस्तदोष आहेत. बऱ्याच ठिकाणीं अभंग लिहितांना त्यांतील चरण गाळले

* अभंग क्रमांक ७२३ पहा. हा इतरत्रहि सांपडतो व बरेच ठिकाणीं छापलाहि गेला आहे.

आहेत. कित्येक ठिकाणीं चरण गळला तरी त्या अभंगांतील चरणांचे मूळ क्रमांक कायम आहेत. अर्थात् हे सर्व नजरचुकीचे दोष होत. या बाडाचे शेवटीं या नकलेच्या लेखनकालाची नोंद आहे. ती अशी :

" स्वस्ति श्रीनृप विक्रमार्क समयाता संवत १९११॥ श्रीशालिवाहन शके १७७६ आनंद नाम संवछरे जेष्ठ मासोयं शुक्लपक्ष तिथौ सप्तमी शुक्रवासरे [ २ जून १८५४ ]. समाप्त॥ हस्ताक्षर वामनराव पुरषोत्तम कन्नडकर लिखितं ग्रंथ स्वयं अस्ति ॥ "

ही इ. स. १८५४ची नक्कल रामदासी संग्रहांत श्रीयुत ल. शं. कुलकर्णी यांचे संग्रहाबरोबर आली. या बाडास संदर्भार्थ प्रत नंबर ३ म्हणून योजिलें होतें. परंतु नजरभुलीनें संदर्भ देतांना प्रत २ असें दिलें गेलें आहे. तरी १२व्या अध्यायाखेरीज इतरत्र जेथें जेथें प्र. २ म्हणून संदर्भ येईल तो प्र. ३चा आहे असें समजावें. याच वामनराव कन्नडकरांचे नातवानें म्हणजे वामन लक्ष्मण जोशी कन्नडकर यानें माधवनामा कविकृत भगवद्गीतेवरील आर्याबद्ध टीका इ. स. १८९४त जगद्दर्शक प्रेस मध्यें छापून प्रसिद्ध केली आहे. ती याच बाडांतील होय.

ओ : आळंदीला या गीतानुवादाची चौकशी करीत असतां तेथें यात्रेस आलेल्या एका गाडे नांवाच्या प्राथमिक शाळेच्या शिक्षकांनीं आपले जवळ ' तुकारामाची मंत्रगीता ' असल्याचें सांगितलें. प्रथम या सद्गृहस्थाचे बोलण्यावर माझा फारसा विश्वास बसला नाहीं. केवळ शिष्टाचार म्हणून मला प्रत दाखविण्याबद्दल त्यांना कळकळीची विनंति केली. कांहीं दिवसांनीं त्यांनीं आपलें बाड पुण्यास आणून दिलें. त्या वेळीं मी धुळ्यास समर्थ-वाग्देवता मंदिरांतील प्रतींचे संशोधनार्थ गेलों होतों. तेथून परत येतांच श्री. गाडेंची प्रत हातीं आली. ही पाहून आनंद झाला तो अवर्णनीयच. या बाडाचीं पहिलीं व शेवटचीं कांहीं पानें गेलीं असल्यानें यांत आरंभींचा मजकूर व पांच अभंग व शेवटचे दोन अभंग व आणखी कांहीं मजकूर असल्यास तो गहाळ आहे. यांत प्रथमारंभींचे व शेवटचे अभंग आहेत.

परंतु पाठभेदाचे व अध्याय पुरवणीचे अभंग नाहींत. श्रीसमर्थवाग्देवता मंदिरांतील सर्व बाडें पोथीवजा आहेत. हें बाड अभंग, पदें वगैरेच्या बांधीव वहीच्या साच्याचें आहे. आकार ६ × ७ इंचांचा. पृष्ठांक नाहींत. यांत एकंदर ७१८ अभंग आहेत. श्रीसमर्थवाग्देवता मंदिरांतील प्रत १ पोथी-प्रमाणें हें बाड इतर बाबतींत पूर्ण आहे. लेखनदोष बरेच आहेत. संस्कृत श्लोक दिले नसून फक्त अभंगात्मक अनुवादच लिहिला आहे.प्रत्येक अध्यायाचा अभंगानुक्रम स्वतंत्र असून तो त्याचे डोक्यावर 'अभंग' ॥१॥' असा अगर क्वचित् ठिकाणीं नुसत्या क्रमांकानें दर्शविला आहे. प्रत्येक अध्याय स्वतंत्र पृष्ठावर सुरू केला आहे. अध्यायाच्या शिरोभागीं 'अभंगात्मक गीता' किंवा ' गीता अभंग ' ' ...अध्याय ' किंवा ' प्रसंग ' असें लिहिलें आहे. अध्याय ६ व १२ चे अग्रभागीं मात्र ' श्रीमंत्रगीता षष्ठम प्रसंग ' व ' मंत्रगीता द्वादशोध्यायः ' असें म्हटलें आहे. अध्यायाचे शेवटीं '...... अध्याय ' किंवा ' प्रसंग संपूर्ण ' किंवा 'संपूर्णमस्तु' आहे. अध्याय ६, १०, १२ व १५चे शेवटीं 'मंत्रगीता' अशी पूर्ती आहे. याखेरीज या व श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील प्रत १ मध्यें किरकोळ लेखनदोषांखेरीज इतर फारसे फरक आढळून आले नाहींत. 'श्रीराम', 'श्रीकृष्णार्पणमस्तु', 'श्रीपांडुरंगार्पणमस्तु' वगैरे जे इतर प्रतींत उल्लेख आढळतात तसे या प्रतीत नाहींत. या श्री. गाडे यांचा व येलवाडीकर गाडे यांचा कांहींहि संबंध नाहीं असें त्यांचे सांगण्यांत आलें. शिवाय त्यांचें घराणें वारकरीहि नाहीं. त्यांच्या आजोबांपासून त्यांच्या पूजेंतील पोथ्यांत ही प्रत असल्याचें त्यांनीं पाहिलें आहे. ही प्रत कोणीं व केव्हां केली याची त्यांस माहिती नाहीं. ही नकल आहे व तीहि उत्तर पेशवेकालीन आहे. लेखनकाल व लेखकाचें नांव यांत नाहीं. लिखाण शब्द तोडून केलेलें नाहीं. बरेच ठिकाणीं चरण गळलेले दिसतात किंवा खालीं वर झालेले दिसले. ही प्रत बव्हंशीं प्रत १ सारखीच आहे. या प्रतीला प्रत नंबर ५ म्हणून संदर्भ दिला आहे.

वर लिहिल्याप्रमाणें अभंगांवरील टीपांचा थोडासा घोटाळा झाला आहे. याकरितां कोणता अभंग कोणत्या प्रतींत आहे किंवा नाहीं हें समजून घेण्यास शेवटीं " गीताश्लोकांच्या अनुवादाखेरीज अध्यायपूर्ततेसाठीं रचलेल्या अभंगांच्या सूचीं"तील* दिलेल्या माहितीचा उपयोग करावा.

थोडयाच अवकाशांत निरनिराळ्या आठ प्रती किंवा सतरा आवृत्त्या हातीं आल्यानें उत्साह वाढणें साहजिक होतें. आणखीहि प्रती मिळूं शकतील. विशेषत: गीताटीकेंतून या अनुवादाचे पाठ मिळणें संभवनीय अधिक. परंतु आणखी प्रती मिळवून त्यांचा उपयोग द्वितीयावृत्तींत करणें क्रमप्राप्तच आहे. ' त्रिशतसांवत्सरिक पुण्यतिथीस ' ज्या प्रती मिळाल्या तेवढ्यांवरच समाधान मानून हा 'गीतानुवाद' भाविक भक्तवृंदांच्या हातीं देण्याची मूळ योजना जरी अनपेक्षित अडचणींमुळें सिद्धीस गेली नाहीं, तरी तिला शक्य तों लवकर मूर्त स्वरूप देण्यासाठीं आणखी प्रती मिळविण्याची खटपट सध्यांतरी स्थगित करणें आवश्यक होतें. इतिहास-संशोधनांतील सामान्य अनुभवावरून विचार केला तर मिळाली ही सामग्री विपुल आहे. भाविकांच्या कृपेनें अधिक प्रती सांपडतील व त्यांच्या साहाय्यानें आणखी कांहीं पाठभेद मिळतील. परंतु मूळ प्रत हातीं येईपर्यंत समाधान होणार नाहीं. मूळ प्रत मिळाल्यास महाराष्ट्राचें भाग्यच उदयास आलें असें होईल. कारण त्या ' मंत्रगीते 'चें मूळ तुकोबासारख्या संत-श्रेष्ठांच्या हातून व पांडुरंगाच्या अनुज्ञेनें लिहिलें गेलेलें आहे, तें महा-दिव्याच्या कसोटीस उतरलेलें आहे आणि 'महाराष्ट्रवेद' किंवा 'तुकारामवेद' म्हणून संतांनीं सादर वंदिलेलें असें तें आहे.

सर्वच नकला उत्तर पेशवेकालीन असल्यानें या अनुवादांत शब्दांचें स्वरूप जरी मूळचें ठेविलें आहे तरी लेखन ( अक्षर-मात्रा यांसारखे ) दोष सर्वत्र सुधारले आहेत. मूळ प्रत सांपडली असती तर तशीच्या तशीच

---

* पृष्ठ २२७ पाहा.

छापण्यांत महत्त्व होतें. परंतु नकलकारांचे दोष तसेच टेवणें शास्त्रशुद्ध नाहीं व पुस्तकाच्या उपयोगाच्या दृष्टीनेंहि युक्त नाहीं. गीता ही भाविकांकरितां आहे. त्यांस ती शुद्ध स्वरूपांत समजेल अशीच देणें जरूर आहे. अभ्यासकांस या प्रकरणांत दिलेली माहिती मूळ स्वरूपाची कल्पना करून घेण्यास पुरेशी आहे.

६. गीतानुवादाचें स्वरूप : या अभंगांकित भगवद्गीता किंवा मंत्रगीतेचें कांहीं वर्णन वर आलेंच आहे. या गीतानुवादांत एकंदर ७२२ अभंग असून त्यांशिवाय गीतामहतीचे दोन व पाठभेदाचे चार अभंग अधिक आहेत. चारीहि अभंग-वृत्तें यांत उपयोजिलीं आहेत. प्रत्येक अभंगांत साधारणपणें तीन किंवा चार चरण येतात. क्वचित् दोनहि आहेत. कांहीं थोडया जागीं ही चरणसंख्या चारांपेक्षां अधिक असून शेवटच्या अभंगांत पस्तीस झाली आहे. प्रत्येक चरणांत दोन किंवा चार पाद आहेत. या पाद संख्येवरून अभंगांचीं वृत्तें द्विपादी, दीडपादी, त्रिपादी व चौपादी अशीं ठरविलीं आहेत. अभंगांतील 'धृपदें' कोणत्याहि प्रतींत दर्शविलीं नाहींत. रचनेच्या व अर्थाच्या दृष्टीनें पाहतां या गीतानुवादांतील अभंग पदें नसून वृत्तें आहेत. धृपदें निश्चित करण्यासारखें त्यांतील पहिलें अगर दुसरें चरण सामान्यार्थी लिहिलेलें दिसत नाहीं. हे अभंग मूळ गीताश्लोकांचें केवळ शब्दशः भाषांतर नाहींत. इतकेंच नव्हे तर हा अनुवाद भावार्थालाहि मर्यादित ठेवला आहे असें दिसत नाहीं. तत्त्वार्थानें या अनुवादाची स्वतंत्रपणें मांडणी केली आहे असें म्हणणें वस्तुस्थितीला बरेंचसें धरून होईल. बरेंचसें म्हणण्याचें कारण असें कीं, कित्येक ठिकाणीं तुकोबांनीं तत्त्वार्थानंतर आपलें मत प्रदर्शनहि केलें आहे. परंतु आपण अनुवाद भावार्थानेंच केला आहे असे त्यांचें म्हणणें आहे. "तुका विनवी भावार्थी। लोक परिसो परमार्थी। ज्यांस प्रीत योगपंथीं। अहर्निशीं अखंड ॥ ३ ॥" [ गी. २३३ ]. "तुका म्हणे भावार्थी या। देव बोलिला कौंतेया ॥ १६ ॥" [ २७४ ].

मूळ गीतेचा उल्लेख या गीतानुवादांत निरनिराळ्या तऱ्हांनीं केला आहे : "श्रीकृष्णवचन प्राण हा वेदांचा । तुका म्हणे साचा अनुभव ॥ ३ ॥" [ गी. २०७]. "गीतादेवी भक्तवरदानी ॥ १ ॥" [ गी. ३०९ ]. "शब्द माझा उपेक्षिला । गीताधर्म उच्छेदिला ॥ ३ ॥" [ गी. ३०१ ]. "गजपुरीं कुरु वृद्धास संजय । सांगे हर्षमय कृष्णगीता ॥ १ ॥" [ गी. ४५३ ]. "नाहीं तरी गीताशास्त्र ।–॥ ४ ॥" [ गी. ४९६ ]. "ऐके सव्यसाची नित्य जे वेदांची । साक्षीनें मोक्षाची संपदा गा ॥ १ ॥" [ गी. ५६२ ]. "ऐसी ही सुगीता साधकांची माता । मजवाटे दुहिता श्रीहरीची ॥ १ ॥" [ गी. ५६३ ]. "येथें तुकयासंगतीं । गीता सांपडली हातीं ॥ ४ ॥ तेणें आशिर्वाद दिला । ना तो कर्णी मंत्र आला ॥ ५ ॥ गेला संशय उडून । तुका तुष्टला भगवान ॥ ६ ॥" [ गी. ४७६ ]. "ऐसें शास्त्र बोधियेलें । सख्या गुह्य सांगितलें ॥ १ ॥" [ गी. ५८४ ]. "झाली पंधराव्यांत । गीतापोथी ही समाप्त ॥ १ ॥" [ गी. ५८६ ]. "येथून गीतादेवी पुजा । झाली वाचाविद् ओजा ॥ ३ ॥" [ गी. ६४२ ]. "ऐसा गीतागर्भ सत्रावा प्रसंग ।–॥ १ ॥" [ गी. ६४१ ]. "तमोधम तूं दीससी । कीं निंदसी गीतेला ॥ १९ ॥ शुद्ध सत्त्व तें गा जाण । जें सुजाण गीतेचें ॥ २० ॥ अठरा अध्ये ऐसी गीता । समाप्तता पावली ॥ ३३ ॥ मोक्षसन्यास तो येथें । जगन्नाथें वर्णिला ॥ ३४ ॥" [गी. ७२२]. "बरे ऐकली ही गीता ।–॥ १ ॥" [ गी. ७१४ ].

तुकारामकालीं मराठींत गीतेला भगवद्गीता म्हणून क्वचित् संबोधण्यांत येतें. कृष्णगीता म्हणूनच प्रामुख्यानें उल्लेख येतो. या अनुवादांतील पाठभेदाचे व अधिक म्हणून आलेले अभंग प्रायतः प्रक्षिप्त होत. ह्या गीतानुवादांत ते संग्रहार्थ म्हणून दिले आहेत इतकेंच. यांतील ७१७व्या अभंगांत "सांगतांच भगवद्गीता" असा उल्लेख आहे. याचें कारण तो एकोणिसाव्या शतकांतील रचला गेलेला आहे हें होय.

गीतामहत्तींत "गीतादेवी" "देवी गीता" "आदिमाया वेदमाता" असे उल्लेख आहेत. महत्ती सांगतांना "एक श्लोक अथवा चरण। अर्थ अनुभव अंगीं लेण। " असें म्हटलें आहे. कदाचित् याच उद्देशामुळें या गीतानुवादाला मंत्रगीता म्हणूं लागले असावेत व ही महत्ती बहिणाबाईच्या श्रवणांत आल्यानें तिला स्वप्नांत प्रसाद म्हणून 'मंत्रगीता' मिळाल्याचा भास झाला असावा. गीतानुवादांतील "तुका वदे विचक्षणीं। मांदुस गीतारत्न खाणी। घ्यावें एकेक निवडुनी। वचनें शेषशायीचीं ॥९॥" [ गी. २३२ ] हें वचन येथें मननीय आहे.

ही गीता 'गीर्वाण' म्हणजे संस्कृत भाषेंतून प्राकृतांत म्हणजे मराठींत केली म्हणून तिचा 'अव्हेर' करण्याचें कारण नाहीं असें तुकोबा विनवितात : "तुका विनवी वारंवार। माझ्या मतीं हर्ष फार। संतीं न करावा अव्हेर। प्राकृत भाषा म्हणोनि ॥ ३ ॥ [गी. २३१]. ऋषीश्वरीं बहुविध स्वानुभऊ। वेदिक समुहु वर्णियेले ॥ १ ॥ नाना युक्ती त्याच्या भाषा गीर्वाणीच्या। सिद्धांत गर्भीच्या ठेवण्या ज्या ॥ २ ॥ वाक्याचे प्रबंध ब्रह्मसूत्र बोध। करूनि विविध आपादिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी प्राकृत शिराणी। झाली हे काहाणी नका म्हणूं ॥ ४ ॥ [ गी. ३०३]".

तुकोबांनीं गीतेच्या श्रवणपठणावर बराच भर दिला आहे. बहिणाबाईच्या लेखनांतहि तो तसा दिसतो. परंतु येथें फक्त गीतानुवादांतील उल्लेख करतों : " गीतादेवी भक्त वरदानी ॥ १ ॥ श्रवणें पठणें करी कार्य सिद्धि। माईक उपाधि सारूनियां ॥ २ ॥ तुका विनवणी करी साधुजनां। श्रवणीं भावना शुद्ध करा ॥ ३ ॥ " [ गी. ३०९ ]. " राजविद्या राजगुह्ये। योग वर्णिलासे पाहे ॥ ३ ॥ श्रवणेंपठणें संशय। तुका म्हणे लया जाय ॥ ४ ॥ [ गी. ३७३ ]."

गीता तत्त्वज्ञान हें पूर्वीचेंच म्हणजे पुरातन आहे, नवीन पंथ नाहीं हें दर्शविण्यासाठीं गाथेंतील वचनाप्रमाणें या गीतानुवादांतहि वचनें आहेत :

" ऐसें हें पूर्वींचें भांडवल । सांपडे नवल तुकयासी ॥ ४ ॥" [गी. १६१]. " तुका म्हणे नारायणें । केलें पार्थासी सांगणें । ना तें साधूचें मागणें । होतें कांहीं पूर्वींचें ॥ ४ ॥" [गी. १९०]. हीं वचनें व वर उद्‌धृत केलेले " परि ईश्वराकरितां । मज सांपडली गीता " वगैरे उद्गार वाचले म्हणजे हा भगवद्गीतानुवाद श्लोकांसह भाषांतर अगर रूपांतर म्हणून देण्याचा तुकोबांचा मानस नसावा. स्वतंत्रपणें गीताधारें सुलभ टीकाग्रंथ लिहावा असा हेतू असावासा दिसतो.

गीता हें अनुभवसार किंवा देवज्ञान आहे असें तुकोबा सांगतात : " तुका म्हणे भुमीभार । उतराया हा निर्धार । यास्तव अनुभवसार । देवो त्यास निवेदी ॥ ४ ॥ " [ गी. ८२ ]. " तुका म्हणे देवज्ञानाचा अनुभव । सुगम हे ठेव साधकाची ॥ ३ ॥ " [ गी. ९६ ].

आपली ग्रंथरचना स्वतंत्र आहे अशी तुकोबांची भूमिका असल्याचा वर निर्देश केला आहे. परंतु या गीतानुवादांतील लेखन तुका मनुष्य म्हणून केलेलें नसून तुका-आत्मा बोलत आहे अशा कल्पनेनेंच केलें आहे. जरूर पडली तेव्हां पार्थाऐवजीं पार्थिव शब्द वापरून जीवात्म्यांचा संवाद दिलेला आहे. गीता-ज्ञान अधिक विशद व सुलभतर करून साधुसंतांच्या मार्गदर्शनार्थ कोठें कोठें बराच विस्तार केला आहे. सर्वत्र तुका हा शब्द आत्मा-वाचक आहे हें स्पष्टच आहे. परंतु जेथें संशय उत्पन्न होण्याचा संभव वाटला तेथें तुका म्हणजे आत्मा, मनुष्य कां जीव हें स्पष्ट केलें आहे : "जान्हवींत टाकी मेल्या मंगळ जे । ऐशा स्थळीं विरजे आत्मा तुका ॥ ३ ॥ " [गी. ५२२ ]. " स्वात्मा गुणातीत पाहे । तोच पावे मद्रूप हें । येथें तुका निःसंदेहें । गुणातीत लेखावा ॥ ३ ॥ " [ गी. ५५४ ]. " ज्यांत गुणभाग शेवटीं अध्यात्मा । बोलिला भक्तात्मा पार्थिवासी ॥ २ ॥ " [गी. ६४१]. इतरत्र तुकोबांनीं आपल्याला ' वाणी ' व ' वैश्य ' म्हणून उल्लेखिल्याचें आलेंच आहे. तेथें तुका-मनुष्य म्हणूनच तुका हा शब्द योजला आहे.

परंतु इतर ठिकाणींहि ‘ तुका’चे मनुष्य वाचक उल्लेख आढळतात : “ हे भगवन तुझी व्यक्ती । दैत्य दानव नेणती । तेथें आमुचा पाड किती । तुका तरी मनुष्य ॥ ३ ॥ ” [गी. ३८७]. “ऐके नरेश पार्थिवा । तुका मानवी वानावा ॥४॥” [गी.४१२]. कांहीं ठिकाणीं तुका हा शब्द लेखक या अर्थानें येतो. तो अर्थबोधानें तेथें स्पष्ट होतो. याशिवाय कांहीं ठिकाणीं ‘ सत ’ ‘ साधु ’ या विशेषार्थानें तुका शब्द येतो. तेथें तुकोबानें तसें स्पष्ट केलें आहे. तुका ‘ जीव ’ या अर्थी वापरलाहि गेला आहे : “ प्रिय प्रियाला सद्भावें । तुका क्षमा मागे जीवें ॥४॥” [गी. ४३३]. ‘तुका ’ हा शब्द विशेषार्थानें वापरण्याच्या तुकोबाच्या योजनेला नंतर बरेंच महत्त्व प्राप्त झालें व त्याबद्दलची चर्चा पुढें “ छळाच्या कारण मीमांसेंत ” येणार असल्यानें हा विषय येथेंच संपवितों.

गुरु, दास व शिष्य हेहि शब्द विशेषार्थानें योजले आहेत. आत्मा, कृष्ण व पार्थ याव्यतिरिक्त ईश्वर किंवा देव असा सामान्यपणें उल्लेख करावयाचा झाला तर तेथें गुरु, सद्गुरु सारखे शब्द योजले आहेत. जेथें भक्त किंवा मोक्षार्थी म्हणून म्हणावयाचें असेल तेथें दास किंवा शिष्य म्हटलें आहे. कांहीं ठिकाणीं गुरुऐवजीं पांडुरंग असें विशेषार्थानें लिहिलें आहे. या दास व गुरु शब्दांचा उपयोग विशेषनामार्थी नाहीं हे लक्षांत घेतलें म्हणजे घोटाळा उडणार नाहीं. गुरु दासाचे कांहीं उल्लेख पुढें देतों; “तुका म्हणे कृपावंता । दासचिंता तुज आहे ॥१॥ ” [ गी. ७१]. “तेथें सुमुहूर्तें बैसावें निरुतें । आठवी गुरुतें तुका म्हणे ॥४॥ ” [ गी. २४२ ]. “ स्वामी तूं सद्गुरु शिष्य मी तुमचा । धारक शिक्षेचा तुका म्हणे ॥३॥”[गी.५२]. “रज्जुसर्प भ्रांतीमुळें । सद्गुरुकृपें निरसले । तुकया भ्रांति रज्जुत्वें ॥५॥” [गी. ३४२]. “गुरु न दिसे तुजवीण । तुका वाहे आपुली आण ॥४॥”[गी.२७०].“तुका म्हणे नाहीं आत्म्यावीण कांहीं ।सांगे वर्म पाही गुरु शिष्या॥४॥”[गी.३५४]. “तुकाराम गुरु किंकर पावन । झाला तेणें जन उद्धरलें ॥४॥” [गी. ३६६].

"मोहबंदीं पडलों होतों । तव कृपें मुक्त झालों तो । तुकावरदें तरला तो गुरु दास नवल ॥४॥" [गी. ३८८]. "पिता होशी तूं जगाचा । तूं पुज्य सर्वांगुरु । सर्वीं सर्वात्मा साचारू ॥ २ ॥" [गी. ४६२]. "तुका तेथीचा रहिवासी । गुरु दासीं पावला ॥४॥ " [गी. ४७९]. " तुका विनवितो तया । माझा दास म्हणोनियां ॥४॥ " [ गी.४९० ]. " तुकया सद्‌गुरु संसर्गे ॥५॥" [गी.४९७] " शिष्य शिष्याचा सेवक । प्रार्थी तुकयाचा रंक ॥७॥ " [ गी. ५३४ ]. " श्रीगुरु पांडुरंग दासा । दिल्हा तुकयानें भरंवसा ॥१०॥ " [ गी. ५८६ ]. " तेथें तुकया प्रत्यय । वदे गुरू दास पैं ॥४॥" [ गी. ६११ ]. " किंवा शिष्य गुरुवर्य । माया जेवीं तान्हया ॥ २ ॥ " [गी. ६१०]. "तुकयाचा दये प्राप्त गुरु दासा । पुरला धिंवसा तेणें त्याचा ॥४॥ " [ गी. ६३५ ]. " जेथें द्वैत ना उरलें । तुकया दास्य भरतें आलें ॥६॥" [ गी. ७१५]. "श्री पांडुरंग दास ! पुरवी आस तुकया ॥३६॥" [ गी. ७२२ ]. " श्री गुरु दासांत प्रेम तुका घेणें । आराधावी तेणें गीता देवी ॥१२॥ " [ गी. म. ७२३ ]. तुकोबांच्या गाथेंतहि गुरु दास हे शब्द अशाचप्रमाणें वापरले आहेत. सारांश, गीतानुबादांतील गुरु दास शब्दांचा 'गुरुदास' किंवा ' दासतुका ' नांवाच्या लेखकांशीं संबंध नाहीं हें सहज लक्षांत येईल. दासतुका व गुरुदास हे आपल्या पदांच्या शेवटीं या नांवाचा विशेषनामार्थींच उल्लेख करतात.

तुकोबांच्या गाथेंत ग्रामीण आणि विशेषतः गांवकुळकर्ण्यांचे गांवकीच्या कागदपत्रांतून येणारे शब्द बरेच आढळतात. ते इतर लेखकांच्या लेखांत सांपडत नाहीत. गीतानुवादांतहि असले शब्द भरपूर आहेत. त्यांची यादी देऊं म्हटलें तर विस्तार फार होईल. त्याचप्रमाणें गाथेंतील अभंगांतील व गीतानुवादांतील अभंगांतील चरण व विचारप्रवाह एकसारखेच असल्याचीं उदाहरणेंहि बरींच आहेत.

सारांश, गीतानुवाद हा गीताश्लोकांतील तत्त्वार्थाला धरून परंतु स्वतंत्र विचारसरणीनें सजविला आहे. त्यांतील तत्त्वनिवेदनांत भक्तीचा श्रेष्ठ दर्जा

पदोपदीं सांगितला आहे. हा गीतानुवाद स्वतंत्रपणें तुका-आत्मा-धर्म-शासक अशी भूमिका घेऊन लिहिला गेल्यानें तो निराळाच शास्त्रग्रंथ म्हणून समजला गेला. अशा तऱ्हेचा धर्माचरणांत शास्तेपणाचा अधिकार सांगणाऱ्या यातिहीन माणसाविरुद्ध रान उठवून त्याचेवर उपाय योजना करण्याची खटपट झाली तर नवल कसचें ! परंतु तत्कालीन् नीतिपद्धतींत दैवीसामर्थ्यावर विशेष भर असल्यानें 'दिव्य' हीच शेवटची कसोटी असे. या 'कसवटी'स जो उतरेल तो देवमान्य आणि राजमान्य होत असे; आणि जो राजमान्य तो लोकमान्य असणें क्रमप्राप्तच होय.

७. अनुवादक तुकाराम कोण ? : संस्कृत ग्रंथाचें मराठींत भाषांतर आणि तेंहि देहूकर तुकोबांनीं केलें असें म्हटलें तर सध्यांचे सामान्य जन बिचकल्यास नवल नाहीं. भावे व त्यांच्यासारख्या प्रवृत्तीच्या कांहीं इतर लेखकांनीं तुकोबांना सांप्रतचा एक गांवढळ कुणबी ठरविण्याचा खोडसाळ प्रयत्न केला आहे. या थोर लेखकांची सामान्य जनतेवर छाप पडणें साहजिक आहे. याशिवाय कांहीं कर्मठ विचारांची मंडळी अभंगांत उच्च विचारांचा प्रश्न आला कीं हा या देहूकर तुक्याचा नाहीं, दुसऱ्या कोणातरी एकाद्या तुका नांवाचा उल्लेख करून त्याचा असावा म्हणून सांगतात व दिशाभूल करीत असतात. त्यामुळें ऐतिहासिक साधनांचा अभ्यास अधिक करावा लागतो व बिनाधारें केलेल्या असल्या विधानांचा खोटेपणा सिद्ध करण्याचा आणखी खटाटोप करावा लागतो. वारकरी सांप्रदायाचे 'फड' व 'टाळकरी' या संस्था तुकोबांनंतर सवाशें दीडशें वर्षांनीं जन्मास आल्या असल्या तरी वारकरी केवळ वस्तुस्थितीच्या अज्ञानामुळें 'सांप्रदायिक' गाथा वगैरेस भरमसाट महत्त्व देतात व अंधश्रद्धेनें त्यांत 'सुधारणा' करण्यासारखें कांहीं नाहींच अशी ठाम समजूत करून घेतात. त्यामुळें गाथेंत एकदां समाविष्ट झालेल्या पूर्णपणें क्षेपक अभंगांना 'मूळा' इतकें प्रामाण्य व 'मूळ' तुकोबांच्या लेखांना 'वाळींत' अशी परिस्थिति निर्माण होऊन बसली आहे.

कोणताहि पारमार्थिक मार्ग आपापल्या समजुतीनें व कुवतीनें साधण्यास प्रत्येकजण स्वतंत्रच आहे. परंतु अशा साधनमार्गात जाणून बुजून किंवा अज्ञानानें आडवळण घेतलें तर अडचणी उत्पन्न होऊन प्रगती खुंटते याची जाणीव ठेवल्यास कोणाचें नुकसान होईलसें वाटत नाहीं. असो.

तुकोबांच्या चरित्राचा अभ्यास करतांना 'तुका' नामधारक इतर साधुसंतांची माहिती शोधण्याचा प्रयत्न केला. कागदपत्रांवरून त्यांची माहिती जुळवून ती 'तुकाराम चरित्रांत' दिली जात आहे. येथें फक्त त्यांपैकीं कोणी तुका या गीतानुवादाचा लेखक ठरवितां येण्यासारखा आहे किंवा कसें इतक्यापुरतीच चर्चा करणें आहे.

१. तुकाराम बर्वे:—हे सारस्वत ब्राह्मण. ह्यांचा जन्म इ.स. १५७१त गोवा प्रांतांतील जुवा नांवाच्या गांवीं झाला. यांच्या वडिलांचें नांव अमृतराव. यांनीं बरेच वेळां काशीयात्रा केल्या. शेवटीं ते कवळें येथें राहिले. भर्तृहरीच्या शतकत्रयाचें यांचें मराठी भाषांतर आहे.

२. तुकोजीपंत–रमावल्लभदास:—हे ब्राह्मण होते. यांचा जन्म इ. स. १६१०त दौलताबादेस झाला. यांच्या वडिलांचें नांव अंबाजी ऊर्फ यमाजीपंत व उपनांव राळेरासकर होतें. तुकोजीपंत लढाईवर गेले असतां त्यांना भागवताचा एकादश स्कंध मिळाला. नंतर ते विरक्त झाले. लक्ष्मी-धर साधूचे शिष्य बनले. गुरूनें शिष्याचें नांव 'रमावल्लभदास' असें ठेवलें. रमावल्लभदासांनीं 'दशकनिर्धार' इ. स. १६३३त लिहिला. नंतर वाक्यवृत्ति लिहिली. इ. स. १६६६त गीतेवरील टीका लिहिली. ही टीका 'चमत्कारी' म्हणून प्रसिद्ध आहे. यांचे 'वैष्णवगती' वगैरे आणखीहि ग्रंथ आहेत.

३. तुकोबा रामदासी:—तुकोबाबावा गोसावी, सांप्रदाय रामदासी, वास्तव्य मठ चिंचोली ता पाटस असा यांचा कागदपत्रांतून उल्लेख आढळतो. काल १७३० ते १७९० इ. . हे विश्वामित्र गोत्री अश्वलायन

सूत्री ब्राह्मण होते. रामाच्या उत्सवसांगतेस यांस पेशव्यांचीं व गांवकीचीं छोटीं वर्षासनें होतीं. यांचें गद्यपद्य उपलब्ध नाहीं व असल्याचेहि उल्लेख नाहींत.

४. तुकोबा गोसावी उंडवडीकरः—यांची उंडवडी [ जेजुरीजवळ ] येथें समाधी आहे. यांचा काल इ. स. १६७५ ते १७२५ मधील येईल. हे तुकोबा ब्रह्मचारी म्हणून प्रसिद्ध होते. ते सुभानजी आटोळे यांचे गुरु, ब्राह्मण जातीचे होते. सुभानजींनीं आपला अर्धा मोकासा यांच्या समाधीचे पूजेअर्चेस दिला होता.

५. तुकोराम व गीरीरामः—हे ब्राह्मण बंधू खेड येथें राहणारे. यांचा काल १७२० ते १७६५ इ. चा. हे रामाचे व कृष्णाचे उत्सव करीत. त्याबद्दल त्यांस पेशवे व गांवकीचीं वर्षासनें होतीं. हे तुकोरामबावा [तुकाराम नव्हे ] खेडकर म्हणून प्रसिद्ध होते. यांनीं लेखन वगैरे केल्याचा उल्लेख नाहीं. शिष्यशाखाहि नाहींत. उत्पन्न पुत्राचेंपुत्रीं चालू राहिलें.

६. तुका विप्रः—हे ब्राह्मण, एकनाथ सांप्रदायी, एका बाबाजीचे शिष्य होते. या गुरुशिष्याच्या समाध्या रहिमतपुरीं आहेत. यांनीं बरेंच पर्यटण केलें. पदें वगैरे केलीं. परंतु या सर्वांचे शेवटीं ते विप्र तुका किंवा तुका विप्र असाच उल्लेख करितात. नुसता तुका असें लिहीत नाहींत.

७. तुकोबा येहळेगांवकर :—यांना तुकेंद्र म्हणूनहि म्हणत. हे सुकेळी येथलि काशीनाथ नांवाच्या यजुर्वेदी ब्राह्मणाचे पुत्र व चिन्मयानंदाचे शिष्य होते. यांचा जन्म १८०९ इ.त झाला. समाधि इ. १८८७त घेतली. यांनीं संन्यास घेतल्यावर आपलें नांव ब्रह्मानंद असें घेतलें. हे भजन कीर्तन करीत. परंतु प्रायः योगमार्गीच होते. यांचें लिखाण वगैरे उपलब्ध नाहीं. गीतानुवादाची एक प्रत इ. स. १८१२ची उपलब्ध असल्यानें यांचा या अनुवादलेखनाशीं संबंध येणें अशक्य आहे.

याशिवाय (८) तुका सुंदरदास सतराव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेले. त्यांचें नासिकेतोपाख्यान उपलब्ध आहे. हे ब्राह्मण होते. (९) तुका नागनाथ हेहि ब्राह्मण होते व त्यांनीं गीतगोविंद व भर्तृहरीचीं शतकें लिहिलीं आहेत. (१०) गोविंद शिष्य तुका यांचेहि एक दोन ग्रंथ उपलब्ध आहेत व हेहि ब्राह्मण होते. हे तिघेहि आपला नुसत्या 'तुका' या शब्दांनीं उल्लेख करीत नाहींत. आणखी एक दोन मठ वर्षासन सांभाळणारे 'तुकोजी' आढळले. परंतु त्यांना एक 'शिष्य' यापेक्षां अधिक महत्त्व नाहीं.

सारांश, ज्यांची संतांत किंवा लेखकांत गणना होईल असे सर्व लहान-मोठे 'तुके' ब्राह्मण होते. गीतानुवादाचा लेखक आपणास 'वाणी' किंवा 'वैश्य' म्हणवितो : "बंधुतेंहि रणांगणीं । तुका वाणी यालागीं ॥ ४ ॥" [ गी. २५ ]. " ययालागीं तुका वाणी । हे निशाणी कर्मांची ॥ ४ ॥" [ गी. १२१ ]. "मातें समजली धृती । तुक्या वैश्यासारखी ॥ ४ ॥" [ गी. ३८५ ].

या पुराव्यांवरून गीतानुवादाचें लेखकत्व आतांपर्यंत माहीत झालेल्या तुकोबांपैकीं फक्त देहूकर तुकोबांकडे ओघानेंच येतें. ते वैश्य वाणी होते यांत शंका धरण्याचें कारण नाहीं. ते यातिहीन व शूद्रवंशीय झाले ते गीतानुवादावरून भिक्षुकांनीं जें त्यांच्याशीं भांडण उपस्थित केलें त्यांत प्रथम कारणरूपानें या दोन ' छिद्रां'वर भर दिल्यानें झाले. तुकोबांनीं याबद्दल निषेध व उपहास व्यक्त केलाच आहे. परंतु ते व त्यांचे समकालीन लेखक त्यांना ' वाणी ' जातीचे असेंच म्हणत. इतकेंच नव्हे तर अभंग ६८६मध्यें त्यांनीं वैश्यवर्णाचे जे धर्म सांगितले आहेत त्यांप्रमाणें ते ' कुणबी'हि होते. गीतानुवादांतील " ग्राहकाच्या आवडी । व्यापारिक उघडी घडी ॥ ३ ॥ न घे आणून ठेविली । तुका म्हणे शांती दिली ॥ ४ ॥ " [ गी. ४६९ ]. यासारख्या उक्ती वैश्य लेखकाकडूनच सहजा-सहजीं लेखनांत येणें शक्य आहे. यावरून हा गीतानुवाद तुकोबा वैश्य

वाण्याचा याबद्दल संशय नाहीं. परंतु हे तुकोबा वाणी देहूकरच कशावरून याची खात्री 'गीतानुवादांतील अंतर्गत पुराव्यां'वरून होईल. गीतानुवादांत वर्णलेल्या लेखकाच्या प्रवृत्ति, पारमार्थिक साधनवैशिष्टय, उपासना, मंत्र वगैरे वैशिष्टयें देहूकर तुकोबांच्या बाबतींतच लागू पडतात, इतरांस नाहींत, हें थोड्याहि विचारांतीं सहज पटण्यासारखें आहे.

८. अंतर्गत पुरावा : तुकोबांचें म्हणणें कीं, ज्या वह्या बुडविल्या त्यांतील कवित्व देवानें बोलविलें. सर्वच गीतानुवाद तुका-मनुष्याचा नाहीं. सर्व लेखक एके काळीं आपल्या लेखनाच्या स्फूर्तीचें श्रेय देवाकडे अगर चरित्रकार चरित्रनायकाकडे देतात. परंतु तुकोबांचें म्हणणें तशा स्वरूपाचें नसून तें साक्ष म्हणून दिवाणापुढें अट्टाहासानें मांडलें गेलें आहे. या गीतानुवादांतील विशिष्ट शब्दप्रयोगानें या साक्षीची उभारणी कशावर केली आहे हें समजतें. ' विश्वास तो देव' या अभंगांत तुकोबा म्हणतात "माझी बदवितो वाणी । ज्यानें धरिली धरिणी ॥ २ ॥ " [ २६३५ ]. गीतानुवादांतहि ते म्हणतातः " हा धर्मसंवाद मज तुज शब्दीं । अनुवादले नादीं लागूनियां ॥२॥ " [ गी. ७१२ ]. " तुका वदे विचक्षणीं । मांदुस रत्नखाणी । घ्यावें एकेक निवडुनी । वचनें शेषयायीचीं ॥९॥" [ गी. २३२ ]. " भाव शेषयायी जाणवितो ॥१॥ " [ गी. १६६ ]. या व गाथेंतील अभंगांतील साम्य हा एक महत्त्वाचा पुरावा आहे. कारण दोन्हीहि प्रकारचे उल्लेख या गीतानुवादालाच लागू पडतात.

आत्मारामबोवांनीं तुकोबांना शुक म्हणून 'गीतातत्त्वांत' थोड्या विस्तारानें संबोधलें आहे. ही कल्पना तुकोबांच्या अभंगांतील "म्हणवुनी अचला अन्वय । मातें मोजे निःसंशय । तुक्याची कृपा होय । तो शुक ऐसा अनुभवी ॥३॥" [ गी. ३८० ] या लिहिण्यावरून सुचणें साहजिकच आहे.

तुकोबांचा विशिष्ट विचारप्रवाह, भावना व अनुभव पुढील अभंगांत दृग्गोचर होतात. हे उल्लेख गाथेंतील उल्लेखांबरोबर ताडून पाहिल्यास ते एकाच संताचे असले पाहिजेत याची खात्री पटल्याशिवाय राहणार नाहीं.

तुकोबांच्या गाथेंत संसार, व्यवहार, आचार, स्वकर्मपालन वगैरेबद्दल बरेच उल्लेख आहेत. त्यांचें साम्य गीतानुवादांत कसें दिसतें तें पुढील उक्तींवरून दिसेल : " निष्कामाचें पावे फळ । जरी कुटुंबी केवळ ॥४॥ " [ गी. ११५ ]. " यासी लंघून वागतो । स्थितीं कोणत्या नांदतो । तुका प्रपंचीं वागतो । कैसा वदसी निराळा ॥३॥ " [गी.५५६]. "सांगावया हें कारण । क्षत्रिवंशी तूं निर्माण । झाल्या सुटेल कैसें रण । तुकया जैसा संसार ॥ ४ ॥ " [ गी. ६८६ ]. " तेथें निश्चयेंचि देव । तुकया नेणे हव्यकव्य ॥ ४ ॥ " [ गी. ३६८ ]. " पिंडोदकक्रिया लोपे देवराया । वोडंबरी वांया जाय जैसी ॥ ३ ॥ " [ गी. ४० ]. " वर्णधर्म अवधारा ॥ ४ ॥ " [ गी. ६८२ ]. " स्वकर्माचें पालन । कीजे नको उत्थापन । तुका बोलिला साधन । तेंच पाहे सर्वदा ॥ ३ ॥ " [ गी. १४५ ].

पायवाट, पंथ व वैकुंठाबद्दलची कल्पना तुकोबांच्या गाथेंत विशेषार्थानें येते. त्याचप्रमाणें ती गीतानुवादांतहि आढळते. " तुका म्हणे केली पाय-वाट भली । जड मूढ तरली कांसेलागीं ॥ ७ ॥ " [ गी. ५६७]. " तुका म्हणे पथ ज्यास जो आवडे । तेणें केलें उघडे लोकां तैसे ॥ ४ ॥ " [गी. ५२३]. "तस्मात् ब्राह्मणा तूं होसी । तरी त्यागी या तिघांसी । मग शुद्ध मार्ग जासी । जैसा तुका वैकुंठीं ॥ ४ ॥ " [ गी. ६०७ ].

तुकोबा नेहमीं साधुसंत व सज्जनांनाच संबोधून विनवणी करतात. हें एक त्यांच्या गाथेंतील वैशिष्ट्य होय. तेंच गीतानुवादांतहि स्पष्टपणें विपुल उतरलें आहे : "चार्वाकाचें ज्ञान खोटें । भले म्हणती अवचटे ॥ २ ॥ तुका विनवितो संता । चित्त देणें अपूर्वता ॥ ४ ॥" [ गी. ६४ ]. "तुका विनवितो संतां । ऐसी वार्ता सुनाट ॥ ४ ॥" [ गी. १२३ ]. "तुका म्हणे भाग्य भासे सज्जनांचें । झाले प्रकाशाचे वांटेकार ॥ ४ ॥" [गी. १६२ ]. "तुका विनवणी ऐकावी सज्जनी । समाप्त येथूनि प्रसंग हा ॥ ३ ॥" [ गी. २०२]. " सर्वभूतहितीं रत । पाहाती संत तुकयासी ॥ ४ ॥"

[ गी. २२७]. "तुका विनवी वारंवार। माझ्या मतीं हर्ष फार। संतीं न करावा अव्हेर। प्राकृत भाषा म्हणोनी ॥ ३ ॥" [ गी. २३१ ]. "तुका म्हणे आतां सांगेल अंतर। न धरूनियां दूर सज्जनांसी ॥ ३ ॥" [ गी. ३१३ ]. "उपाधिका बीज तेंही मी अर्जुना। ठावकें सज्जना तुका म्हणे ॥ ४ ॥" [ गी. ३६२ ]. "जगदात्मक जो अनंत। तुका संत ज्यासाठीं ॥ ४ ॥" [ गी. ४२९ ]. "मुनि दिव्य तेजोमय। नागकुळसमुदाय। ऐसा पाहिला प्रत्यय। तुका साधु त्यासाठीं ॥ ४ ॥" [ गी. ४३३ ]. "विषयां उजळी माझी तेज ज्योती। जेथें मिळे अंतीं तुका साधु ॥ ४ ॥" [ गी. ५७६ ]. "तुका विनावितो संता। ऐका मागील संमता ॥ ४ ॥" [ गी. ५३३]. "तुका विनवी साधूंस। सत्त्वधृति हे देवास। आवडली अर्जुनास। सांगे प्रेम आदरें ॥ ४ ॥" [ गी. ४७५ ]. "तुका म्हणे संताप्रती। जैशी सारांश पद्धती ॥ ४ ॥" [ गी. १८६ ].

तुकोबा अभंगांत किंवा पदांत कवित्व करीत. कारण त्यांचा गाणें व भजनावरच विशेष भर होता. भजन कीर्तन हेंच त्यांचें खरें साधन. अर्थात् हा विचारप्रवाह गीतानुवादांतहि शिरणें नैसर्गिक होतें : " तुका वदेल भजन।—॥ ३ ॥ " [ गी. ३४ ]. " तुका ध्याय ध्यानाजवळ। याची अखंडीत माळ। म्हणून संतांमाजी खेळ। झाला ब्रह्मप्राप्तीचा ॥ ५ ॥ " [ गी. १९२ ]. " आतां माझी भाक्ति मातेंच पावेल। आनंदें गाईल तुका जैसा ॥ ५ ॥ " [ गी. ३६३ ]. " तें तामस गा पार्था तप त्वां जाणावें। आतां सत्त्वाभावें गाय तुका ॥ ४ ॥ " [ गी. ६३१ ]. " तुका निजानंदें गाय। तेथें कान मी देतों ॥ ४ ॥ " [ गी. ४९२ ].

तुकोबांची एकविध भक्ति, भक्तिमहिमा व नाममहिमा विख्यातच आहे. तो गीतानुवादांतहि दृष्टीस पडल्यास नवल कसलें : " घटाला मृत्तिका जेवीं व्यापी ऐका। तैसा आम्हां तुका एकविध ॥ ४ ॥ " [ गी. ३९३ ]. " तुका म्हणे नाम ज्याचें। ऐकिल्या यम काळाचें। हृदय फुटे मग

जीवाचें । काय बोलूं माहात्म्य ॥ ४ ॥ ” [ गी. २८७ ]. “ हेंचि ब्रह्म-रज्जू । सांगे भक्तराजू तुकयाचा ॥ ४ ॥ ” [ गी. ५६६ ].

तुकोबा कट्टर अद्वैतवादी होते. त्याचा मासला : “ ऐके यथाविधि राया । तुका अद्वयाचा संगीं ॥ ४ ॥ ” [ गी. ६६१ ].

वारकरी पंथांतील हरिहराचाहि उल्लेख यांत आला आहे : “ हरिहरा मन जे झालें अर्पण । तुका म्हणे पूर्ण प्रसाद तो ॥ ३ ॥ ” [गी. १०९].

तुकोबांच्या पारमार्थिक अनुभवाचाहि ठसा यांत आहे : “ खुंटे पुन्हां त्याचा जन्म । अनुभवे तुकाराम ॥ ४ ॥ ” [ गी. १६९ ]. “ सत्कर्में कर्मयोगी । तुका भोगी जें सुख ॥ ४ ॥ ” [ गी. १२० ]. तुका म्हणे देवज्ञानाचा अनुभव । सुगम हे ठेव साधकाची ॥ ३ ॥ ” [ गी. ९६ ]. “ यास्तव अनुभवसार । देवो त्यास निवेदी ॥ ३ ॥ ” [ गी. ८२ ].

तुकोबांच्या स्वर्गप्राप्ती, अक्षयसुख व सायुज्यतेच्या श्लेषाचीहि उदाहरणें आढळतातः “स्वर्गापरतें नाही सुख । ऐसे पावले मूढ देख । तुका देवापासी सुख । अक्षयाचें मागत ॥३॥ ” [गी. ८७]. “ अंत झाला ईच्या संगी । सायुज्यास पावे अंगीं । तुका म्हणे वाट । केली सुलभ ते नीट ॥ ४ ॥ ” [ गी. ११७ ].

तुकोबांच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य सिद्धांत ते त्यांच्या आवडत्या गजेंद्रमोक्षाच्या कथेच्या रूपानें सांगतात.गीतानुवादांतहि त्याचा उल्लेख आहे. “तुका म्हणे नामें झाला गज मुक्त । प्राणी तो अशक्त उद्धरेच ॥४॥” [गी. ३१४].

परंतु ज्या पांडुरंगाचा गीतेंत उल्लेख असणें अशक्य त्या पांडुरंगाचाहि उल्लेख आपल्या विवरणांत विशेषत्वानें आणला आहे. हे व ‘रामकृष्णहरि’ मंत्राचे उल्लेख हा गीतानुवाद देहूकर तुकोबांचाच असें समजण्याला अखंडनीय पुरावा आहे. वरील सर्व उतारे हे तुकोबांच्या स्वतःच्या विवरणांतील होत. ते श्लोकाच्या भाषांतरांत येणारे विषय नाहींत हें अवश्य लक्षांत ठेवलें पाहिजे. गाथेंतील समानार्थी उल्लेख येथें स्थलावकाशामुळें दिले नाहींत. ते

तेथें वाचकांस सहज सांपडण्याइतके विपुल आहेत. शेवटीं पांडुरंग व तुकोबांचा आवडता मंत्र यांचे उल्लेख देऊन हें प्रकरण संपवितों: "नर तो सुखी तोची योगी । पांडुरंगीं तुकया तो ॥४॥ " [ गी. २२५ ]. " पैज घाली तूं हे जगीं । तुका लीन पांडुरगीं ॥४॥ " [ गी. ३६९]. " श्रीगुरु पांडुरंगपायीं । गुरुदास ठेवी डोई ॥ ३॥ " [ गी. ४७६ ]. " श्रीगुरु पांडुरंगदासा । दिल्हा तुकयानें भरंवसा ॥१०॥" [गी. ५८६]. "निग्रह चित्ताचा चित्तांत निष्काम । सदा स्मरे ' रामकृष्णहरि ' ॥१॥ "[ गी. ६२८ ].

९. <u>समकालीन साक्षीदार</u> :– तुकोबांशीं संबंध आलेले लोक फारसे मोठे पंडित किंवा लेखक नव्हते. त्यामुळें तुकोबांचे उल्लेख फारसे आढळत नाहींत. रामेश्वरभट्टांचे पांचच अभंग उपलब्ध आहेत. त्यांतील एकांत अप्रत्यक्षपणें गीतानुवादाचाच उल्लेख केला आहे यांत शंका नाहीं. " पंडित वैदिक अथवा दशग्रंथी । परी सरी न पवती तुकयाची ॥ १ ॥ शास्त्रेंही पुराणें गीता नित्य नेम । वाचिताती वर्म न कळे त्यांसी ॥ २ ॥ तैसा अमृताची वाणी वरुषला शुद्ध । करी त्या अशुद्ध ऐसा कोण ॥५ ॥ चहूं वेदांचें हें केलें विवरण । अर्थही गहन करूनिया ॥ ६ ॥". तुकोबानें गीताश्लोकांचें अगदीं स्वतंत्रपणें भावार्थानें नव्हे तत्त्वार्थानें केलेलें विवरण पाहिलें म्हणजे रामेश्वराच्या म्हणण्याचा प्रत्यय आल्यावांचून राहणार नाहीं.

दुसरा महत्त्वाचा व निकट सहवासांत आलेला साक्षीदार म्हणजे बहिणाबाई. बहिणाबाईनें कोल्हापुरास असतांना तुकोबांचीं अद्वैतपर पदें ऐकलीं होतीं व त्यांची कीर्तीहि तिच्या कानीं भरपूर आली होती. तिला स्वप्नांत तुकोबांचा बोध झाला तेव्हां तिला "ठेवोनिया कर मस्तकीं बोलिला । मंत्र सांगितला कर्णरंध्रीं ॥ ७ ॥ म्यांही पायांवरी ठेविलें मस्तक । दिधलें पुस्तक मंत्र गीता ॥ ८ ॥ " [ २५]. यावरून ' मंत्र-गीता पुस्तका 'चा महिमा व विशेष तिच्या कानांवर होता हें स्पष्टच होतें. बहिणाबाई

म्हणतात कीं, " गीतेचें पठण करीं मीं सर्वदा । वेदांची मर्यादा नुल्लंघोनी ॥ १३ ॥ " [ ९९]. परंतु हें पठण संस्कृत पाठाचें कीं, मंत्र गीतेचें हा मुद्दा संशयित राहतो. ती पुढें म्हणते कीं, " ग्रंथ पहावे पहावे गीता कीं भागवत । मार्ग धरावे कर्मब्रह्मनिष्ठायुक्त ॥ " [ ६१४ ]. अर्थात् हे ग्रंथ पाहणें सामान्य माणसांस संस्कृतांतून पहा म्हणणें शक्य नाहीं. तर " गीतार्थ पाहोन असत्य त्यजावे । सत्यासी भजावें आदरेंसी ॥ १ ॥ " [ ३७२ ]. या तिच्या म्हणण्याप्रमाणें महाराष्ट्र वाणींतील गीतार्थ पाहावयास ती सांगते यांत शंका नाहीं. कारण तिला माहित होतें कीं, तुकोबा "महाराष्ट्रीं शब्दांत वेदांतांचा अर्थ । बोलिला लोकांत सर्वद्रष्टा ॥४॥ " [ २४ ]. तिनें केलेल्या श्रीमद्भगवद्गीतेच्या आरतींत " श्रवणें गीता अथवा पाठांतर गीता । झाली तरी साची हरि विक्रित निजभक्ता । विवेश अर्थान्वय जरी सांगे मुखें वक्ता । तोचि हरीरूप जाणा देहचारी असतां ॥ २ ॥ " [ ६२८ ]. ही कल्पना किंवा अनुभव तुकारामांच्या प्रत्यक्ष उदाहरणावरून आल्यास नवल कोणतें. कारण बहिणाबाई ज्या तुकोबांना सारसर्वस्व समजून इतकेंच नव्हे तर " अखंड हें चित्तीं ध्यान तुझें ॥ ६ ॥ बहिणी म्हणे माझा तैसा प्राणसखा । तुकाराम देखा सर्व धनी ॥ ७ ॥ " [ ५२५ ] मानून सांगते कीं, " लोक बोलती सकळ । तुकोबा केवळ पांडुरंग ॥ ६ ॥ " [ ५३ ]. अर्थात् यावरून बहिणाबाई ज्या गीता वाचनाचा उपदेश करते ती गीतार्थ पोथी होय व हीहि गातां येण्याजोग्या वृत्तांत असली पाहिजे. तिनें आपल्या ' शेवटच्या विनतीं'त म्हटलें आहे कीं, " दिनरातीं छंद लागो हाचि मानसीं । रामा रामा कृष्णा गाऊं गीतेसी ॥ २ ॥ " [ ६९७ ]. ज्या ज्ञानेश्वरीला आरतींत " जय माये ज्ञानदेवी । शब्दरत्न-जान्हवी ।" [६३२] असें ती म्हणते ती कांहीं पाठांतराची पोथी नाहीं. तिचा मुलगा विठ्ठल यानें बहिणाबाईस उद्देशून "ज्ञानेश्वरीचें करिसी पारायण अंतीं । " [ ६३९ ] असें म्हटलें आहे. सारांश, बहिणाबाईचे उल्लेख तुकोबांच्या 'मंत्रगीते'चे होत याबद्दल संशय नाहीं.

तिच्या लिहिण्यांत आणखी एक पुरावा मिळतो. बहिणाबाई आपल्या मृत्यूच्या कालाबद्दल लिहिते : " मृत्यूचे प्रसंगीं असावें सावध। आत्मनिष्ठ बोध राखोनियां ॥ १ ॥ ऐसें गीतेमाजीं बोलीला भगवंत। आज तो वैकुंठ असे आम्हां ॥ २ ॥ अग्नीचें तें बळ आहे आजी देहीं। ज्योती तें हृदयीं सावधान ॥ ३ ॥ दिवसाचि मृत्यु शुक्लपक्षीं आहे। सांगितलें पाहे विचारोनी ॥ ४ ॥ नाहीं एक आजी उत्तरायण खरें। सद्गुरुनिर्धारें काय काज ॥ ५ ॥ उत्तराभिमुख घालोनि आसन। धैर्य सावरोन प्राण रोधी ॥ ६ ॥ सद्गुरुस्मरणीं पांचही ते योग। आम्हांसी तें सांग फळा आले ॥ ७ ॥ बहिणी म्हणे तुज सांगितलें वर्म। पुढीलाही क्रम पाहे डोळां ॥ ८ ॥" [१०१]. "प्रपंच विन्मुख जालीयानें चित्त। उत्तरायण सत्य तेंचि आम्हां ॥ १ ॥ नाहीं काज तया उत्तरायणाचें। सांगितलें साचें पुत्रराया ॥ २ ॥ प्रपंचाभिमुख मानस सर्वदा। दक्षिण प्रसिद्धा जाण तेची ॥३॥ बहिणी म्हणे वेदशास्त्राचें संमत। सांगितलें मत स्वानुभवें ॥४॥ " [१०२]. हे दोन अभंग गीतानुवादांतील क्रमांक ३३२ ते ३३६शीं अवश्य ताडून पाहावेत. संस्कृत श्लोकांपेक्षां यांत भावार्थ अधिक आहे. आणि तो इतर कोणत्याहि महाराष्ट्रीय टीकेंत आढळत नाहीं. या अर्थाचा अभंगहि ज्याअर्थी गाथेंत नाहीं त्याअर्थी बहिणाबाईच्या पाठांतरांत ह्या गीतानुवाद असावा असें समजण्यास ह्या एक महत्त्वाचा पुरावा होतो.

वामन पंडित [ पार्थसारथी ] यांनीं व इतरांनींहि भगवद्गीतेस 'भारती वेदमाता' म्हणून संबोधलें आहे. वामन पंडित तुकोबांबद्दल लिहितांना म्हणतात कीं, "जयाची वदे पूर्ण वेदांत वाणी। म्हणावें कसें हो तयालागी वाणी ॥ जयाचे मुखीं भारती वेदमाता। तया प्राप्तिची कायसी जाण चिंता ॥ १ ॥" यावरून तुकोबांना गीता मुखोद्गत होती असें मानण्यास हरकत नाहीं. गीता भागवत वाचणाऱ्यांची सेवाहि करण्यास तयार होणाऱ्या तुकोबांनीं ती "सकळांसाठीं" देवाचे आज्ञेनें मराठींत करणें अगदीं

साहजिक होतें. विशेषतः तुकोबा जेव्हां गीतेच्या आधारें म्हणतात कीं, "ऋषीश्वरीं बहुविध स्वानुभऊ। वेदिक समुद्द वर्णिलेलें ॥ १ ॥ नाना युक्ती त्यांच्या भाषा गीर्वाणींच्या। सिद्धांत गर्भींच्या टेवण्या ज्या ॥२॥ तुका म्हणे वाणी प्राकृत शिराणी। झाली हे कहाणी नका म्हणूं ॥ ४ ॥" [ गी. ५०३ ] म्हणून तक्रार करतात तेव्हां तर त्यांस ही अडचण दूर करण्याची खटपट करणें अवश्यच होतें.

१०. <u>गाथेंतील गीताविषयक महत्त्वाचे उल्लेखः</u>—तुकोबा जातिहीन व शूद्रवंशीय म्हणून कांहींहि ' घोकाया ' अधिकारी नव्हते. आपल्या लिहिण्यास प्राचीन आधार द्यावेत तर अनधिकारी. अर्थात्च एकदां दिव्यापर्यंत मजल गेल्यानंतर आपला मार्ग सोडून नसत्या कलहांत शिरणें तुकोबांना अनावश्यक वाटणें साहजिक होतें. त्यामुळें जरी तुकोबांच्या लिहिण्यांत ' गीर्वाण ' भाषेंतील वचनांचा शब्दशः अनुवाद आढळतो तरी आपण त्या आधारावर बोलतों हें सांगण्याचें त्यांनीं बुद्ध्याच टाळलें असणें साहजिक आहे. अर्थात् ज्या तत्त्वज्ञानाचा गीताभागवतावर भर आहे त्या गीताभागवताच्या महतीबद्दल अगर त्यांतील आधारवचनांबाबत तुकोबांच्या गाथ्यांत फारसें लिहिलें गेलें नाहीं. अशा प्रकारचे अगदीं थोडेच उल्लेख आढळतात आणि तेहि परस्पर हवाल्याचे किंवा अप्रत्यक्षपणें सूचक असे आहेत.

गीतानुवादाच्या शेवटीं जे दोन महतीचे अभंग [ गी. ७२३ व ७२४ ] दिले आहेत ते नेहमीच्या रिवाजाप्रमाणें गीतानुवाद करतांनाच लिहिले गेले असून त्यांचा परामर्ष दिव्यांतच घेतला गेला. चारी वेद व अठरा पुराणें हीं ईश्वरनिर्मित ईश्वरासाठीच आहेत आणि तो ईश्वर म्हणजे विठोबा हें दर्शवितांना तुकोबा लिहितात कीं, " गीता जेणें उपदेशिली। ते ही विटेवरी माऊली ॥४॥ " [ १६९६ ]. अशा रीतीनें विठोबा हाच कृष्ण हे मानल्यानंतर हें संसाराचें ओझें वाहता वाहविता तोच आहे हें सांगतांना ते म्हणतात कीं, " गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे। योगक्षेमकाजें करणें त्याचें ॥२॥

चतुर्भुजा करीं वारू श्रृंगारावे । सारथ्य करावें अर्जुनाचें ॥ ३ ॥" [ ३२२ क्षेपक]. हा अभंग कदाचित् क्षेपक ठरेल; परंतु गीताभागवताचें तत्त्वज्ञान इतर सर्व 'गीर्वाण' भाषेंतील ग्रंथ किंवा तत्त्वज्ञानापेक्षां अधिक श्रेष्ठ आहे हें अप्रत्यक्षपणें पण जोरानें प्रतिपादणारा अभंग क्षेपक नाही. त्यांत तुकोबा म्हणतात : "गीता भागवत करिती श्रवण । अखंड चिंतन विठोबाचें ॥३॥ तुका म्हणे मज घडो त्यांची सेवा । तरी माझ्या देवा पार नाहीं ॥ ४ ॥" [ ९ ]. याशिवाय "विश्वास तो देव " [ २६३५ ] या अभंगांत गीता म्हणजे शेषशार्याचीं वचनें व तीं माझी नव्हत म्हणून निर्वाळा दिला आहे. " मुळीचें लिहिलें । मज आतां सांपडलें ।। ३ ॥ तुका म्हणे मज । नलगे बोलणें सहज ॥ ४ ॥" [ २८०७ ] हीहि उक्ति गीतानुवादांतील अभंग ३७४ व ४७६ शीं ताडून पाहतां ती गीतेलाच अनुलक्षून असावीसें दिसतें. तुकारामकृत हरिपाठाचे अभंग गाथेंत आले नाहींत. त्यांत एक अभंग आहे तो : "गीता भागवत देव उच्चारितां । पापाची तो वार्ता कोठें राहे ॥ १ ॥ म्हणोनियां नेम ऐसा तारी जीवा । तोचि होय देवा आवडता ॥३॥". याशिवाय आणखी एक अभंग अप्रसिद्ध म्हणून श्री. अजगांवकर यांनीं प्रसिद्ध केला आहे. तो बरेच बाडांत आढळतो. तो असा : "२४३. आहे भगवद्गीता । पूर्ण अमृतसरिता ॥ १ ॥ एक एक अक्षरांत । आहे माझा रमाकांत ॥ २ ॥ जो हा सगुण निर्गुण । एक रुक्मिणीरमण ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्ञानेश्वरी । आत्मपदीची सोयरी ॥ ४ ॥". हा गीतानुवादांतील अभंग २३२ मधील " तुका वदे विचक्षणीं । मांदुस गीतारत्नखाणी । घ्यावीं एकेक निवडुनी । वचनें शेषशार्याची ॥ ९ ॥" व अभंग ४७३ तील "जरी आवडी सगुणीं । चित्त ठेवी रे निर्गुणी ॥ ३ ॥" या चरणांशीं ताडून पाहतां त्यांतील विचारप्रवाहाची ऐक्यता दृष्टीस पडेल. कांहीं हस्तलिखित गाथ्यांत आणखी एक अभंग आढळतो तो : "पूर्ण आत्मज्ञान अनुभव खुण । जेणें त्रिभुवन व्यापियेलें ॥ १ ॥ अणुरेणु जाती ब्रह्मांडाच्या

कोटी । ज्ञानाचिये पोटीं दिसे जया ।। २ ।। ऐसी पवित्रता बोलतसे गीता । ज्ञाना त्या अनंता भेद नाहीं ।। ३ ।। तुका म्हणे ज्ञान तोचि नारायण । जाणती सज्ञान गुरु पुत्र ।। ४ ।। [ मो. गा. ३३२१ ]." देवानीं गीता लिहविली या वादाची चर्चा पुढें आहेच. यांतील देवानें म्हणजे 'सद्गुरूनें' याअर्थी उल्लेख बरेच आढळतात. त्या अनुसंधानानें तुकोबांचें पुढील पद उद्बोधक आहेः "गस्त करी चार सहा । अठरा हांका जो मारी । अनुहात तुतारी । वेद डफ हा हातीं ।। गस्त० ।। ३ ।। गीता सांगे सद्गुरू । अर्थ शोधुनि पहा रे । तुका म्हणे सत्य तत्त्व । सत्य होऊनि राहे रे ।।गस्त०।।४।।"* कांहीं लेखकांनीं व चरित्रकारांनीं गीतेंतील श्लोकांचे किंवा चरणांचे समानार्थी अभंग शोधून दिले आहेत. अशीं वचनें एकत्र केलीं तर बरींच होतील. त्यांशिवाय आणखीहि कांहीं वचनें उद्धृत करतां येण्यासारखीं आहेत. परंतु तीं सर्व येथें विस्तारभयास्तव न देतां उदाहरणार्थ म्हणून अगदीं थोड्यांचाच उल्लेख करतों :

(१) गीता अ. ४ श्लो. ७ : यदा यदाहि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत । = गाथा : धर्मरक्षणासाठीं करणें आटी आम्हांसि ।। [ १२५]. (२) गी. अ. ३ श्लो. २१ : यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः = गाथा : जया शिरीं कारभार बुद्धिसार० [ १९५९ ]. (३) गी. अ. ११ श्लो. ५५ : निर्वैरः सर्वभूतानां = गाथा : दया तिचें नांव भूतांचें पाळण । [ १२९ व १६३८ ]. (४) गी. अ. २ श्लो. २२ : वासांसि जीर्णानि यथा० = गाथा : जीव न देखे मरण०. (५) गी. अ. २ श्लो. ४६ : यावानर्थ उदपाने सर्वतः० = गाथा : गंगेचिया अंतेविण० [ ४८३ ]. (६) गी. अ. ३ श्लो. ६ : कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते० = गाथा : भोगे०

---

* पद १५७वें, अनेक कविकृत पदें, कटाव, लावण्या वगैरे, तुकारामकृत पदें—अंक ४५, सप्टेंबर १८९३, पृ. ७७, काव्यसंग्रह, सं. वामन दाजी ओक, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

[ ६८ व १०३७ ]. (७) गी. अ. ६ श्लो. ५ : उद्धरेदात्मनात्मानं० =गाथा : आपणाचि तारी आपणाचि मारी०. (८) गी. अ. ९ श्लो. २१ : ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं० = गाथा : जरी मागो पद इंद्राचें ।. (९) गी. अ. ९ श्लो. २२ : अनन्याश्चिंतयन्तो० = गाथा : संसाराचें ओझें०. (१०) गी. अ. ९ श्लो. ३० : अपि चेत्सुदुराचारो० = गाथा : न व्हावीं तीं जालीं०. (११) गी. अ. १७ श्लो. २३ : ॐतत्सदिति निर्देशो० = गाथा : ॐ तत्सदिति सूत्राचें सार ।. (१२) गी. अ. १५ श्लो. १६ : द्वाविमौ पुरुषौ लोके० = गाथा : क्षरा अक्षरा वेगळा ।. (१३) गी. अ. १५ श्लो. १७ : उत्तमः पुरुषस्त्वन्यः० = गाथा : तुका राहिला सोवळा. (१४) गी. अ. ८ श्लो. ५ : अन्तकाले च मामेव० = गाथा : अंतकाळीं ज्याच्या०; इत्यादि.

वरील उताऱ्यांतील पहिले तीनचार श्री. न. र. फाटक यांचे लेखांतील* आहेत व इतर पांगारकर, माडगांवकर व धुरंधर यांच्या चरित्रांतील आहेत. इतर चरित्रांतून आणखी बरेच उल्लेख सांपडतील. विनोबा भावे यांच्या 'संतांचा प्रसाद' या व अशाच इतर ग्रंथांतून आणखीहि उल्लेख आढळतील. येथें फक्त नमुना म्हणून कांहीं दिले आहेत.

गीतेंतील श्लोकांच्या समानार्थी अभंग देण्याचा जसा प्रयत्न झाला आहे तसाच गीतेवर निबंध पुस्तकांत तुकोबांच्या अभंगांचा आधार घेण्यांत येतो. आधारार्थ घेतलेल्या अभंगांची संख्या इतकी मोठी आहे कीं, त्यावरून सहज अनुमान निघतें कीं, तुकोबांच्या कवित्वावर गीतेंतलि तत्त्वज्ञानाचाच विशेष पगडा बसला आहे. गाथेंतील वाङ्मयाला नुसतें ज्ञानसंग्रह म्हणूनच महत्त्व प्राप्त झालें आहे असें नाहीं. त्यांत अनुभवसिद्ध ज्ञानच अधिक भरलें आहे. लोकमान्य टिळकांनीं आपल्या गीतारहस्यांत

* पृ. ३९१-९९, विविधज्ञानविस्तार, पुस्तक ६०, अंक ११, नोव्हेंबर १९२९, "रामदास व तुकाराम", ले. नरहर रघुनाथ फाटक.

तुकारामांच्या या ज्ञानाचा निर्वाळा दिला आहे. *भक्तिमार्गाच्या विवरणांत तर त्यांचा तुकोबांच्या अनुभवावरच विशेष जोर आहे. लोकमान्यांनीं अभंगांची जी निवड करून त्यांच्या अर्थाची फोड केली आहे ती वाचल्यास तुकोबांच्या श्रेष्ठ ज्ञानाचा कोणालाहि अचंबा वाटेल. "पुरुषार्थदीपिका"§ म्हणून एक ग्रंथ आहे. त्यांत ईश्वरस्वरूप, जीवेश्वरवैलक्षण्य, भगवद्भक्ती, सत्संगती, संन्यास, कामत्याग, नामसंकीर्तन, सत्वशुद्धि, तत्त्वाजिज्ञासा, निर्गुणज्ञान, ज्ञानयोग, आचार्योपासना, भक्तियोग, भक्तिनिरूपण, जीवन्मुक्ति, पराभक्ति, परागति, सायुज्जता वगैरे प्रकरणांवर निरनिराळ्या ग्रंथाधारें आणि विशेषतः गीताटीकांचे आधारें विस्तुत टीका केली आहे. त्यांत तुकोबांचे कितीतरी अभंग स्पष्टीकरणार्थ घेतले आहेत. अशा तऱ्हेनें निरनिराळ्या अभगांतील तत्त्वार्थ व त्यांचा तौलनिक दर्जा स्पष्ट झाल्यानें तुकोबांच्या उच्च तत्त्वज्ञानांतील श्रेष्ठत्वाचा बोध होतो. त्यांच्या सुलभ व सहज बोलांत फार गुह्यार्थ भरला आहे हें दिसून येतें. विशेषतः त्यांचें लेखन जसें स्वानुभवावर आधारलें आहे, तसेंच तें 'वेदांताचें सार' जी गीता तिच्या भक्कम पायावर उभारलेलें आहे हेंहि पटतें. त्यांच्या शिकवणुकीनुसार उच्च पारमार्थिक साधनांचा अभ्यास करणें सहज व सुलभ आहे असा आत्मविश्वास जागृत होतो. अशाच तऱ्हेचे कितीतरी लेखकांनीं तुकोबांच्या वाङ्मयाची चिकित्सा केली आहे. त्याचा विचार केला तर तुकोबांच्या गीताविषयक सखोल ज्ञानाबद्दल शंका घेण्यास जागा राहत नाही.

---

* "श्रीमद्भगवद्गीतारहस्य अथवा कर्मयोगशास्त्र," ले. बाळ गंगाधर टिळक, ४०४–४३९, चतुर्थ मुद्रण, पुणें, १९२३.

§ "पुरुषार्थदीपिका or the Supreme Goal of Human Life," ले. रामचंद्र शंकर टाकी, प्र. रामकृष्ण वासुदेव बर्वे, मुंबई, १९१८ इ.

११. गीतानुवादावरील नंतरचे अभिप्राय :– दिनकर कविकृत पंचीकरणाचा अठरावा अध्याय शके १६५२ म्हणजे इ. स. १७३०त पुरा झाला. त्यांत बहिणाबाईची गुरुपरंपरा देतांना दिनकर लिहितात कीं " बाबा चैतन्ये चेतन्यरूप । तुकोबा तो त्यांचा दीप । ज्याच्या वचनांचा प्रताप । ब्रह्मरूप जीव होये ॥२९॥ बाप जयाची ते वाणी । वेद वेदार्थ निरोपणी । बहिणाबाईचिया ध्यानीं । तेचि मूर्ती उसावली ॥३०॥ "*.

मोरोपंतकृत पांडुरंगस्तोत्र ( तृतीयम् ) यांत पुढील आर्या तुकोबांच्या भाषाशुद्धतेबद्दल साक्षी देते: " वरदराज, मुकुंद तुकाभिधो वणिगतिप्रथितः स्तवनैस्तव,। सकलसाधुमनः परितोषकृत्कविवरो विवरो चितशुद्धवाक् ॥९॥"§ मोरोपंतांच्या तुकारामस्तुतींतहि त्यानें तुकारामांच्या गीताज्ञानाबद्दल उल्लेख केला आहे. अधिक शोध घेतला तर इतर उत्तरकालीन काव्य वाङ्मयांत आणखीहि बरेच आभिप्राय सांपडूं शकतील.

रामदासी आत्मारामबोवांनीं ' गीतातत्त्व ' नांवाचें सुमारें १५० ओव्यांचें प्रकरण लिहिलें आहे. त्यांत तुकोबांच्या कवित्वाबद्दल आत्माराम स्वामींनीं आपला अभिप्राय दिला आहे. तो जरी सर्व सांप्रत विषयाला संपूर्णत: धरून नाहीं तरी तो येथें मुद्दाम देत आहें. स्वामी म्हणतात : "चार वेद जाले । परी नाहीं जग उद्धरलें । म्हणूनि जन्मा आले । तुकोबा साधु ॥५२॥ तेणें जे कविता केली । ती बहुताचे उपेगा आली । पोट भरावयास जाली । सद्विद्या ॥५३॥ साधी आणि स्वल्प । पाठ करितां पळे पाप । अर्थ घेतां सताप । दूरी होये ॥५४॥ पाप ताप दैन्याची । उरी उरेना

---

* '१४४. बहिणाबाईची गुरुपरंपरा' दिनकर कविकृत पंचीकरणाचा शेवटचा ( १८ वा ) अध्याय", द. वा. पोतदार, भा. इ. सं. मंडळ, वार्षिक इतिवृत्त, शके १८३७, पुणें.

§ पृ. १५०, अंक १९, जुलै १८९१, काव्यसंग्रह, सं. वामन दाजी ओक, निर्णयसागर छापखाना, मुंबई.

मानवाची । ऐसी योग्यता कवितेची । अनुभवी जाणती ॥५५॥ सहज बोलणें तेही उपदेश । मनाचा पालट विशेष । होऊनीयां येथ । भगवंतीं जोडे ॥५६॥". तुकोबास शुकाची उपमा देऊन नंतर देवाचा शोक म्हणून ज्या ओव्या आहेत त्यांत " ब्रम्हदेवें चार वेद केले । परी माझें मन नाहीं धालें । तुका वाणी सहज बोले । मी डोलें ते ऐकुनी ॥१०१॥ एक एक अक्षर । कानी पडतां ब्रह्माक्षर । अर्थ पाहातां क्षराक्षर । उणा दिसे ॥१०२॥ ... तुकोबा देवचि जाला । आपण देव होऊनी उरला । जगासाठीं ॥१०९॥ देव म्हणे वो रुक्मिणी । पांचवा वेद तुका वाणी । जे बोलिला आर्जुनी । गीतातत्त्व ॥१११॥ त्या गीतेचा अर्थ जाणे । तुकयाचे अंगी बाणे । तयाचें तें बोलणें । गीतातत्त्व ॥११२॥ गीतेचे अर्थासाठी । बहुतीं केली आटाआटी । तुका सहज बोले गोष्टी । तेंचि गीतातत्त्व ॥११३॥ ... एक पाहे चक्रपाणी । गीता भागवत पठणीं । निज ध्यास ॥११६॥"*. आत्माराम स्वामींचा हा अभिप्राय मननीय आहे यांत संशय नाहीं.

१२. <u>तुकोबांच्या छळाची कारणमीमांसा</u> :– तुकोबांच्या छळाचे अगदीं थोडेच प्रसंग आज सांगण्यांत येतात. पहिला वह्या बुडवण्याचा, दुसरा शिवजी कासाराच्या बायकोनें त्यांच्या अंगावर उकळतें पाणी ओतल्याचा व तिसरा मंबाजी गोसाव्यानें मारल्याचा. यांतील शेवटच्या दोन प्रसंगांबद्दल मागें चर्चा झालीच आहे. त्यांतील दुसरा प्रसंग असंभवनीय व तिसरा विकृत स्वरूपांत प्रसृत झाला असल्यानें त्यांच्या कारणमीमांसेचें प्रयोजन उरत नाहीं. पहिला प्रसंग जितका महत्त्वाचा तितकाच तो सर्वव्यापी आहे. तुकोबा जें लिहीत तें भिक्षुक ब्राह्मणांना मान्य नव्हतें हें एकच कारण

---

* ' गीतातत्त्व—आत्मारामकृत, बाड नं. ६२५, समर्थ वाग्देवता मंदिर, ' रामदासी बाडें, अंक १५९, वर्ष १४ वें, श्रीरामदासी संशोधन, रामदास आणि रामदासी, धुळें.

समकालीन व नंतरचे लेखक सुचवितात. त्यांत दुमत नाहीं. दुमत होण्याचा प्रसंग तपशिलांत येतो. आणि हीहि मतभिन्नता तत्कालीन लेखकांत नसून गैरसमजुतीनें अगर सत्य वस्तुस्थितीच्या ज्ञानाच्या अभावीं उत्तरकालीन लेखकांत दृष्टीस पडते. वादाची एक बाजू म्हणते कीं, तुकोबा यातिहीन शूद्रवंशीय असल्यानें त्यांना वेदार्थाचें सार, अर्थ किंवा शास्त्र सांगण्याचा अधिकार नाहीं व तोहि विपरीतपणें सांगितल्यानें भिक्षुकांच्या मतें 'आचार-धर्मावर' असा प्रयत्न म्हणजे आघात होय. त्यामुळें धर्मरक्षणासाठीं तुकोबांचा बंदोबस्त होणें आवश्यक आहे. दुसऱ्या बाजूचें म्हणणें कीं, मी फक्त भार-वाही असून गुह्य अर्थभेद जाणण्याची माझेंत पात्रता नाहीं. तेव्हां जें लिहिलें तें देवाच्या आज्ञेनें त्यांनीं 'लिहवलें तसें लिहिलें' असें असल्यानें त्या लेखनाचें कर्तेपण देवाकडे आहे, माझेकडे नाहीं. या वादाचा निकाल ईश्वरानेंच दिला असल्यानें त्याच्या निवाड्याची चर्चा करण्याची जरूर राहिली नाहीं. अशा परमेश्वरी शक्तिसामर्थ्याला शास्त्रातीत म्हणून मान्यता देण्यापलीकडे मानवास अधिकार नाहीं. आतां जो विचार करणें तो फक्त जें लिखाण या वादाचें कारण झालें तें कोणतें याचा शोध घेण्याचा हा होय.

तुकोबांचें कवित्व गाथेंतून व इतरत्र प्रकाशित झालेलें आहे. त्यांचे अभंग पाठांतरांत राहिल्यानें बहुतेक प्रसिद्ध झाले आहेत म्हटल्यास हर-कत नाहीं. कदाचित् कांहीं अद्यापिही अप्रकाशित असण्याचा संभव आहे. प्रकाशित वाङ्मयांत त्यांच्या नांवावर सांपडणाऱ्या क्षेपक अभंगांचा बराच मोठा समुच्चय आहे. तसेंच त्यांच्या गाथेंत कान्होबा ऊर्फ तुकयाबंधूचे व इतरांचे अभंग छापण्यांत येतात. अर्थात् नंतर रचून तुकोबांच्या नांवानें प्रसार केलेल्या व इतर लेखकांच्या अभंगांचा आपणास विचार कर-ण्याची जरूरी नाहीं. तुकोबांचेच म्हणून मानल्या जाणाऱ्या अभंगांतील किंवा लेखनांतील कोणता भाग वादाचें कारण होऊं शकतो हें पाहावयाचें आहे. हें शोधतांना तुकोबा आपली बाजू मांडतांना जो पुरावा देतात तोच

विशेष महत्त्वाचा मानून ग्राह्य धरावा लागेल. ज्याअर्थी तुकारामबावावर हा आघात कवित्व करूं लागतांच आला त्याअर्थी आज जें वाङ्मय उपलब्ध झालें आहे तें सर्व तो भाग होऊं शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर वह्यांचा आघात निरवल्यानंतर त्यांनीं कवित्वच केलें नाहीं हें म्हणणें अवास्तवतेंत गणलें जाईल. तसेंच विवादात्मक वाङ्मयाबरोबर इतर कोणतेंच लेखन बुडवलें गेलें नसेल असें म्हणणेंहि पुराव्याचे अभावीं अगदीं बरोबर ठरणार नाहीं.

गाथेंतील अभंगांची विषयवारी किंवा अभंगविभागणी हा अगदीं आधुनिक प्रयत्न आहे. तो बिनचुक साधला आहे हें म्हणणें धार्ष्टयाचें होईल. जोंपर्यंत तुकोबांच्या मूळ हस्तलिखित वह्या आपणांस मिळूं शकत नाहींत तोंपर्यंत तुकोबांच्या लेखनांतील कालानुक्रमावरून ठरणारी विषय योजना किंवा विचारप्रवाह आपणांस पारखेच राहणार. " भिजलेल्या वहीचें मूळ " ही कांहीं तुकोबांची खरी हस्तलिखित वही नाहीं हें थोड्याहि शास्त्रशुद्ध तपासणीनें सहज समजण्यासारखें आहे. त्या वहींतील अभंगानुक्रमाच्या पद्धतीवरून ती नंतरची एक प्रत आहे हें सहज सिद्ध होण्यासारखें आहे. सारांश, देहूचे पुजेंतील वही ही मूळ नाहीं असें समजूनच मूळाभावीं परीक्षा करणें ती येथें करावयाची आहे. पुजेंतील पोथीच्या कालाचा ऊहापोह करण्याची आवश्यकता नाहीं. मूळ असली तरी ती पूर्ण नाहीं व तींतील कांहीं अभंग या वह्या बुडविण्याच्या प्रसंगानंतरचे ठरतील यांत शंका नाहीं. " भिजलेली वही " हें नामाभिधान हा नंतरच्या नकल करणाऱ्याच्या श्रद्धेचा प्रश्न आहे. कोणाच्याहि श्रद्धेला धक्का देण्यासाठीं वाद करण्याचें प्रयोजन नाहीं.

तुकोबांच्या गाथेंत त्यांच्या कवित्वाबद्दल बरेच उल्लेख आहेत. त्यांतील कांहीं या प्रसंगास अनुलक्षून आहेत व कांहीं नंतरचे आहेत. तुकोबा सांगतात : "नव्हती माझे बोल जाणा हा निर्धार। मी आहें मजूर विठोबाचा ॥ १ ॥ निर्धारा वचन ओढवलें माझ्या। कृपाळुवें लज्जा

राखियेली ॥ २ ॥ [ १९१३ ]. बोलविसी माझे मुखें । परी या जना वाटे दुःखें ॥ १ ॥ [ ११५१ ]. बोलविलें जेणें । तोचि त्याचें गुह्य जाणे ॥ १ ॥ मी काबाडाचा धनी । जेवूं मागावें थिंकोनी ॥ २ ॥ मजुराच्या हातें । माप केलें झालें रितें ॥ ३ ॥ झाला पुरविता । पांडुरंग माझा पिता ॥ ४ ॥ तुका म्हणे बोल । माझा बोल तो विठ्ठल ॥ ८ ॥ [ ११७१ ]. बोलिलों जैसें बोलविलें देवें । माझें तुम्हा ठावें जाति कूळ ॥ १ ॥ करा क्षमा कांहीं नका धरूं कोप । संत मायबाप दीनावरी ॥ २ ॥ वाचेचा चाळक झाला दावी वर्म । उचित ते धर्म मजपुढें ॥ ३ ॥ तुका म्हणे पुढें अपराध नेणतां । द्यावा मज आतां ठाव पायीं ॥ ४ ॥ [ १३२४ ]. नव्हतीं हीं माझीं जायाचीं भूषणें । ऐसें नारायणें उचित केलें ॥ १ ॥ शब्दाच्या बोवणीं रत्नाचिया माळा । शब्दांचा जिव्हाळा झरवणी ॥ २ ॥ अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन साक्ष येथें ॥ ३ ॥ तुका म्हणे मज सरतें परतें । हें नाहीं अनंतें उरों दिलें ॥ ४ ॥ [१६८२]. करितों कवित्व म्हणाल हे कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ १॥ माझिये युक्तिचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो ॥ २ ॥ काय मी पामर जाणें अर्थभेद । वदवी गोविंद तोचि वदे ॥ ३ ॥ निमित्त मापासी बैसविला आहे । मी तो कांहीं नव्हे स्वामिसत्ता ॥ ४ ॥ तुका म्हणे आहे पाईकाचि खास । वागवितो मुद्रा नामाची हे ॥५॥ [६०५]."

सारांश, वरील उक्तींवरून एक गोष्ट स्पष्ट होते ती ही कीं, ज्या लेखनाबद्दल बाद सांगावा लागला तें लेखन तुकाराम मनुष्य या व्यक्तीचे विचार नसून देवाचे बोल होते. गाथेंतील बालक्रीडासारखें वर्णनात्मक लेखन किंवा प्रासंगिक वर्णनें अथवा तुकाराम या व्यक्तीनें देवाची भाकलेली करुणा, रूपकें, चरित्रें, देवाशीं भांडण, स्थितिपर विवेचन हे देवाचे बोल किंवा देववाक्यें होऊं शकणार नाहींत. अशा तऱ्हेचें वाङ्मय या सदरांत पडणार नाहीं. त्याचप्रमाणें तुकोबा आपली बाजू मांडतांना

सांगतात कीं, " नका धरूं कोणी । राग वचनाचा मनीं ॥ १ ॥ नाहीं केली निंदा । आम्हीं दुषिलेंसे भेदा ॥ ३ ॥ तुका म्हणे मज । येणेविण काय काज ॥ ४ ॥ [१४४८]. " यावरून तुकोबांनीं निरनिराळ्या पंथांबद्दल काढलेले उद्गारहि या वेळीं लिहिले नव्हते.

तुकोबांच्या पुराव्यांत आणखी एक स्पष्टीकरण मिळतें. तें म्हणजे त्यांच्या वादांतील लेखनांत गुह्यार्थ, अर्थभेद वगैरे होते. ते म्हणतातः " संतांचीं उच्छिष्टें बोलतों उत्तरें । काय म्यां गव्हारें जाणावें हें ॥ १ ॥ विठ्ठलाचें नाम घेतां नये शुद्ध । तेथें मज बोध काय कळे ॥ २ ॥ करतो कवतुक बोबड्या उत्तरी । झणी मजवरी कोप धरा ॥ ३ ॥ काय माझी याति नेणां हा विचार । काय मी तें फार बोलों नेणें ॥ ४ ॥ तुका म्हणे मज बोलवितो देव । अर्थ गुह्यभाव तोचि जाणे ॥ ५ ॥" [ ५१८ ]. 'अर्थभेद' व 'गुह्यार्थ' उल्लेखणारे कांहीं उतारे वर आलेच आहेत. आणखी एक उतारा देऊन हा पुरावा संपवितों : "नेणें अर्थ कांहीं नव्हती माझे बोल । विनवितों कोपाल संत झणीं ॥ १ ॥ नव्हती माझे बोल बोले पांडुरंग । असे अंगसंगें व्यापूनियां ॥ २ ॥ मज मूढा शक्ति कैंचा हा विचार । निगमादिकां पार बोलावया ॥३॥ रामकृष्णहरि मुकुंदा मुरारी । बोबड्या उत्तरें हेंचि ध्यान ॥ ४ ॥ तुका म्हणे गुरुकृपेचा आधार । पांडुरंगें भार घेतला माझा ॥ ५ ॥" [ ११८८ ].

तुकोबांनीं जरी विनय राखून आपल्याकडे मूढत्व घेतलें असलें तरी त्यांचा आपल्या ज्ञानाबद्दलचा आत्मविश्वास कांहीं कमी नव्हता हें विसरून चालणार नाहीं. ते म्हणतात : " वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरांनीं वाहावा भार माथां ॥१॥ तुका म्हणे आम्हां सांपडलें मूळ । आपणचि फळ आलें आतां ॥ ४ ॥" [ १५४९ ]. इतकेंच नव्हे तर आपण प्राचीन आधारेंच बोलतों हेंहि स्पष्ट केलें आहे. : "नाहीं खंड झाला । माझा तुमचा विठ्ठला ॥ १ ॥ कैसेकैसे हो दुश्चित । आहे चौघापासी नीत ॥ २ ॥ मुळींचें

लिहिलें । मज आतां सांपडलें ।।३।। तुका म्हणे मज । नलगे बोलणें सहज ।।४।।" [२८०७]. "बरवा झाला बेवसाव ।–।। १ ।। जुनाट युगादींचें नाणें । बहुतां काळाचें ठेवणें । लोपलें होतें पारिखपणें । ठाव चळण चुकविला ।। ५ ।। [४०६५]." इतर अब्राह्मण संतांनीं देवाची आळवणी केली होती. तुकोबाप्रमाणें कवित्व केलें होतें. नामदेवच घ्या. त्यांचे पुष्कळ अभंग प्रसिद्ध आहेत. त्यांचा विचार केला तर तुकोबांच्या गाथेंतील साध्या भक्तिपर अभंगांनीं वैदिक भिक्षुकांचें किंवा इतर कोणाहि ब्राह्मण अब्राह्मण सनातनीयाचें चित्त प्रक्षुब्ध व्हावें असें त्यांत कांहीं नाहीं असेंच म्हणावें लागतें. वादांतील पुराव्यावरून वादांतील लेखन देवाचे बोल होते, त्यांत गुह्यार्थ भरला होता, तें तुकोबांना मुळींचें असें सांपडलें होतें, तें युगादीचें नाणें होतें आणि तें राजाचा हुकूम त्याचा लेखक चिटणीस–फडणीस–प्रधान आपल्या शिक्क्यानें काढतो तसें तें 'नामाच्या शिक्क्यानें' पूर्ण केलें होतें. या सर्व कसास गाथेंतील अभंग उतरणार नाहींत यांत शंका नाहीं. या बाबतींत तुकोबांच्या एका अभंगांत स्पष्ट खुलासा आला आहे, तो असा : "विश्वास तो देव । म्हणुनि धरियेला भाव ।। १ ।। माझी बदविती वाणी । ज्याणें धरिली धरणी ।। २ ।। जोडलीं अक्षरें । नव्हतीं बुद्धीचीं उत्तरें ।। ३ ।। नाहीं केली आटी । कांहीं मानदंभासाठीं ।। ४ ।। कोणी भाग्यवंत । तया कळेल उचित ।। ५ ।। तुका म्हणे झरा । आहे मुळींचाचि खरा ।। ६ ।। [ २६३५ ]."

वरील उताऱ्यांवरून देवांनीं किंवा ईश्वरानें बोलविलें तीं शेषशायीचीं वचनें होत हें स्पष्ट होतें. आणि गीता ही शेषशायीचीं वचनें असें वामन वगैरेनींहि आपल्या गीताटीकेंत म्हटलें आहे. खास तुकोबाच आपल्या गीतानुवादांत म्हणतातः "तुका वदे विचक्षणीं । मांदुस गीतारत्नखाणी । घ्यावें एकेक निवडुनी । वचनें शेषशायीचीं ।।९।।" [गी. २३२]. तसेंच चवथ्या अध्यायाचे प्रारंभीं गीताज्ञान हें पुरातन आहे याची फोड केली आहे:

" आनंदाचा कंद गोविंद बोलला । ऐके या गोष्टीला पूर्वींचिया ॥१॥ पुरातन योग मीच आत्मा मोहें । बोलिलों ज्ञान हें भानुदेवा ॥२॥ ऐसें हें पूर्वींचें आहे भांडवल । सांपडे नवल तुकयासी ॥४॥ " [ गी. १६१]. याबद्दल आणखीहि प्रश्नोत्तरें आहेत. सारांश, गीता ही मुळींचाच झरा आहे इतकेंच नव्हे तर तें युगादींचें नाणेंहि आहे. परंतु या उक्तींतून अधिकहि श्लेषार्थ निघण्यासारखा आहे. गीतेच्या अर्थ लावण्याचे द्वैत, अद्वैत, केवलाद्वैत, शुद्धाद्वैत, विशिष्टाद्वैत वगैरे संप्रदाय आहेत. त्यांतील भक्तीलाच प्रामाण्य देणारा विशिष्टाद्वैत संप्रदाय जुनाच आहे. त्यांत तुकोबा नवीन संप्रदाय पाडतात असा प्रकार नाहीं असेंच म्हणण्याचा कटाक्ष असला पाहिजे व झरा झरवणी हे शब्द संप्रदायार्थी योजले असावेत. अशी ही गीता तुकोबांच्या हातीं आली : " परी ईश्वराकरितां । मज सांपडली गीता ॥१०॥ तिच्या संगें अंगिकार । केला तरी द्यावी थार ॥ ११ ॥ आतां देवांचाही देव । बोले दशमीं वासुदेव ॥१२॥" [ ३७४ ]. आणि गीता सांगणारा वासुदेव म्हणजे कृष्ण हाच तो एकविध भक्ति करणाऱ्या तुकोबांचा विठ्ठल हें गीतावाचकांस पुरावा देऊन सांगण्याची जरूर नाहीं. परंतु त्याबद्दलचा एक पुरावा येथें नमूद करून ठेवतों."चारी वेद जयासाठीं । त्याचें नाम धरा कंठीं ॥१॥ गीता जेणें उपदेशिली । ते ही विटेवरी माऊली ॥४॥ तुका म्हणे सार धरीं । वाचे हरीनाम उच्चारीं ॥ ५ ॥ " [ १६९६ ].

सारांश, तुकोबांचा या बादांतील पुरावा गीतानुवादास उद्देशून होता हें स्पष्ट दिसतें. इतर अभंगांच्या समानार्थी अभंग व कवित्व इतरांनींहि केलें होतें. तेव्हां त्यांत फारसा आघात होण्यासारखें नवीन नव्हतें. मग या गीतेच्या अनुवादाला तरी इतकें बिचकण्यासारखें काय होतें ? तुकोबांना कोणत्या विचारप्रदर्शनाचा अडथळा होत होता याचा अपरोक्ष उल्लेख त्यांच्या एका अभंगांत आला आहे. " नलगे

पाहावें बांकडे । उच्चारावें कोडें नाम तुझें ॥ १ ॥ नाहीं वेळ नाहीं पंडितांचा धाक । होत कां वाचक वेदवक्ते ॥ २ ॥ वेदीं हे प्रतिपाद्य न कळे पाहतां । तैशी या अनंता ठेवूं नामें ॥३॥ आपुलिया मना उपजे आनंद । तैसे करूं छंद कथाकाळीं ॥४॥" [१४३१]. सतराव्या शतकाचे सुरवातीस निरनिराळ्या जातींच्या धर्माधिकाराचे तंटे बरेच चालू होते. ब्राह्मण भिक्षुक व गोळक, जावळे, सोनार, सारस्वत, प्रभु, इत्यादींना सोळा संस्कारांचे अधिकार नाहीत वगैरे भांडणें चालूच होतीं. वेदांचा उच्चार करण्यास या व इतर शूद्रांना अधिकार नाहीं हाच सिद्धांत या भांडणांचा मूळ पाया होता. इतकेंच नव्हे तर अतिरेक म्हणून कांहीं ठिकाणीं संकृत ग्रंथ व हीं गीर्वाण भाषा बोलणाऱ्या अगर वाचणाऱ्या अब्राह्मणांचा निषेध होत होता. गीता हा पुरातन ग्रंथ असतांनासुद्धां त्यावर बहिष्कार टाकण्याचा कडक प्रयत्न होत होता. तो ग्रंथ भिक्षुकांचा वैरी होऊं लागला होता. बहिणाबाई म्हणते : " नामाचा विटाळ आमुचिये घरीं । गीताशास्त्र वैरी कुळीं आम्हां ॥१॥" [६५]. कचेश्वरांचा अनुभव त्यांनीं आपल्या आत्मचरित्रांत* दिला आहे. " चित्ता दृढ आलें गीता ही पढावी । आनंदें पहावी नित्य टीका ॥२३॥ एक दिसीं घरी पुस्तक वाचितां । कांहीं आलें चित्ता वडिलांच्या ॥२४॥ तीर्थस्वरूपांनी घातलें ताडन । गीतार्थ नमन करूं नको ॥२५॥ चोरूनियां गीता भावें पाठ केली । अविद्या चालली हळू हळू ॥२६॥ विज्यापुरीं गेलों वडिलांच्या भेणें । पृच्छा नारायणें मांडियेली ॥२७॥". बहिणाबाईचें कुळ वेदांती भिक्षुक व कचेश्वरांचे वडिलहि वैदिक ब्राह्मण व तुकोबांस समकालीन आणि जवळचे चाकणचे राहणारे. तेव्हां गीतावाचनाबद्दल तत्कालीं किती रोष होता हें दिसून येतें. कचेश्वरांची गीतार्थ टीका कोणत्या सांप्रदायाची व कोणाची होती ह्याचा खुलासा असता तर या प्रकरणावर आणखी प्रकाश पडला असता.

---

* पृ. २४१-६, भा. इ. सं. मंडळ संमेलन वृत्त-१८३५ शकेचें, स्वीय ग्रंथमाला, भा. इ. सं. मंडळ, पुणें.

गीता ग्रंथाबद्दल जितका भिक्षुक वर्गाकडून निषेध होत होता तितकाच तो ग्रंथ नेहमींच्या अनुभवाप्रमाणें लोकांत अधिकाधिक प्रसार पावत होता. सोळाव्या शतकांतच गीतेवर किती तरी टीका झाल्याचें दिसतें. परंतु सर्व उपलब्ध टीकांचे लेखक ब्राह्मण असल्यानें 'गीर्वाण भाषेंतील' ग्रंथ वाचण्यास व त्यावर टीका करण्यास ते तत्कालीन धर्मशास्त्राचे समजुती-प्रमाणें पूर्णाधिकारी होते. तुकाराम वाणी किंवा शूद्र म्हणून त्यास कोणत्याहि जातीप्रमाणें तो अधिकार नव्हता. शिवाय द्वैताद्वैतवादांत जयपत्र कोणाला मिळणार! तुकोबांनीं आपल्या टीकाग्रंथाची नेहमींची मर्यादा कोठें राखली होती! गीतानुवाद शब्दार्थानें किंवा भावार्थानें सांगितला आहे असें नाहीं. त्यांतील श्लोकांचा तत्त्वार्थ त्यांच्या अनुभवाला पटेल त्या शब्दांत व पद्धतीनें सांगितला आहे. इतकेंच नव्हे तर भक्तीचेंच वैशिष्टय व श्रेष्ठत्व व वर्णाश्रमधर्मांतील 'आचारादि क्रियाकर्मां'तील फोलकटपणा यावर बरेच शेरे गोवले आहेत. असें करण्यांत निदान ते 'विशिष्टाद्वैती' झाले असते. परंतु तुकोबांची मजल त्याहिपुढें गेली. 'तुका' हा शब्द 'आत्मा' या अर्थी वापरला व तुक्याच्या नांवानें आपल्याकडे शास्ताधिकार घेऊन आपण अखिल 'अनधिकारी ठरविलेल्या स्त्री-पुरुषांस' श्रेष्ठ मार्ग मोकळा करून दिला असें नवीन पथ अगर धर्मसंस्थापनेचें श्रेय अप्रत्यक्षपणें आपले-कडे घेतलें आहे. या गीतानुवादाचा प्रसारहि बराच झाला असला पाहिजे व त्याच्या प्रतीहि बऱ्याच संतांनीं रोजच्या श्रवणपठणार्थ करून घेतल्या असाव्यात. त्यामुळें या ग्रंथाचा बोभाटा होऊन आपल्याहि हातीं ती मंत्रगीतेची प्रत आली असें जसें बहिणाबाईस वाटलें तसेंच ती प्रत सर्वत्र संचारली असावी. ह्या भूताचा धाक वैदिक ब्राह्मणांस भासला व हें भूत गाडून टाकण्याचा त्यांनीं सनदशीर प्रयत्न केला. आपल्या भिक्षुकी वृत्तीवर अतएव धर्मावर गदा आणणाऱ्या या ग्रंथाविरुद्ध ग्रामण्य उठविण्यास तुकोबांच्या जातीवरून सहजच मार्ग सांपडला[1]. विशेषतः त्यांचा शास्ताधिकार

धर्मबाह्य ठरविणें फारसें कठीण नव्हतें. दिवाणांत तें पटण्यासारखें होतें. म्हणून तें दिवाणांत गेलें. प्रघात किंवा रूढी हाच पारमार्थिक धर्म असें मानणाऱ्या सामान्य जनालाहि दिवाणांतील निर्णय मान्य होणारे होते. परंतु तुकोबांनीं यावरहि तो 'तुका' मी नाहीं, देवच. मी फक्त भारवाही मजूर लेखक आहें अशी भूमिका घेतली हें उपरिनिर्दिष्ट उताऱ्यांवरून स्पष्ट दिसत आहे. सारांश, गार्थेतील इतर कोणत्याहि भागांत वैदिक ब्राह्मणांच्या गहजबास कारण होणारें वाङ्मय नाहीं म्हटलें तरी चालेल. आहे तें 'उच्छिष्ट' म्हणून व इतर अब्राह्मण संतलेखकांचा व पुराणांतील आख्यानोपाख्यानांचा निर्वाळा देऊन आलेला आघात टाळण्यासारखें होतें. परंतु तुकोबांच्या गीतानुवादांतील विशेषार्थ व शास्त्राधिकार देवावर भार टाकण्याखेरीज असमर्थनीय होता. या सर्वांचा विचार केला तर बहिणाबाई ज्या अभंगसमुच्चयाबद्दल "तेरा दिवस ज्यानें वह्या उदकांत। घालोनियां सत्य वांचविल्या ॥ ३ ॥ महाराष्ट्री शब्दांत वेदांताचा अर्थ। बोलिला लोकांत सर्वद्रष्टा ॥ ४ ॥ [ २४ ]. तुकाराम वेद बुडतां जो देखसी। जळीं टाकलासी देखोनियां ॥ ४ ॥ [ ७११ ]." म्हणून उद्गार काढते तो अभंगसमुच्चय म्हणजे हा गीतानुवादच होय, यांत शंका धरण्यास जागा राहत नाहीं.

१३. <u>वह्या तारल्या : दिव्यनिर्णयः</u>— ज्यांनीं सतराव्या शतकांतील गांवकारभाराच्या पद्धतीचा अभ्यास केला असेल किंवा त्या कालचीं ऐतिहासिक कागदपत्रें पाहिलीं असतील त्यांच्या सहज लक्ष्यांत येईल कीं, कोणा एखाद्या माणसानें—मग तो ब्राह्मण असो कीं शूद्र असो, गांवचा मोकदम असो कीं देशमुख-देशपांडे असो—आपल्या प्रतिपक्षांचा निषेध केला कीं तो निवाडा किंवा निर्णय होत नसे. त्याला आपलें भांडण प्रथम दिवाणांत न्यावें लागे. तेथून विवादात्मक भांडणें गोतमुखें चौकशीस येत. चौकशी झाली कीं गोताचा महजर होई व त्या महजरावरून हवालदार, सुभा, राजा वगैरे

आपल्या शिक्क्याचीं राजपत्रें काढीत. नंतर गांवकरी व मोकदम निवाड्याची अंमलबजावणी करीत. चौकशीकरितां गोताकडे प्रकरणें आलीं कीं गोत जमून साक्षी घेत व पुराव्याच्या अभावीं दैवी पुरावे म्हणजे शपथ दिव्याचा अवलंब करून निवाडा करीत. दिव्यास जें स्थल नेमून दिलें तेथें अनुभवी व सच्छील ब्राह्मणाकडून सशास्त्र व सप्रयोग दिव्य देववीत. एखाद्या रामेश्वरानें—रामेश्वर भटाचा या प्रकरणांत मुळीच संबंध येऊं शकत नाहीं हें नवीन उपलब्ध झालेल्या कागदांवरून सिद्ध होत आहे—आपल्या घरीं बसून निषेध केला म्हणून कोणीहि तुकाराम आपल्या वह्या आपण होऊन बुडविल्यानंतर शोक करीत बसणार नाहीं व आपण केलेली चूक त्याला पटतांच त्या नदींतून शोधून काढण्याचा प्रयत्न न करतां देवाचें धरणें म्हणून नदीकांठावर उपाशी पडून राहील हें मनुष्यस्वभावाला व सरळ व्यवहाराला पूर्ण विसंगत आहे. इतकेंच नव्हे तर उपाशी राहून प्राणांतिक संकट ओढवून घेणाऱ्या तुकारामाला कोणी सहानुभूती दाखविणारे गांवकरी नसतील असेंहि नाहीं. आणि अशा गांवकऱ्यांनीं वह्या तरंगेपर्यंत स्वस्थ नदीकडे टक लावून बसून त्या काढण्याचा किंवा कांढविण्याचा प्रयत्न न करणें संभवनीय नाहीं. तसें न करण्याचें कांहीं तरी कारण असलेंच पाहिजे. किंवा तसें न करूं देणारी शक्ति तेथें वावरत असली पाहिजे. शिवाय वह्या तरल्या त्यांत लबाडी नाहीं हें मानून कोणता वेदांती पंडित आपला पक्ष सोडून पराजय कबूल करील? मूळ भांडणारा जरी दूर असला तरी दुसरे वेदांत्यांनीं त्या वह्या नाहींशा करण्याचा कां अट्टाहास केला नाहीं? पिढ्यान्‌पिढ्या भांडणें चालू ठेवण्याची प्रवृत्ति जेथें पूर्ण दृढ झाली आहे अशा समाजांत हें शक्य नाहीं. बहिणाबाई शूद्राचा गुरु करते व त्याच्या पायां पडते म्हणून द्वेषाग्नीनें जळफळणाऱ्या मंबाजीला तिला मोकदमाकडून शासन करतां आलें नाहीं. आपल्या क्रोधालाहि वाव देतां आला नाहीं. त्याला दिवाणांत देशमुख देशपांड्याकडेसच धांव घ्यावी लागली व आप्पाजीपंताला बंदोबस्ताच्या आश्वासनापलीकडे आपला अधिकार गाजवतां आला नाहीं.

चौघाचारांपुढें, पांचांपुढें नेणें, दिवाणांत घालणें, महजर निवाडा म्हणजे महजरावरील राजपत्रें आणणें, क्रिया म्हणजे शपथ किंवा दिव्य देणें वगैरे व्यवहार इतका सामान्य होता कीं, तत्कालीन सर्व वाङ्मयांत या व्यवहारास अनुलक्षून कितीतरी विचार गोंवलेले आढळतात. तत्कालीन उदाहरणें देऊं म्हटलें तर कितीतरी उतारे उपलब्ध वाङ्मय व पत्रव्यवहारांतून देतां येतील. परंतु विस्तार न व्हावा म्हणून तुकोबांस परिचित अशी बहिणाबाई व खास तुकोबा यांचेच थोडे उल्लेख देतों. बहिणाबाई लिहितातः "नाहीं तरी म्हण आपुलिया तोंडें । किती तुजपुढें बोल बोलूं ॥३॥ बहिणी म्हणे चाल करूं चौघाचार । बैसोनि व्यवहार निवडिती ते ॥४॥ [ ४९१ ]. न देसी तें माझें भांडवल हरी । एक तरी करी पांडुरंगा ॥१॥ आण वाहुनियां देई मज क्रिया । सोडीं ना मी पाया मनांतूनी ॥२॥ विश्वासघातकी ऐसे मज बाटे । फांसे हातीं विटेवरी उभा ॥३॥ बहिणी म्हणे पांचांमध्यें घेई आण । मग मी जाईन कळे तेथें ॥ ४ ॥ " [ ४९४]. तुकोबांच्या गाथेंतून कांहीं उल्लेख देतों. त्यांचे लेखनांत तर हे शब्दप्रयोग भरपूर, किंबहुना कोणाहि इतर लेखकांपेक्षां अधिक आहेत म्हटलें तरी चालेल: "चाल जाऊं संतापुढें । वाद सांगेन निवाडे ॥ २ ॥ [१५८६]. नाहीं देणें घेणें । गोवी केली अभिमानें ॥१॥ आतां कां हो निवडूं नेदा । पांडुरंगा एवढा धंदा ॥२॥ पांचांमधीं जावें । थोड्यासाठीं फजित व्हावें ॥ ३ ॥ टाकूं तो वेव्हार । तुज बहू करकर ॥ ५ ॥ तुका म्हणे आतां । निवडूं संता देखतां ॥६॥ [१३३७]. चाल जाऊं संतापुढें । ते हे निवडिती रोकडें ॥ ३ ॥ [ १९८८ ]. चौघांचिये मतें आर्ही खरें केलें होतें ॥ ३ ॥ तुका म्हणे यावरी । आतां भीड कोण धरी ॥४॥ [ १५३३ ]. वारिलें लिगाड । बहु दिवसांचें हें जाड ॥१॥ झाला चौघाचार । गेला खंडोनी वेव्हार ॥३॥ [ १३७१ ]. नाहीं मागितला । तुम्हां मान म्यां विठ्ठला ॥१॥ जे हे करविली फजिती । माझी एवढी जनाहातीं ॥२॥ नाहीं कला पोट । पुढें घालूनी बोभाट ॥३॥ तुका म्हणे धरूनि हात । नाहीं नेलें दिवाणांत । ॥ ४ ॥ [ ७०१ ].

निष्ठुरा उत्तरीं न धरावा राग ।...॥१॥ राखिला हा होता बहु चौघांचार । साक्षीनें वेव्हार निवडिला ॥३॥ तुका म्हणे कांहीं बोलणें नलगे । आतां पांडुरंगें तूं मी ऐसें ॥४॥ [ १०७६]. पांडुरंगें पाहा खादलीसे रडी । ... ॥१॥ आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजितखोर येथ ॥२॥ [ ३१८९]. निर्वाणीं निवाड होतो आगीं मुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥३॥ तुका म्हणे नेम न ढळतां बरें । खऱ्यासीचि खरें ऐसें नांव ॥४॥ [ २९०२]. कासया लागला यासीं चौघाच्चार । मुक्तींचा वेव्हार निवडिला ॥१॥ ग्वाही भक्तांची घालुनीयां परी । महजर करीं आहे माझ्या ॥२॥ [ २५३६ ]. "

या उताऱ्यांचा व मंबाजीला दिवाणांत जावें लागलें याचा विचार करितां या वह्याप्रकरणींहि गांवच्या लोकांना चिथावल्यावरून ते दिवाणांत गेले असले पाहिजेत व तेथें तुकोबांच्या अंगावर बाजू आली असली पाहिजे. तुकोबा सांगतातः " आतां काय खावें कोणीकडे जावें । गावांत राहावें कोण्या बळें ॥१॥ कोपला पाटिल गांवींचे हे लोक । आतां मज भीक कोण घाली ॥२॥ आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत ॥३॥ भल्या लोकापाशीं सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥४॥ तुका म्हणे यांचा संग नव्हे भला । शोधीत विठ्ठला जाऊं आतां ॥५॥ [ २९९५ ]. " तुकोबांनीं ' चवी सांडली ' याचा ' भल्या लोकांनीं ' निवाडा करतांना त्यांस अपराधी ठरवणें अगदीं सरळ होतें. परंतु तुकोबांची सर्व मदार " देवानें त्यांचे हातून लिहिवलें " या पुराव्यावर राहिल्यानें साक्षिदारांचे अभावीं दिव्याचा संदेश देणें त्यांना न्याय्य होतें व तुकोबांनाहि विठोबाला शोधीत जाणें प्राप्त होतें.

काशीचे मान्यवर शास्त्री व शिवाजी महाराजांस ऐंद्रयाभिषेक करणारे प्रसिद्ध गागाभट्ट यांनीं आपल्या वडिलांच्या 'दिनकरोद्योत' नांवाच्या स्मृति-शास्त्र ग्रंथांतील " व्यवहारनिर्णय " हा राहिलेला भाग लिहिला. गागाभट्ट तुकोबांना समकालीन म्हणून त्यांनीं दिलेली ' दिव्यांची ' माहिती तत्कालीन

प्रघाताची द्योतक घरली पाहिजे. सर्वच स्मृतिग्रंथ पूर्वाघारानें रचलेले असतात. त्यांचें वैशिष्टय म्हणजे त्यांत कालानुरोधें अपवाद देऊन मूळ प्रघात लेखकाच्या कालांत रूढ असलेल्या रीतिरिवाजापर्यंत पोहोंचविलेले असतात. या 'व्यवहारनिर्णयां'त* गागाभट्टानें दिव्यनिर्णय सांगितला आहे. त्यांतील या प्रकरणीं जरूर तितकेच उतारे देऊन या दिव्यांचीं प्रयोगादि लक्षणें प्रथम सांगतों.

शपथ किंवा दिव्यें देणें तीं दोन्ही वादी प्रतिवादी तयार असतील तर प्रत्यक्ष पुरावा किंवा मानुषप्रमाण मिळत नसेल तरच द्यावयाचीं. मनुवचन गागाभट्ट देतात : "असाक्षिकेषु त्वर्थेषु मिथो विवदमानयोः। अविन्दन्तत्त्वतः सत्यं शापयेनापि लंघयेत् ॥" सर्वत्र शपथ या शब्दानें दिव्याचा बोघ होतो किंवा शपथ या शब्दानें दिव्याभाव व्यक्त होतो म्हणून प्रथम सूचना दिली आहे. [ शपथपदे दिव्य लक्षणया तुल्यादित्यपरा व्याख्येति दिक् ] हा दैवी पुरावा मिळवणें तो वादीप्रतिवादींपैकीं कोणालाहि मिळविण्याचा हक्क आहे. मात्र तो दिव्य देण्यास लागणाऱ्या अटींस उतरला पाहिजे. परंतु कोणतें दिव्य कोणाला व कोणत्या वर्णांना द्यावयाचे त्याबद्दल या 'निर्णयांत' निर्बंध घातले आहेत : "ब्राह्मणस्य घटोदेयः क्षत्रियस्य हुताशनः। वैश्यश्च सलिलं प्रोक्तं विषं शूद्रस्य दापयेत ॥–पितामहः". दिव्य केव्हां द्यावें त्याबद्दलचें पितामहाचें वचन 'मध्यान्हे तु जलं देयं' गागाभट्टानें प्रथम देऊन नंतर नारदाचें मत दिलें आहे. नारदांचा 'पूर्वाण्हे सर्वदिव्यानां' हा निर्णय गागाभट्टांना मान्य दिसतो. दिव्य कोणतें कोणत्या ऋतूंत द्यावें याबद्दलच्या निर्णयांत नारद "शरद्ग्रीष्मे तु सलिलं" असें म्हणतात व 'चैत्रोमार्गशिरश्चैव वैशाखश्च तथैव च । एते साधारणा मासा दिव्यानामविरोधिनः ॥' म्हणून मासनिर्णयहि सांगतात. दिव्याचा प्रत्यक्ष

* हा ग्रंथ अप्रकाशित आहे. निरनिराळ्या प्रतींवरून हा ग्रंथ इ. स. १९३२त संपादून तयार केला. परंतु तो अद्यापि मुद्रणावस्थेंतून जावयाचा आहे. याच्या हस्तलिखित प्रती बहुतेक सर्व संस्कृतपोथ्यांच्या संग्रहांत आढळतात.

निर्णय कांहींही लागो, दिव्य घेतल्यानंतर ठराविक कालपर्यंत दैवी आपत्ती कांहीं येतात कां कसें हें फार बारकाईनें पाहून नंतर दिव्याचा निर्णय जाहीर करावयाचा असतो. दिव्यांत उतरला परंतु घरांत किंवा संबंधीय माणसांत किंवा गोतांत आपत्ति आली तर तो दिव्यांत खोटाच ठरतो. या दिव्यांत 'चतुर्दशकादन्हो यस्य नो राजदैविकं इ. ।' अशी चौदा दिवसांची मुदत कात्यायनांनीं घालून दिली आहे. तीच गागाभट्ट मानतात. दिव्य घेण्यापूर्वी उपोषण करावयाचें तें "त्रिरात्रोपोषिताय स्युः ।" म्हणजे तीन अहोरात्र करावयाचें. चवथ्या दिवशीं सप्रयोग दिव्याच्या जागेची पूजा वगैरे प्राड्विवाक करवितो. "ततः पताकाध्वजारोपणानंतरं...शिष्टांस्तु पूजयेत्". नंतर "देवपूजां विधायानंतरमभियुक्तमर्थं वक्ष्यमाणमंत्रसहितं पत्रे लिखित्वा तत्पत्रं संशोध्य शिरोगतं कुर्यात् ॥" हें झालें म्हणजे मग दिव्य द्यावयाचें. जलदिव्याचे स्थलशोधनाबद्दल नारद म्हणतात : "नदीषु तनुवेगासु सागरेष्ववटेषु च । ह्रदेषु देवखातेषु तडागेषु सरित्सु च॥". पितामहवचनहि गागाभट्ट देतात. त्यांत अधिक बारकाई सांगितली आहे. "स्थिरे तोये निमज्येषु न ग्राहिणी न चाल्पके । तृणशैवालरहिते जलूकामत्स्यवर्जिते ॥ देवखातेषु यत्तोयं तस्मिन्कुर्याद्विशोधनम् । आहार्यं वर्जयेन्नित्यं शीघ्रगासु नदीषु च ॥ आविशेत्सलिले नित्यमूर्मिपंकजविवर्जिते ॥". प्राड्विवाकानें वरुणाची पूजा केल्यानंतर मंत्र म्हणावयाचा तोः "ततः प्राड्विवाको जलं प्रार्थयेत् । तोयं त्वं प्राणिनां प्राणाः सृष्टेराद्यं तु निर्मितम् । शुद्धेश्च कारणं प्रोक्तं द्रव्याणां देहिनां तथा ॥". दिव्य घेणारानें छातीभर पाण्यापेक्षां अधिक खोल जावयाचें नसते. तुकारामकालीं रूढ असलेला हा जलदिव्याचा प्रयोग असल्यानें या प्रयोगाचें महत्त्व आहे.

तुकोबांच्या वह्या नेहमींच्या सोप्या मार्गानें अग्निनारायणाच्या स्वाधीन करणें सहज साध्य होतें. जर दिव्यापर्यंत पाळी आली नसती तर अन्य मार्गानेंहि त्यांचा विध्वंस करतां आला असता. परंतु वैश्य वर्णाला शास्त्रानें जलदिव्यच सांगितलें असल्यानें अन्य उपाय अगर दिव्य देणें शक्य नव्हतें.

ज्या डोहांत वह्या बुडविल्या गेल्या म्हणून आज सांगण्यांत येतें तेंच दिव्याचें स्थल असेल तर देहू येथील इंद्रायणीच्या काठीं तेवढीच जागा जलदिव्यस्थलाच्या अटीस उतरते हें कोणालाहि कबूल करावें लागेल. देहूजवळ इतरत्र तशी जागा नाहीं. वह्या केव्हां बुडविल्या त्याचा कालनिर्देश आपणांला उपलब्ध नसल्यानें त्यास शास्त्राची कसोटी लावतां येत नाहीं. वह्या बुडवल्याच्या प्रसंगाची कालमर्यादा अठरा दिवसांची सांगतात. शास्त्राधारें तीन दिवस उपोषण, चवथ्या दिवशीं सकाळीं किंवा दुपारीं दिव्य देण्याचा विधी व नंतरच्या दैवी परीक्षणाचा चौदा दिवसांचा काल या दिव्याला सांगितला आहे. एकंदर शास्त्रानुमतें अठरा दिवसांचा काल-निर्णय आहे. तुकोबांनीं आपल्या वह्या आपणच जलांत बुडविल्या हेंहि शास्त्राप्रमाणेंच झालें. बुडविल्यानंतर चौथ्या दिवशीं दैवी निर्णय नाहीं. अर्थात् तुकोबांना अपयश आलें. देवानें त्यांचे बाजूनें निर्णय दिला नाहीं. तेव्हां तुकोबानें या देवाच्या मौनाबद्दल देवाला 'वचनाला जागलास नाहीं' म्हणून देवाचें धरणें धरलें व राहिलेल्या चौदा दिवसांत हा दिव्याचा निर्णय खोटा ठरण्यासारखी परिस्थिति निर्माण झाली नसती तर त्यांना वह्या गमवणें व नंतर "चवीनें वागण्यांची ग्वाही देऊन, परत व्यवहार सुरू करण्यापलिकडे कांहीं कार्य उरतें ना. या धरण्याबद्दल तुकोबा तेराव्या दिवसानंतर म्हणजे अठराव्या अर्थात् शेवटच्या दिवशीं म्हणतात कीं, "तेरा दिवस झाले निश्चक्र करितां। न पवसी अनंता मायबापा ॥ १ ॥ पाषाणाची खोळ घेऊनि बैसलासी। काय हृषीकेशी झालें तुज ॥ २ ॥ तुजवरी आतां प्राण मी त्यजीन। हत्या मी घालीन पांडुरंगा ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां मांडिलें निर्वाण। प्राण हा सांडीन तुजवरी ॥५॥ [१७३१]". परंतु चौदाव्या दिवशीं वह्या तरल्या हा विशेषच दैवी चमत्कार झाल्यानें तुकोबांना दिव्यांत यश आलें. त्याबाबतच्या अभंगांत आपण ही आटाआटी का केली याबद्दलहि विवेचन आलें आहे : " थोर अन्याय केला। तुझा अंत म्यां पाहिला। जनाचिया बोलासाठीं चित्त क्षोभविलें

॥१॥ भागविलासी केला क्षीण । अधम मी यातिहीन । झाकूनि लोचन । दिवस तेरा राहिलों ॥२॥ अवघें घालूनियां कोडें । तान भूकेचें सांकडें । योगक्षेम पुढें । तुज करणें लागेल ॥३॥ उदकीं राखिले कागद । चुकविला जनवाद । तुका म्हणे ब्रीद । साच केलें आपुलें ॥ ४ ॥ [ ३५२३ ]. ”
ह्या चमत्कार जर खाजगी स्वरूपाचा असता तर तुकोबांना ‘ जनवाद चुकविला ’ असा भरंवसा वाटला नसता व आपल्या खरेपणाबद्दल स्वतःच डांगोरा पिटीत राहावें लागलें असतें. परंतु हा सर्व प्रकार गोताच्या साक्षीनें झाला. ज्या प्राड्विवाकाचे गुणधर्म “ प्राड्विवाकस्ततो विप्रो वेद-वेदांगपारगः । श्रुतवृत्तोपसंपन्नः शांतचित्तो विमत्सरः ॥ सत्यसंधः शुचिर्दक्षः सर्वप्राणिहिते रतः । उपोषितः शुद्धवासाः कृतदंतानुधावनः ॥ असे असतात त्यांनींच आपल्या शिक्यामोर्तबांनिशीं हा निवाडा सरकारांत जाहीर केल्यानें तुकोबांना दिवाणांतून न्याय मिळाला व ते परत घरीं गेले. परंतु या प्रसंगानें तुकोबांना नकोसा असतांना सुद्धां त्याचा आपो-आपच “ झाला हा डांगोरा । मुखीं लहानहि थोरा ॥१॥ [२६१९] ”, आणि तोहि “ कोण सांगायास । गेले होते देशोदेश ॥१॥ झालें वाऱ्या हातीं माप । समर्थ तो माझा बाप ॥२॥ कोणाची हे सत्ता । झाली वाचा वदविता ॥३॥ तुका म्हणे या निश्चयें । माझे निरसले भयें ॥४॥ [३११]”.

सारांश, हा प्रसंग कांहीं एखाद्या निंदकाच्या चिडवण्यानें डोक्यांत राख घालून आततार्इपणें ओढून घेतलेला नव्हता. हा राजनीतीला अनुसरून न्यायासमोर खेचलेला होता.

या दिव्यांतून पार पडल्यानंतर तुकोबांवर पश्चात्तापाची छटा पसरली. आपण केवळ आपला शब्द खरा करण्यासाठीं देवावर नुसताच भार टाकला इतकेंच नाहीं तर वर धरणें धरून निर्वाणाचें आव्हान दिलें हा मोठाच अपराध झाला असें वाटून त्यांनीं उद्गार काढले कीं, “काय जाणें मी पामर । पांडुरंगा तुझा पार । धरिलिया धीर । काय एक न करिसी ॥१॥ उताविळ जालों आधीं । मतिमंदबुद्धि । परी तूं कृपानिधि । नाहीं केला अव्हेर ॥२॥

तूं देवांचाही देव । अवघ्या ब्रह्मांडाचा जीव । आम्हां दासां कींव । कां भाकणें लागली ॥ ३ ॥ तुका म्हणे विश्वंभरा । मीं तो पतितचि खरा । अन्याय दुसरा । दारीं धरणें बैसलों ॥ ४ ॥ [ ३५२५ ]. नव्हती आली सीस सुरी । अथवा घाव पाठीवरी । तो म्यां केला हरी । एवढा तुम्हां आकांत ॥१॥ वांटिलासी दोही ठायीं । मजपाशीं आणि डोहीं । लागो दिला नाहीं । येथें तेथें आघात ॥२॥ जीव घेती मायबापें । थोड्या अन्यायाच्या कोपें । हें तों नव्हे सोपें । साहों त्वांचि जाणितलें ॥३॥ तुका म्हणे कृपावंता । तुज ऐसा नाहीं दाता । काय वाणूं आतां । वाणी माझी खुंटली ॥४॥ [ ३५२६ ]. कापो कोणी माझी मान । सुखें पीडोत दुर्जन । तुज होय सीण । तें मी न करीं सर्वथा ॥१॥ चुकी झाली एक वेळां । मजपासूनी चांडाळा । उभें करोनियां जळां । माजी वह्या राखल्या ॥२॥ नाहीं केला हा विचार । माझा कोण अधिकार । समर्थासी भार । न कळे कैसा घालावा ॥३॥ गेलें होऊनियां मागें । न ये बोलों तें वाऊगें । पुढिलिया प्रसंगें । तुका म्हणे जाणावें ॥४॥ [३५२४]. तूं कृपाळू माऊली । आम्हां दीनांची साऊली । न संवरीत आली । बाळवेशें जवळी ॥१॥ माझें केलें समाधान । रूप गोजिरें सगुण । निववीलें मन । आलिंगन देऊनी ॥२॥ कृपा केली जनां हातीं । पायां ठाव दिला संतीं । कळों नये चित्तीं । दुःख कैसें आहे तें ॥ ३ ॥ तुका म्हणे मी अन्यायी । क्षमा करी वो माझे आई । आतां पुढें काई । तुज चाळूं सांकडें ॥ ४ ॥ [ ३५२२ ]." एकंदरींत या दिव्यानें तुकोबांची दिवाणांतील फजिती वारली, त्यांचेमार्गे लावलेला जनवाद चुकविला, त्यांच्या गीतातत्त्वज्ञानाला देवाचाच पाठिंबा मिळाला, गीतानुवादांतील भक्तिमहिम्याला निराळ्या पंथाची स्थापना न करावी लागतांच संतांची त्यास पूर्ण मान्यता मिळाली व तुकोबांना देवाच्या वाणीबरोबर प्रत्यक्ष देवाचाहि खास लाभ झाला. तुकोबा म्हणतात : "शेवट तो भला । माझा

बहु गोड झाला ॥ १ ॥ आलों निजांच्या माहेरा । भेटों रखुमाईच्या वरा ॥ २ ॥ परिहार झाला । अवघ्या दुःखाच्या मागिल्या ॥३॥ तुका म्हणे वाणी । गेली आतां घेऊं धणी ॥ ४ ॥ [ २१८४ ]."

१४. उपसंहार :— गीतानुवादांतील विशेष, गीतेचें तत्त्वज्ञान, तुकोबांचा क्रांतिवाद व त्यांचा साधनमार्ग या विषयांवर स्वतंत्रपणें विस्तारानें लिहावें असा पूर्व संकेत होता. परंतु हें 'प्रास्ताविक' बरेंच वाढलें. यास्तव तो बेत रहित करणें प्राप्त झालें. लोकमान्य टिळकांचें 'गीतारहस्य' व श्रीयुत टाकींची 'पुरुषार्थदीपिका' यांतील विवेचनांत तुकोबांचे अभंग ठिकठिकाणीं संस्कृत व इतर गीतेवरील टीकांबरोबर आधारार्थ घेतले आहेत. त्यांतील विशेषार्थानें केलेले शब्दप्रयोग, सुलभ गोष्टीरूपानें सांगितलेला गुह्यार्थ व तुकोबांच्या वचनांस मिळालेलें श्रेष्ठ स्थान पाहिलें म्हणजे तुकोबांच्या या लेखनामागील गाढ अभ्यासाची चांगलीच कल्पना येते. त्यांच्या विचारसरणीवर गीताशास्त्राचा किंवा वेदांच्या साराचा फार मोठा परिणाम झालेला दिसतो. गाथेंतील अनुभवपूर्ण अभंगांचे साहाय्यानें लोकमान्य टिळकांना व श्री. टाकींना आपला प्रतिपाद्य विषय विशद करतां आला इतका तो मोठा आहे. अशा श्रेष्ठ सिद्धावस्थेप्रत पोहोंचलेल्या तुकोबांबद्दलची सांप्रतची 'असंस्कृत महात्मा' म्हणून रूढावलेली कल्पना, जरी खास तुकोबांनीं आपण कुणबी म्हणून प्रतिस्पर्ध्याचा उपहास करतांना गौरव करून घेतला असला तरी ती, पूर्णपणें भ्रामक असल्याचें कोणालाहि सहज कळण्यासारखें आहे. जर हा तुकोबांचा गीतानुवाद लोकमान्य टिळक व टाकी या विद्वान् व अधिकारी पुरुषांसमोर असता तर त्यांच्या मार्मिक, उच्च भावनापूर्ण, सखोल व श्रेष्ठ बुद्धिवादाच्या मुशींतून त्यांतील खरें स्वारस्य आपणांस लाभलें असतें. गीतेचें ज्ञान अधिक सुलभतेनें तुकोबांच्या भावार्थात आत्मसात् करून अनुभवांत उतरवितां आलें असतें. तुकोबांची गीता सांगण्याची भूमिकाच अगदीं स्वतंत्र व वेगळी आहे. त्यांनीं जीवात्म्यांच्या परस्पर संबंधाच्या उच्च पातळीवरून आपला गीतार्थ शोधला आहे. वाङ्मयटीका, शब्दछल, माया-

ब्रह्मवाद, विशिष्ट संप्रदायाची तरफदारी किंवा पांडित्यप्रदर्शन म्हणून हा प्रयत्न नव्हता. उलट आपला श्रेष्ठ अनुभव त्यांनीं गीतेंतील गुह्यार्थ शोधण्यांत उपयोजल्यानें स्वात्मानुभवज्ञानच त्यांत ओतप्रोत भरलें आहे. या अनुवादांत आढळणारे विशेष, बीजस्थलें व अनुभवसाराचे उल्लेख निवडून किंवा वर्गीकरण करून देतां आले असते तर तौलनिक अभ्यासास व मुमुक्षूंच्या साधनमार्गास संदर्भसाधन झालें असतें. परंतु विस्तारभयास्तव तो विचार सोडणें भाग पडलें. प्रत्यक्ष पारमार्थिक ज्ञान संपादणें व तें अनुभवानें देणें हें वेगळें. त्यास अधिकार व श्रेष्ठ अनुभव पाहिजे. परंतु निवड, वर्गीकरण, श्रेष्ठाश्रेष्ठ भावांचें विवरण यांसारखें भारवाही कार्य घडणें शक्य होतें. तें घडलें असतें तर थोडीबहुत सेवा झाली असती. असो.

तुकोबांनीं लावलेल्या सुलभ भक्तिमार्गाच्या वृक्षाची जोपासना खास देहूसच त्यांचे निर्याणानंतर तीस चाळीस वर्षे होऊं शकली नाहीं. तुकोबांच्या हयातींत त्यांचें तत्त्वज्ञान वारकरी, हरदास वगैरे आपल्या संकीर्तनांतून सारखे फैलावत होते. तो कार्यक्रम तसाच त्यांचे निर्याणानंतरहि चालू राहिला. तुकोबांच्या मुलांनीं शिवपूजा व काशीयात्रांचाच प्रथम अवलंब केला. देहूस तुकोबांच्या स्मृत्यर्थ फारसें कांहीं घडत नव्हतें. त्यांच्या पुण्यभूमींतून त्यांच्या तत्त्वज्ञानाचा जो सतत संदेश जावयास पाहिजे तो जात नव्हता. परंतु संतोबा पवारांनीं नारायणबुवास तुकोबांच्या सेवेस प्रवृत्त केलें. नारायणबावांनीं विठ्ठलाच्या व तुकोबांच्या सेवेस प्रारंभ केला. दरम्यान कचेश्वरांनीं तुकोबांच्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार केला. नीळोबाच्या निस्सीम भक्तीनें व प्रेमळ वाणीनें तुकोबांची पुष्कळांसच ओळख झाली. आणखीहि बऱ्याच संतांनीं तुकोबांचे तत्त्वज्ञानाचा प्रसार केला. त्यांत विशेषतः रामदासींचा भरणा अधिक. त्यांच्या बाडांतून सर्वत्र तुकोबांचे अभंग मोठ्या प्रमाणांत आढळतात. वारकरी व हरिदासांचा कोणताहि कार्यक्रम तुकोबांचे अभंगाशिवाय होतच नाहीं. हैबतबाबांनीं आपले देहू आळंदीच्या पालखीच्या सोहळ्यानें तर ' ज्ञानोबा तुकाराम ' हे सर्व आबालवृद्धांचे मुखीं केले.

महीपतीनें मोठ्या प्रेमानें तुकोबांचें चरित्र त्याच्या बुद्धीस समजलें व रुचलें तसें सांगूनहि उत्कृष्ट कामागिरी केली यांत संशय नाहीं. इतर संत काव्यांतूनहि तुकोबांच्या तत्त्वज्ञानाचें श्रेष्ठ स्थान लोकांच्या निदर्शनार्थ आलें. सारांश, सर्व संतांनीं भेदाभेद न मानतां तुकोबांची कीर्ति आजपर्यंत अमर राखली. परंतु अशा लोकमान्यतेला राजमान्यतेची जोड मिळतांच कोणत्याहि आचार-विचारांचा प्रसार फार जोरानें होत असतो. रामचंद्र पंडितांचें तुकोबांकडे प्रथम लक्ष्य वेधलेंसें दिसतें. त्यांनीं अर्धा गांव तुकोबांची स्मृति कायम टिकविण्यास दिला. नंतर राजाराम महाराजांकडून व ताराबाईचे संमतीनें धाकट्या शिवाजीकडून पुरस्कार करविला. नारायणबावांनीं भक्तिमार्गांत आपली प्रगती बरीच केल्यानें राजाश्रयास ते पात्र झाले. त्यांचा पुतण्या उद्धव हा प्रथम देवी भक्त व नंतर शिवभक्त, परंतु लवकरच विठ्ठलभक्तीस लागला. ह्याचें शाहूच्या दरबारीं फारच प्रस्थ वाढलें. विरूबाईनें याची पाठीराखी केली. या राजमान्यतेस तळेगांवकर दाभाडे यांचेंच वजन कामास आलें. त्यानंतर उद्धवाचे चिरंजीव खंडोबानें हें संस्थान बरेंच वाढविलें. त्यांना जाधव थोरात वगैरे पुष्कळ मराठे सरदारांनीं साहाय्य केलें. तळेगांवची दाभाडे मंडळी शेवटपर्यंत तुकोबांची भक्ति करून होती. पेशव्यांनींहि आपला हातभार लावून संस्थान टिकवलें. ब्रिटिश अमदानींत मिशनऱ्यांनीं प्रथम तुकोबांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार केला. तुकोबांच्या निर्याणानंतर सुमारें २०० वर्षांनीं सरकारनें तुकोबांची गाथा प्रसिद्ध करून तुकोबांच्या तत्त्वज्ञानाचा पुरस्कार केला. त्यानंतर आज पुन्हां १०० वर्षांनीं त्या गाथेचें पुनर्मुद्रण करून सरकार तुकोबांच्या श्रेष्ठ तत्त्वज्ञानास आपली मान्यता कायम राखीत आहे. परंतु तुकोबांना मिळालेली राजमान्यता त्यांच्या निर्याणानंतरची आहे. इतकी राजमान्यता, व्यक्तीच्या चमत्कारपूर्ण हालचालींवरून किंवा त्यामागील सिद्धीवरून मिळालेली नसून केवळ त्यांच्या श्रेष्ठ व चिरंजीव तत्त्वज्ञानाच्या गुणांवरून प्राप्त झाली आहे. इतर कोणत्याच संत वाङ्मयास अशा तऱ्हेची राजमान्यता मिळालेली नाहीं. तुकोबांच्या तत्त्वज्ञानाचा अभंगांच्या पाठां-

तरानें जसा प्रचार झाला तसा पुस्तकरूपानेंहि विपुल प्रसार झाला. तुकोबांच्या अभंगांच्या निरनिराळ्या कितीतरी आवृत्त्या बाहेर पडल्या आहेत. अद्यापहि त्या वाढत्या प्रमाणांत निघत आहेत. हेंच त्यांच्या तत्त्वज्ञानाचें चिरंजीव स्वरूप जाणण्याचें साधन आहे.

सतराव्या शतकाच्या प्रारंभींच्या सामाजिक व धार्मिक स्थित्यंतराचें वर्णन वर आलेंच आहे. परिस्थितिजन्य आचारविचारांवरील निर्बंधांतील शिथिलता, आन्हिक आचार हेच परमार्थप्राप्तीचें साधन ही कोती समजूत, अशा आचारांचे पालन व पूजनअर्चन हें ऐहिक इच्छित साधण्याचाहि एक अचूक मार्ग, अनार्य बली वगैरे देण्याच्या प्रघातावर आधारलेली सामान्य मनोवृत्ति, पारमार्थिक मार्गांत उत्पन्न केलेले अडथळे, गुणांपेक्षां जन्मालाच पारमार्थिक क्षेत्रांतहि मिळालेलें प्राधान्य, यांमुळें पारमार्थिक परा-धर्मज्ञानाचा लोप होत चालला होता. सतरावे शतकाच्या सुरुवातीच्या प्रखर दुष्काळानें मनुष्यप्राण्यांस श्रेष्ठ शक्तीची जाणीव विशेष झाली. त्यामुळें परा-धर्माच्या पुनरुज्जीवनाची आवश्यकता व तो घडवून आणण्याकडे संतांची प्रवृत्ति बळावत चालली होती. अधर्माकडे वाहणारा जोराचा प्रवाह थोपवणें व त्यास इष्ट वळण लावणें हें एक श्रेष्ठ विभूतींचें कर्तव्य होऊं लागलें होतें. परंतु तत्कालीन रूढ समजुतींत किंवा आचारांत क्रांति झाल्याशिवाय हा ओघ आवरणें अशक्य होतें. आचारधर्म, व्रतवैकल्यें हीं परमार्थसाधनास अनुपयुक्त, योगादि साधनांतील मार्गदर्शनाभावामुळें परमार्थाचा रस्ता दुर्घट व दुस्तर, साधनमार्गांतहि पारतंत्र्यामुळें तो मार्ग आक्रमणें कठिण, भक्तिमार्गाचें सुलभत्व व महत्त्व आणि अंध भक्तीला विशेषतः जरूर असणारा ज्ञानाचा अभाव, संन्यास वैराग्याची व्यवहार्याव्यवहार्यता किंवा शक्याशक्यता, वगैरे गोष्टी पटवून आचारविचारांत क्रांति घडवून आणणें इष्ट होतें. परंतु अशा क्रांतीला व्यवहारधर्मांतील अडचणी दूर करणें हें फारच मोठें व अवघड कार्य असतें. तें या परमधर्मरक्षणासाठीं आटाआटी केल्याशिवाय साधणें

दुष्कर होतें. ही आटाआटी करणें हेंच तुकोबांनीं आपलें ध्येय केलें. स्वानुभव व आपल्या आचारांतील श्रेष्ठ दर्जाची जोड देऊन तें त्यांनीं उत्कृष्टपणें साधलें.

भक्तिपंथाचें बीज तुकोबांच्यापूर्वी दोनतीन शतकांपूर्वी पेरलें जाऊन नाथादि पंथांचा विस्तार व प्रसार व वारकरी संप्रदायाचा फैलाव बराच झाला होता. परंतु आपल्या साध्याची निश्चित कल्पना या अंध भक्तवर्गात आली नव्हती. इतकेंच नव्हे तर मोठमोठ्या थोर साधुसंतांच्या साधनमार्गातील शेवटच्या अवस्थेचें अवसान योगावस्था, समाधि, अप्रत्यक्ष देवदर्शनाचे चमत्कार, सिद्धि यांवरच मापलें जात असे. थोडक्यांत या परिस्थितीचें असें वर्णन करतां येईल कीं, भक्तिमार्ग व भक्तिमहिमा जरी सामान्य जनतेस पटला होता तरी या मार्गानें साधावयाचें साध्य व या परागतीस जाण्याच्या पायवाटेची अनुभवसिद्ध माहिती किंवा खुणा समजण्याइतकें पराज्ञान जागृत झालें नव्हतें. नुसत्या भक्तीपेक्षां गुरुप्रसाद, संन्यास किंवा वैराग्य, दानधर्म, यांसारख्या बाह्य आचरणांतील गुणावगुणांवरच विशेष भर दिला जाई. संसारांतील व पारमार्थिक साध्यें एकाच वेळीं एकाच आचारानें साधतात ही श्रद्धा फार दृढ झाली होती. हें सर्व भक्तीला आवश्यक अशा परा-ज्ञानाचे अभावीं होत असे. हा अभाव दूर करणें हेंच धर्माचें पुनरुज्जीवन होतें. परंतु हा ज्ञानाभाव तत्कालीन रूढ आचारधर्म व सामाजिक व्यवहारांत निर्मित झाला होता. ह्या रूढ कल्पनांना मूठमाती देणें सहजसाध्य नसतें म्हणून बरेच वेळां अशा कल्पनांना बगल देऊन निराळाच सुभा निर्माण करावा लागतो. क्रांतीस समाज व राज्यव्यवस्था केव्हांहि मंदगती असतात. त्यामुळें सामाजिक व राजकीय अडथळ्यांनाच विशेष तोंड द्यावें लागतें. तुकोबांना या क्रांतीसाठीं प्रामुख्यानें कोणत्या गोष्टी कराव्या लागल्या त्यांतील कांहीं महत्त्वाच्या व ठळकठळक बाबी थोडक्यांत नमूद करतों :—

[अ] भक्तीला मनोनिग्रह, चित्तशुद्धि वगैरेंची जोड देण्यासाठीं देवतापूजनअर्चन, नित्यकर्मे व विहितकर्मोभ्यतिरिक्त व्रतवैकल्यादि आचारधर्म रूढ झाला. परंतु त्यांची सांगता सामान्य माणसाच्या अधिकाराबाहेरची झाली. सांगतेच्या प्रयोगांतहि समाधान वाटण्याइतका आत्मविश्वास उत्पन्न करण्याऐवजीं त्यांतील सर्व प्रकारच्या कमी अधिकाबद्दल 'क्षमस्व भगवान्' सारखें म्हणत राहून जनतेचें मन या प्रयोगाबाबत नेहमींच साशंकित ठेवलें. नसतें पाप पदरीं घेऊन हानी पत्करण्यापेक्षां अशा आचारांपासून दूर राहण्याचीच प्रवृत्ति निर्माण झाली. या पूजाअर्चनांतील अवडंबर व परस्वाधीनता संपूर्ण काढून टाकण्यासाठीं तुकोबांनीं प्रयत्न केला. तुळसीबेलाखेरीजहि केवळ मानसपूजेनें कार्य साधणें व अशा उपासना नामस्मरणाशिवाय कोणत्याहि मंत्रतंत्राविना होऊन परमार्थ साधतो हें पटवून सामान्य जनाची त्याप्रमाणें तयारी करावयाची होती. ती त्यांनीं केली.

[ आ ] एका परमेश्वराशिवाय इतर देवता, पितृगण, वगैरेंचें पूजन अर्चन करणें क्षुल्लक मानून त्यांचा पराभक्तीशीं संबंध नाहीं हें प्रस्थापित केलें.

[ इ ] पुराणादि शास्त्रग्रंथांनीं ज्या देवाच्या पूजनाला कोणतीच मर्यादा घातली नव्हती व ज्याच्या पूजेअर्चेस सर्वांस सारखाच अधिकार होता अशा विठ्ठलभक्तीचाच महिमा अधिकाधिक रूढ केला व करविला.

[ ई ] अद्वैताची पाठीराखी केली; परंतु सगुणभक्तीनें निर्गुणभाव जागृत करण्याचा सुलभ मार्ग दाखविला.

[ उ ] जरी आपल्या पूर्णत्वासाठीं स्वप्नांतील गुरु केला तरी गुरूपदेशाची अव्यवहार्यता व फुकट व्याप्ती आपल्या उदाहरणानें दाखवून गुरुशिष्यांची रूढी मोडली. तुकोबांनीं प्रत्यक्ष गुरूपदेश दिला नाहीं म्हणून कांहीं ब्राह्मण संतांनीं स्वप्नांतील उपदेशाची आटाआटी केली. परंतु इतर संतांनीं गुरूपदेशाशिवायच गुरु करून आपलें साध्य साधतें हें मानलें.

[ ऊ ] तुकोबांना गुरु मिळणें जड होतें. म्हणून त्यांनीं राघवाचा शिष्य व व्यासाचा प्रशिष्य केशव चैतन्य हा गुरु स्वप्नांत केला. राघवाची मूळ भक्ती

दत्तात्रयाची, नंतर व्यासभक्ती व चेतन मार्ग, त्यानंतर चैतन्य व चतुःश्लोकी भागवतांतील मार्ग, असे हे सर्वानुभवी होते. त्यांचे शिष्य केशव चैतन्य महानुभाव म्हणून ओळखले जात व त्यांच्या मठाला कागदपत्रांतून महानुभावमठ म्हणून उल्लेखीत. स्वप्नांतील गुरूला जातपात पाहण्याची गरज नाहीं हें सिद्ध केलें. तसें पाहिलें तर तुकोबा हे गुरूपदेशाविनाच परागतीस गेले अशी निदान या चैतन्य शिष्य-सांप्रदायांत समज होतीसें दिसतें. तुकोबांस समकालीन कृष्णदास लिहितात : " तुकया ऐसा महान संत। नयनीं रात्रंदिन दिसत। जवळीं येतां प्रेमें बोलत। परि नाहीं उपदेशिला ॥ ७३ ॥ " [ अध्याय १ ला ].

[ ए ] ' राम ', ' कृष्ण ' व ' हरि ' असे तीन मंत्र असलेले स्वतंत्र पंथ प्रस्थापित झाले होते. यांतील कोणाहि एका मंत्राचा पुरस्कार करणें तर त्या पंथाचा प्रसाद पाहिजे. तुकोबांनीं ' रामकृष्णहरि ' असा जोड मंत्र घेऊन या तिहींचा एका विठ्ठलांतच समावेश होतो असें सांगून तत्कालीन पंथांच्या रूढ मर्यादेतून मार्ग काढला व सर्वांस फुकटचा मंत्र मोकळा करून विठोबा हें उपास्य दैवत सांगितलें.

[ ऐ ] ध्यानाचें रूप कृष्णाचें बालरूप, भजनमूर्ती पंढरीचा पांडुरंग किंवा विठोबा व अंतिम ध्येय सायुज्यतेचें ठेवून तें साधण्याचा सोपा मार्ग अनुभवानें दाखविला. अशा भक्तीला कोणत्या पराज्ञानाची जरूर तें सांगितलें. जन्ममरणाची भीति कमी केली. समाधि व योग यांची अनावश्यकता पटवून दिली.

[ ओ ] पारमार्थिक जगतांत धर्मभेद, जातिभेद, वर्णभेद व सामान्य व्यवहारांतील व्यक्तिभेदांचें अस्तित्व असत्य असल्याचें प्रतिपादून सर्वांस निदान भक्तीच्या आधारांत तरी एकच दर्जा व सर्वाधिकार मिळवून दिला.

[ अं ] व्यक्ति व समाज यांच्या मनन चिंतनांतील भेदभाव दूर करून दोन्ही परिस्थितींत एकच मार्ग व अशा उपासनेंत सर्वांचा एकच दर्जा व

भाव अशी उपासनेंत ऐक्यता साधली. त्यामुळें सामुदायिक उपासना सुलभ व एकमार्गी झाली. उपासनेंतील संदिग्धता किंवा उपासनेंतील विफलता व शंका यांचें कारण काढून टाकलें.

[ अः ] वरील सर्व क्रांतिकारक तत्त्वें दृढ करण्यासाठीं पुरातन आधार घेणें प्राप्त होतें. तो आधार गीताशास्त्राचा घेतला व त्यावरच आपला क्रांतिवाद अधिष्ठित केला.

सारांश, भक्तिमार्गातील भेदाभेदाचे सर्व मानवी निर्बंध काढून टाकले. भक्तीची सुफलता किंवा विफलता यांचें मूल्यमापन दृश्य परिणामांवर करण्याची कल्पना मुळांतच काढून टाकली. पारमार्थिक व संसारक्षेत्रांतील फलप्राप्तीचे मार्ग निराळे होत. ते दोन्ही मार्ग एकाच वेळीं आक्रमणें शक्य आहे. दया क्षमा शांतीवर आधारलेलें सांसारिक जीवन जसें सुफलदायी होतें तसेंच तें परमार्थांतहि साहाय्यक होतें. संन्यास तत्त्वतःच असत्य. निष्काम कर्म व निःसंगत्व हींच खरीं साधनें. नित्य व विहित कर्मे करणें आवश्यक. भक्तिमार्ग हेंच परमार्थातील सुलभ व श्रेष्ठ साधन. तें निर्बळ प्राण्यापासून तों थेट ब्राह्मणश्रेष्ठ महंत स्त्री-पुरुषांस सारखेंच फलदायी. सिद्धावस्था किंवा परागति भक्तीच्या उत्कटतेवर अवलंबून राहते. नामस्मरणानें मिळविलेलें पुण्य केल्या पापाचें क्षालन करीत नाहीं तर तें श्रेष्ठावस्थेस नेतें. यासारखे आपल्या अभ्यासानें व अनुभवानें प्रगतिपर विचारप्रवाह सर्वत्र फैलावून या प्रास्ताविकाचे प्रारंभीं दिल्याप्रमाणे त्यांनीं जें आपलें ध्येय पाखांडखंडन करून धर्मरक्षणासाठीं आटाआटी करावयाची म्हणून ठरविलें तें पूर्ण सिद्धीस नेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. वेदप्रामाण्य मानणारे परंतु मतभेदामुळें किंवा जातीय व इतर कारणांमुळें उत्पन्न झालेली विषमता सहन न झाल्यानें सनातनियांपासून फुटून निघालेले महानुभावादि पंथांना उतरती कळा लागली. या सर्व पंथांनीं थोड्या फार फेरबदलानें पूर्वीचाच मामला चालविला होता. तो तितका प्रगमनशील नव्हता.

तुकोबांनीं या कुटीर वृत्तीनें पूर्वीच्या गुणदोषांत सामाजिक क्षेत्रांतील संकुचित मर्यादेची नवी आपत्ति स्वीकारली नाहीं. स्वधर्मांत व स्वधर्मानेंच वागून त्यांतील ' भलताई स्वधर्म योनिसंभव कर्म। उत्तमें उत्तम अनुष्ठीजे ॥ ' [गी. १५२] या न्यायानें जाचक भासणारीं नित्यकर्में किंवा विहितकर्में सोडून इतर मानवी निर्बंध मोडून स्वधर्म रक्षण केलें. बारकऱ्यांसच नव्हे तर सर्व सामान्य जनांस आपला मार्ग मोकळा ठेवला. तुकोबांचें हें रुचणारें व सहज पटणारें तत्त्वज्ञान भजन संकीर्तनांतून प्रसार करणें शक्य झालें. ही पारमार्थिक क्षेत्रांतील सुधारणा इतकी श्रेष्ठ, दूरदर्शी, अनुभवसिद्ध व व्यवहार्य होती कीं नंतर दोनशें वर्षांनीं सत्यशोधनास निघालेल्या प्रार्थनामंदिरादि संस्थांना त्यांच्या शिकवणूकींत विशेष सामर्थ्य व सत्य धर्माची साक्ष पटली. या सुधारणावादी मंडळींना तुकोबा आपले आद्यगुरुच वाटत होते. डॉ. भांडारकरांसारख्यांना हें पटलें होतें. परंतु तुकोबांच्या चरित्रावर चढविलेल्या आचारधर्मीय प्रावरणांमुळें या मंडळींना तुकोबांचें सत्य स्वरूप उमगलें नाहीं व त्यांच्या शिकवणुकीमागील भूमिका आकलन झाली नाहीं. त्यामुळें तुकोबा आपले आद्यगुरु म्हणून मानण्यांत त्यांनीं कच खाल्ली व परदेशीयांकडे धांव घेतली. परंतु तुकोबांच्याच अभंगांतील मूर्तिपूजाविषयक शब्द काढून आपल्या सांप्रदायाची संथा तयार केली. असो. थोरथोर संतांनीं तुकोबांचें भक्ति-मार्गांतील श्रेष्ठ स्थान ओळखलें होतें. या बाबतींतील नेहमींच्या पठणांत असलेला अभंग उद्बोधक आहे : " संतकृपा झाली। इमारत फळा आली ॥ १ ॥ ज्ञानदेवें रचिला पाया। उभारिलें देवालया ॥ २ ॥ नामा तयाचा किंकर। तेणें रचिलें तें आवार ॥ ३ ॥ जनार्दन एकनाथ। खांब दिधला भागवत ॥४॥ तुका झालासे कळस। भजन करा सावकाश ॥ ५ ॥ बहिणा म्हणे फडकती ध्वजा। निरूपणा केले वोजा ॥६॥" [२२९].* तुकोबांचा

* हा अभंग जनाबाईच्याहि नांवानें प्रसिद्ध आहे. तुकोबांच्या क्षेपक अभंगांतहि [ ३१६ ] थोड्याफार बदलानें सर्व गाथांत तो आला आहे.

पंथ सर्वमान्य व कार्यक्षम झाला, सनातन धर्मातच जगूं व वाढूं शकला. याचें कारण एकच आणि तें म्हणजे तुकोबांनीं पंथाच्या अगर सांप्रदायाच्या श्रेष्ठाश्रेष्ठतेच्या व भेदाभेदाच्या भांडणांत न शिरतां, आहे त्याच स्वधर्मात, सुलभ आणि सर्वांस व सरांस मोकळे असणाऱ्या व सहज पचनीं पडणाऱ्या साधनमार्गांचें महत्त्व जनतेंत ठसविलें. सामान्य जनाप्रमाणेंच थोर संतांना इतकेंच नव्हे तर सुधारणावादी नेत्यांनाहि तुकोबांचा साधनमार्ग आज शेंकडों वर्षांनंतरहि पुरोगामी वाटला. हेंच त्यांच्या अमर कीर्तीचें व महतीचें मुख्य कारण होय. तुकोबांनीं आपल्या या श्रेष्ठ ज्ञानाचा ज्या गीताशास्त्रावर पाया रचला ती गीता त्यांस सांपडतांच ज्या शब्दांत त्यांनीं जनताजनार्दनास अर्पण केली त्याच शब्दांत त्यांच्या ज्या गीतानुवादाचा सांप्रत विसर पडला आहे तो आज तीनशें वर्षांनीं जनताजनार्दनास प्रेमभावानें सादर करीत आहें:

**" परि ईश्वराकरितां । मज सांपडली गीता ॥ १० ॥**
**तिच्या संगें अंगिकार । केला तरी द्यावा थार ॥ ११ ॥ "**

[ गी. ३७४ ].

# ॥ श्रीमद्भगवद्गीता ॥

[ मालामन्त्रः–बीजम्–कीलकम् ।

॥ ॐ ॥ अस्य श्रीभगवद्गीतामालामन्त्रस्य भगवान् वेदव्यास ऋषिः ।
अनुष्टुप् छन्दः । श्रीकृष्णपरमात्मा देवता ।
अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे, इति बीजम् ।
सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज, इति शक्तिः ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः, इति कीलकम् ।

हृदयादिन्यासः ।

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः, इति हृदयाय नमः ।
न चैनं][1] क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः, इति शिरसे स्वाहा ।
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च, इति शिखायै वषट् ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः, इति कवचाय हुम् ।
पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः, इति नेत्रत्रयाय वौषट् ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च, इति अस्त्राय फट् ।
इति हृदयादिन्यासः ।

करन्यासः ।

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः, इत्यङ्गुष्ठाभ्यां नमः । न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः, इति तर्जनीभ्यां नमः । अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च, इति मध्यमाभ्यां नमः । नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः, इत्यनामिकाभ्यां नमः । पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः, इति कनिष्ठिकाभ्यां नमः । नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च, इति करतलकरपृष्ठाभ्यां नमः । इति करन्यासः ।

ध्यानम् ।

पार्थाय प्रतिबोधितां भगवता नारायणेन स्वयं
व्यासेन ग्रथितां पुराणमुनिना मध्ये महाभारतम् ।
अद्वैतामृतवर्षिणीं भगवतीमष्टादशाध्यायिनी-
मम्ब त्वामनुसंदधामि भगवद्गीते भवद्वेषिणीम् ॥ १ ॥

नमोऽस्तु ते व्यास विशालबुद्धे
फुल्लारविन्दायतपत्रनेत्र ।
येन त्वया भारततैलपूर्णः
प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः ॥ २ ॥

प्रपन्नपारिजाताय तोत्रवेत्रैकपाणये ।
ज्ञानमुद्राय कृष्णाय गीतामृतदुहे नमः ॥ ३ ॥

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥ ४ ॥

वसुदेवसुतं देवं कंसचाणूरमर्दनम् ।
देवकीपरमानन्दं कृष्णं वन्दे जगद्गुरुम् ॥ ५ ॥

भीष्मद्रोणतटा जयद्रथजला गान्धारनीलोत्पला
शल्यग्राहवती कृपेण वहनी कर्णेन वेलाकुला ।
अश्वत्थामविकर्णघोरमकरा दुर्योधनावर्तिनी
सोत्तीर्णा खलु पाण्डवै रणनदी कैवर्तकः केशवः ॥ ६ ॥

पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थगन्धोत्कटं
नानाख्यानककेसरं हरिकथासंबोधनाबोधितम् ।
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा
भूयाद्भारतपङ्कजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥ ७ ॥

मूकं करोति वाचालं पङ्गुं लङ्घयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वन्दे परमानन्दमाधवम् ॥ ८ ॥

[ शान्ताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं
विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभाङ्गम् ।
लक्ष्मीकान्तं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यं
वन्दे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ॥ ९ ॥ ][1]

यं ब्रह्मा वरुणेन्द्ररुद्रमरुतः स्तुन्वन्ति दिव्यैः स्तवै-
र्वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः ।
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो
यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ॥ १० ॥

[ प्रशस्तिः ।

गीता सुगीता कर्तव्या किमन्यैः शास्त्रसंग्रहैः ।
या स्वयं पद्मनाभस्य मुखपद्माद्विनिःसृता ॥ १ ॥

सर्वशास्त्रमयी गीता सर्वदेवमयो हरिः ।
सर्वतीर्थमयी गङ्गा सर्वधर्ममयी दया ॥ २ ॥

गीता गङ्गा च गायत्री गोविन्दो हृदि संस्थितः ।
चतुर्गकारसंयोगात् पुनर्जन्म न विद्यते ॥ ३ ॥ ][1]

---

१. चौकोनी कौसांतील [] मजकूर पूर्ततेसाठीं दिला आहे. तो हस्तलिखित प्रतींत गहाळ किंवा चुकून लिहावयाचा राहिला आहे.

॥ ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥

श्री संतश्रेष्ठ तुकाराम महाराजकृत

# श्रीमद्भगवद्गीतेचा

## अभंगात्मक अनुवाद

॥ अथ प्रथमोऽध्यायः ॥

— अर्जुनविषाद —

धृतराष्ट्र उवाच ।

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

१. धर्मक्षेत्रीं कुरुक्षेत्रीं[२] रणांगणीं । मिळाले आयनीं झुंजावया ॥ १ ॥ प्रज्ञाचक्षु[३] पुसे संजयासी गोष्टी । अंतरीं तो कष्टी पुत्रदुःखें ॥ २ ॥ पंडुपुत्र आणि आमुचे आत्मज । केलें कैसें काज राज्यलोभें ॥ ३ ॥ तुका ऐसें[४] प्रार्थी ऐकावें सज्जनें । व्यासाचे आज्ञेनें संजय बोले ॥ ४ ॥

---

२. 'धर्मक्षेत्रीं कुरुक्षेत्रीं' ऐवजीं 'धर्मबंधु कुरुपुत्र '—पाठ प्र. ४.

३. = धृतराष्ट्र.

४. ' ऐसे ' ऐवजीं ' दास '–पाठ प्र. ४.

**संजय उवाच ।**

**दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।**
**आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥**

२. हांसोनी संजय बोले ऐक राया । पांडवी सेनिया बळीवंता ॥ १ ॥ निज बळ दर्पे चढला अभिमाना । येणें दुर्योधना गुरुपाशी ॥ २ ॥ ऐसे[४] तुका बोले द्रोणाचे सन्निध । राजा उपबोध करी काय ॥ ३ ॥

**पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।**
**व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥**

३. पाहा जी पांडवसेनासमुदाव । सजविला[५] जीव घ्यावयासी ॥ १ ॥ शस्त्रें कवच टोप लेऊनी सजीले[५] । उतावीळ भले झुंजावया ॥ २ ॥ आचार्या शाहाणे नव्हेति पांडव । परि राखी नांव धृष्टद्युम्न ॥ ३ ॥ शिष्य हा तुमचा विद्या तुम्हीं दिली । उपकारा आली ऐसें झालें ॥ ४ ॥ द्रुपदाचा पुत्र अग्निगर्भी झाला । बुद्धिवंत भला तुका म्हणे ॥ ५ ॥

**अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।**
**युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥**

**धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।**
**पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥**

४. येथें भीमार्जुनातुल्य महावीर । युयुधान शूर विराटही ॥ १ ॥ द्रौपदीचा पिता पूर्ण महारथी । धृष्टकेतु मूर्ती शिशुपाळाची ॥ २ ॥ चेकितान काशीपति वीर्यवान । पुरूजित आणि कुंतिभोज ॥ ३ ॥ नरपुंगव नृप शैब्य पराक्रमी । तुका म्हणे नामें पुढें ऐका ॥ ४ ॥

**युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।**
**सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥**

---

५ 'सजविला' ऐवजीं 'साजावली' व 'सजीले' ऐवजीं 'साजले'—पाठ प्र.१.

**अस्माकं तु विशिष्टा ये तान् निबोध द्विजोत्तम ।**
**नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान् ब्रवीमि ते ॥ ७ ॥**

५. युधामन्यू वीर उत्तमौजा तैसा । अभिमन्यु खासा पार्थपुत्र ॥ १ ॥ द्रौपदीचे पांच सर्व महावीर । आमुचेही थोर अवधारी ॥ २ ॥ अधिकारी त्यांचीं वर्णितसे नामें । सूचना उत्तमें ऐकावी जी ॥ ३ ॥ तुका म्हणे गीतेमाजि नव श्लोक । बोलिला पृथक दुर्योधन ॥ ४ ॥[६]

**भवान् भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।**
**अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥**

६. पितामह तुम्ही संहारिते अरी । तैसा धनुर्धारी कर्ण माझा ॥१॥[७] कृपाचार्य गुरु श्रेष्ठां श्रेष्ठ खरा । समान साजिरा विजयाख्य ॥ २ ॥ द्रोणपुत्र चिरंजीवी अश्वत्थामा । विकर्णाचा महिमा काय वाणूं ॥ ३ ॥ भूरिश्रवा तसा कळूं द्या तुम्हांसी । महिमा बोले ऐसी तुका म्हणे ॥ ४ ॥

**अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।**
**नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥**

७. आणीकही बहू शूर महाबळी । रणीं चेंडुफळी खेळणारे ॥ १ ॥ मजसाठीं जीव संकल्पिला जीहीं । हाणणारे घाई शस्त्रें नाना ॥ २ ॥ समरीं

---

६. या अभंगाशिवाय प्रत २ मध्यें पुढील दोन अभंग अधिक आहेतः

५ (अ). युधामन्यु महावीर धीर गाढा । उत्तमौजा फुडा पराक्रमी ॥ १ ॥ अभिमन्यु मुख्य द्रौपदीचे पुत्र । हे माहारथी थोर रनरंगी ॥ २ ॥ आणीक नृपाळ बहुत पातले । तुका म्हणे भले शौर्यतेजे ॥ ३ ॥—॥ ६ ॥

५ (आ). आमुचे जे थोर वीर सेनापति । धीर माहारथी मुख्य धूर ॥ १॥ सांगतों जी तुम्हा स्वामि द्विजोत्तमा । आलेति जे आम्हा साह्यभूत ॥ २ ॥ तयांचीही नामें संज्ञार्थ ऐकिजे । प्रतापि निज तेजें भाणु जैसे ॥ ३ ॥ तुका म्हणे गुरुसंन्निध नृपति । बोलिला वीनाति करोनिया ॥ ४ ॥–॥ ७ ॥

७. या चरणाऐवजीं प्र. १ मधील पाठ असाः ‘ तुम्ही आणि भिष्म पितामह अरी । संहारक थोरी कर्णा अंगीं ॥ १ ॥ ’

कुशल नामाथिले भले। शिपाई दादुले काळदूत ॥ ३ ॥ अर्हतेच्यायोगें बोले राजेश्वर। ऐकोत चतूर तुका म्हणे ॥ ४ ॥

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

८. परंतु निर्बळ दिसे पांडवदळ। भीम रक्षपाळ असतांही ॥ १ ॥ आमुचे सबळ तुम्हांवीण दीसे। तुम्ही रक्षा कैसे काय वाणूं ॥ २ ॥ विश्वाचे अंकूर तैसे महावीर। काळदंताकार शस्त्रें हातीं ॥ ३ ॥ तुका म्हणे संतां ऐकावें सावध। बोलतां सक्रोध राव झाला ॥ ४ ॥

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः।
भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्वे एव हि ॥ ११ ॥

९. रक्षावया सेनाभार। स्थानें नेमिलीं अपार ॥ १ ॥ तथापि त्या वर्तमाना। तुम्ही आणावे[८] जी मना ॥ २ ॥ भीष्मातें तुम्ही रक्षा। राखावया आत्मपक्षा ॥ ३ ॥ स्थानींहूनि तैसे सर्व। तुका म्हणे हें अपूर्व ॥ ४ ॥

तस्य संजनयन् हर्षं कुरुवृद्धः पितामहः।
सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

१०. अहो तो कौरवांचा राजा। संतोषला जया काजा ॥ १ ॥ ऐसा भीष्म तो वडील। दावी संतोष नवल ॥ २ ॥ हांक फोडी सिंहनादें। शंख वाजवी आनंदें ॥ ३ ॥ पूर्ण प्रतापाचें अंग। तुका म्हणे संतसंग ॥ ४ ॥

ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः।
सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

११. तेव्हां एक वेळां सारी। शंखध्वनींची कुसरी[९] ॥ १ ॥ भेरी गर्जती ठोकिल्या। पणवानकाहि गाजल्या ॥ २ ॥ एक सरेंची गोमुखें। दाहि दीशा नाद मुखें[१०] ॥ ३ ॥ झाल्या पूर्ण म्हणे तुका। लीला पांडवांची ऐका ॥ ४ ॥

---

८. 'आणावे' ऐवजीं 'आणीके'—पाठ प्र. ६.
९. = कौशल्य.
१०. 'मुखें' ऐवजीं 'सुखें'—पाठ प्र. १.

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

१२. थोरी थोरला तो रथी । शुभ्रवर्ण हयनाथी ॥ १ ॥ दोघे युक्त रहंवरी[११] । कुंतिपुत्र पूतनारी[१२] ॥ २ ॥ दिव्य वाजविते झाले । शंख करींचे आपुले ॥ ३ ॥ अहो माधवीं पांडव । तुका म्हणे ठेवी जीव ॥ ४ ॥

पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥

१३. पांचजन्य हृषीकेशें । वाजवितांचि आवेशें ॥ १ ॥ देवदत्त धनंजयें । वाजविला देऊं भये ॥२ ॥ पौंड्रनामा महा शंख । श्रवणें रिपूस[१३] दे दुःख ॥ ३ ॥ भीमें वाजविला बळें । तुका वदे हर्षमेळें ॥ ४ ॥

अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

१४. प्रभु अनंतविजय । श्रवणार्थी दाता जय ॥ १ ॥ शंखालागीं युधिष्ठिर । वाजवीत हर्षभर[१४] ॥ २ ॥ आतां नकुलसहदेवें । शंख वाजवी[१४] ऐकावे ॥ ३ ॥ सुघोषमणिपुष्पक । तुका म्हणे हे रसिक ॥ ४ ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥

१५. धनुर्धर महा काश्य । राजे सर्व ज्यासी वश्य ॥ १ ॥ तैसा भीष्मप्राण हारी । शिखंडीची केवढी थोरी ॥ २ ॥ धृष्टद्युम्न उत्तरपिता[१५] । सात्यकी तो अपराजिता ॥ ३ ॥ तुका पुढें विनवितो । ऐका व्यास ज्या वाणितो ॥ ४ ॥

---

११. = मोठ्या रथांत.　　१२. = कृष्ण.

१३. ‘ रिपूस ’ ऐवजीं ‘ रिपुशी ’—पाठ प्र. ४.

१४. ‘ हर्षभर ’ ऐवजीं ‘हर्षपर’ व ‘वाजवी’ ऐवजीं ‘वाइले’—पाठ प्र.१.

१५. = विराट.

**द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।**
**सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान् दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥**

१६. जनक द्रौपदीचा ऐका । ज्याच्या नामें यमा धोका ॥ १ ॥ पाची पांडवांची मुलें । मार्जा अभिमन्यु दादुलें[16] ॥ २ ॥ अन्यत्रही देशपती । मिळुनि जळज[17] वाजविती ॥ ३ ॥ आपुलाले पृथकाकारें । तुका म्हणे एकसरें ॥ ४ ॥

**स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।**
**नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥**

१७. ते घोष धार्तराष्ट्रांचे । करि छेदन धैर्याचें ॥ १ ॥ विदारीत वक्षस्थळां । दिली सर्वांशीं अवकळा[18] ॥ २ ॥ गगन आणि भुमी । झाली नादेंकरुनी श्रमी ॥ ३ ॥ तुका म्हणे सैन्य थोरवी[19] । महा तुंबळ गर्जवी ॥ ४ ॥

**अथ व्यवस्थितान् दृष्ट्वा धार्तराष्ट्रान् कपिध्वजः ।**
**प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पाण्डवः ॥ २० ॥**

१८. आप्त व्यवास्थित सारे । पाहोनी स्वचमुकैवारे ॥ १ ॥ धार्तराष्ट्र कपिध्वज । घेऊं पाहे युद्धा आज ॥ २ ॥ उचलुनी धनु करीं । हांसे कौतुकें अंतरीं ॥ ३ ॥ आरंभावी खणाखणी । तुका म्हणे त्या निर्वाणीं ॥४॥

**हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।**
**अर्जुन उवाच ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥**

१९. तेव्हां पार्थ हृषीकेशा । बोले कैसा हांसोनी ॥ १ ॥ मध्यभागीं नेई रथ । मनोरथ पुरवणी[20] ॥ २ ॥ उभय सेना[20] पाहेन मी । ऐशा[20]

---

१६. ‘ दादुलें ’ ऐवजीं ‘ धाकुलें ’—पाठ प्र. ६.
१७. = शंख. १८. = धास्ती.
१९. ‘ सैन्य थोरवी ’ ऐवजीं ‘ सैन्यथोर्वी ’—पाठ. प्र. १, २ व ६.
२०. ‘ पुरवणी ’ ऐवजीं ‘ पुरवी ’; ‘ सेना ’ ऐवजीं ‘ सैन्य ’; ‘ ऐशा ’ ऐवजीं ‘ ऐसा ’—पाठ प्र. ४, ५ व ६.

भूमीं करी उभा ॥ ३ ॥ अच्युताचे वंदुन पाय[२१] । तुकया सोय दिसे
बा ॥ ४ ॥

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥

२०. तो कीं जो यास मी पाहे । मनसंदेहे वाराया ॥ १ ॥ झुंझार जे उभे रथीं । मोक्षग्रंथी बांधाया ॥ २ ॥ आम्ही तरी कोण कोणा । नारायणा भांडावे ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसें देवा । अर्जुन तेव्हां बोलिला ॥ ४ ॥

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

२१. पाहीन मी योद्धे[२२] वीर । वीर धीर प्रतापी ॥ १ ॥ मिळोनि आले आप्तवर्ग । किंवा स्वर्गसाक्षेपी ॥ २ ॥ मज भासते दुर्बद्धी । नाहीं शुद्धी चोखट ॥ ३ ॥ तुका म्हणे पार्थजीवा- । लागीं देवा खटपट ॥ ४ ॥

संजय उवाच ।

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥

२२. हृषीकेशा गुडाकेश । बोले ऐसें प्रार्थुनी ॥ १ ॥ भारतराया संजय बोले । प्रेमें डोले अंतरीं ॥ २ ॥ त्या दो सैन्यामध्यभागीं । रथ शारंगी[२३] उभा करी ॥ ३ ॥ तुका म्हणे विजयी रथ । विजयी पार्थ सांभाळी ॥ ४ ॥

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान् समवेतान् कुरूनिति ॥ २५ ॥

२३. समोर भीष्मद्रोणांच्या । भूपाळांच्या सन्मुख ॥ १ ॥ पार्थ पाहे म्हणे यांते । मिळाले ते कुरूप्रती ॥ २ ॥ तेव्हां विस्मो[२४] कृष्णा मनीं ।

---

२१. ‘ अच्युताचे वंदुन पाय ’ ऐवजीं ‘ अच्युत म्हणे बसुनी पाहे ’—पाठ प्र. ४ व ६.

२२. ‘ योद्धे ’ ऐवजीं ‘ युद्धीं ’—पाठ प्र. ४ व ६.

२३. = शारङ्गपाणी.

२४. ‘ विस्मो ’ ऐवजीं ‘ विभो ’—पाठ प्र. २, ४ व ६.

विचार ध्यानीं आणिला ॥ ३ ॥ कांहीं कौतुक दिसताहे। तुकया साह्य दीनबंधु ॥ ४ ॥

तत्रापश्यत् स्थितान् पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान् मातुलान् भ्रातॄन् पुत्रान् पौत्रान् सखींस्तथा ॥ २६ ॥

२४. तों पार्थ पाहे चुलते। क्रोधें पिते खवळले ॥ १ ॥ आजे त्यांत तयाप्रती। नाहीं क्षितीं उपमा ॥ २ ॥ गुरु मामे आणि भाऊ। आपुले जीऊ प्रत्यक्ष ॥ ३ ॥ पुत्रपौत्र तयांसही। तुका पाही त्यापाठीं ॥ ४ ॥

श्वशुरान् सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान् समीक्ष्य स कौन्तेयः सर्वान् बन्धूनवस्थितान् ॥ २७ ॥

२५. सासरे सोयरे तेही। निःसंदेही जे उभे ॥ १ ॥ त्या दोही फौजे आंत। युद्धीं ख्यात लाविते ॥ २ ॥ कौंतेयें देखोनियां। जीवीं माया झळंबे[२५] ॥ ३ ॥ बंधूतेंही रणांगणीं। तुका वाणी त्या लागीं ॥ ४ ॥

अर्जुन उवाच ।

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

२६. कृपेंकरून आविष्ठ। परनिष्ठ भावार्थी ॥ १ ॥ ऐसा विषादें बोलिला। कृष्णा भला पार्थिव[२६] ॥ २ ॥ देखियेले स्वजनांस। आपणांस जे बंद्य ॥ ३ ॥ युद्धार्थी ते उभे सिद्ध। जे निषिद्ध तुकयाशीं ॥ ४ ॥

सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥

२७. पिळिती सर्वही गात्रें। फळा वक्त्रें त्यागिली[२७] ॥ १ ॥ शरीरीं सुटतो कंप। रोम रोम कांपती ॥ २ ॥ तुका विनवी नारायणा। क्लेश मना पार्थाच्या ॥ ३ ॥

---

२५. = झोंबे.

२६. ‘ पार्थिव ’ ऐवजीं ‘ प्रार्थत ’—पाठ प्र. ४ व ६.

२७. ‘ त्यागिली ’ ऐवजीं ‘ त्या काळीं ’—पाठ प्र. ४ व ६.

गाण्डीवं स्रंसते हस्तात् त्वक् चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ।। ३० ।।

२८. हातांपासुन गांडिव । गळतें जीव दग्धला ॥ १ ॥ उभा राहोंही ना शके । चित्त शोकें भ्रमिष्ट ॥ २ ॥ तुका म्हणे करुणानिधी । हे उपाधी निवारा ॥ ३ ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ।। ३१ ।।

२९. देखतो मीं निमित्तास । विपरितांस केशवा ।। १ ॥ न ही कल्याण मीं देखे । आवघे[२८] सखे मारुनी ॥ २ ॥ तुका म्हणे जैसे भयें । तैसे स्वयें निवेदी ॥ ३ ॥

न काङ्क्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ।। ३२ ।।

३०. न इच्छी मन माझें । कांहीं राज्यादीक ओझें । जयकांक्षेविशीं तुझे । पाय दिव्य आहेती ॥ १ ॥ कृष्णा गोपाळा माधवा । नित्य प्राणाचा विसावा । आम्हां कासयासी व्हावा । हा संसार घातकी ॥ २ ॥ राज्यभोगें जीवित हें । या सुखाचा संदेहें । आता माझी पाहे । लाज रक्षी दयाळा ॥ ३ ॥ गोविंदा काय आमुतें । चाळवणी[२९] वोपा भातें । तुका म्हणे[३०] कुशब्दातें । त्रास मानी वोखटिया[३१] ॥ ४ ॥

येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

---

२८. 'अवघे' ऐवजीं 'युद्धीं'—पाठ प्र. ४ व ६.
२९. = भाताचा तूस.
३०. 'म्हणे' ऐवजीं 'दास'—पाठ प्र. ४.
३१. 'वोखटिया' ऐवजीं 'वोखटा'—पाठ प्र. १.

३१. राज्य भोगूं सुखें आम्ही । काय दीसतें दुर्नामी । तूं तंव काय नेणें स्वामी । जें प्रार्थावें हळुहळु ॥ १ ॥ अपेक्षितो ज्यानिमित्य । तें तंव घाव[३२] झालें सत्य । पदरीं माप हें असत्य । आजि घालीं रोकडें ॥ २ ॥ सोडोनि तें प्राणघना । आणि संसारी वासना । आणि कल्पना कामना । मेली काय ममतेची ॥ ३ ॥ उभे युद्धांत राहिले । निःसंदेही वीर भले । यांत सुख चालुनि आलें । तुका म्हणे कोणतें ॥ ४ ॥

**आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।**
**मातुलाः श्वशुराः पौत्राः स्यालाः संबन्धिनस्तथा ॥ ३४ ॥**

३२. गुरु पाहे श्रेष्ठ मातें । द्रोण नामें जो आम्रुतें । तैसें भीष्माचेंहि नातें । काय आजि बुडालें ॥ १ ॥ तात बापाचा जो आजा । चुलते पाहे अधोक्षजा[३३] । किती पुत्र महाराजा । मरों आजी टेंकले ॥ २ ॥ मायबंधु तोचि मामा । सासुऱ्याची हे प्रतिमा । लेक पुत्राचे जी आम्हां-। लागे दिसे मारणें ॥ ३ ॥ स्त्रीचे भाऊ हे शालक । तैसे सोयरे आणिक । तुका म्हणे जी कौतुक । वाटे मज देखुनी ॥ ४ ॥

**एतान् न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।**
**अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥**

३३. मीं यांसि हो जनार्दना । सहसा मारूं इच्छिना । नसे दुष्ट पै वासना । जन्मपणापासुनी ॥ १ ॥ हे जरी एक वेळे । मज मारितील बळें । तें मी न मनीं वोगळे[३४] । ऐसा हेत उदास ॥ २ ॥ स्वर्गलोक मृत्युलोक । पाताळीचे निवासक । झालों हीन आम्ही रंक । तेंच सुख आवडे ॥ ३ ॥ तेथें भुमी हे थोडकी । किती इचा हो पाड कीं । तुका वदेल द्वाड की । लोकीं ऐसे दिसेना ॥ ४ ॥

**निहत्य धार्तराष्ट्रान् नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।**
**पापमेवाश्रयेदस्मान् हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥**

---

३२. = खोटें. ३३. कृष्णा.
३४. 'तें मीं न मनीं वोळगे' ऐवजीं 'तें मीं नमी वोळे'—पाठ प्र. ४ व ६.

३४. वधोनि हे धार्तराष्ट्र । राया धृतराष्ट्राचे पुत्र । जनार्दना सिद्धिसूत्र । काय दिसे मी नेणें ॥ १ ॥ आह्मांलागूनि पाहतां । पापवांटाची आहता । भला नेमिला अनंता । लोकांमाजि निंद्य जो ॥ २ ॥ आततायीही करून । आलों मारूनि स्वजन । तुका वदेल भजन । कोण्या तोंडें आयकूं मीं ॥ ३ ॥

तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान् स्वबान्धवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

३५. यालागीं जगत्पती । यांसी मारावया चित्ती । वाढविली उपपत्ती । तें उगाच सुनाट ॥ १ ॥ आम्ही पांडव लोकीं मान्य । कर्म नाचरो अमान्य । योग्य नव्हे हें पैशुन्य । अंगी आंतलो ध्यावया ॥ २ ॥ होऊं स्वजनहत्तेनें । सुखी माधवा कैसेनें । तुका म्हणे श्रीकृपेनें । उणें आम्हां काय जी ॥ ३ ॥

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

३६. ते हे जरी न पाहाती । सारासार न्याय नीती । दृष्टी अंध लोभें होती । वशवर्ती कामाच्या ॥ १ ॥ आशा लागली द्रव्याची । अथवा पुत्र३५संततीची । तेथें सहज विवेकाची । मानमोड होतसे ॥ २ ॥ कुळ-हत्येंत जो दोष । मित्रद्रोहाचा विशेष । तुका म्हणे हो हें विष । दुष्ट घाली अन्नांत ॥ ३ ॥

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

३७. ज्याच्या भेणें साधन करीं । लंघने साधनें डोंगरीं । ज्यातें पाहतां कंसारी । तूं हातचा सूटसी ॥ १ ॥ तया पातकापासोनी । सुटों आम्ही हो कैसेनी । निंद्य कर्म आचरोनी । वंद्य होऊं हें कैसे ॥ २ ॥ जनार्दना विष खातां । कैचें अमरत्व आतां । जाणत व्याघ्रजाळीं जातां । भला कैसा

३५. 'पुत्र' ऐवजीं 'छत्र'—पाठ प्र. १.

नवाजी[३६] ॥ ३ ॥ तैसे कुळहत्येमाजी । दोषें पुण्य लोपे बा जी । तुका कैसेनी नवाजी[३७] । हें देखतां प्रत्यक्ष ॥ ४ ॥

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

३८. कुलक्षयेंच बुडती । सत्य जाणतां[३८] श्रीपती । मग त्या वृद्धी होती । अधर्माच्या अनंता ॥ १ ॥ कुलधर्मपरंपरा । केला विधीनें संसारा । त्याचा सहज मातेरा । हातें आमुच्या होतसे ॥ २ ॥ धर्मनाशें सर्व कूळ । वश अधर्मा सकळ । देखत अन्यायाचें फळ । लांचीव न्याय होतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे पार्थशब्दीं । देवा लागली समाधी । तेणें वचनें हीं कधीं । पैं गा नव्हती ऐकलीं ॥ ४ ॥

अधर्माभिभवात् कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

३९. देव न बोलेच कांही । तेणें भ्याला तो हृदयीं । काय महाराजा ठायीं । विचार जो येईल ॥ १ ॥ आम्ही जरी न बोलावें । तरी वाहावतो भवें । काढों[३९] न काढों स्वभावें । आम्हां टाहो फोडणें ॥ २ ॥ मग विनवी फाल्गुन । अधर्माच्या बळें जाण । दुष्ट कुलस्त्रिया पूर्ण । होती यांचा अनुभव ॥ ३ ॥ त्यांच्या दोषें यादवराजा । होती वर्णसंकर प्रजा । तुका म्हणे बीजा- । पासूनि ते अंकूर ॥ ४ ॥

संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥ ४२ ॥

---

३६. ‘ भला कैसा नवाजी ’ ऐवजीं ‘ आतां भला कैसेनी ’—पाठ प्र. ४ व ६.
३७. ‘ कैसेनि नवाजी ’ ऐवजीं ‘ म्हणे विनवाजी ’—पाठ प्र. ४ व ६.
३८. ‘ जाणतां ’ ऐवजीं ‘ जातानां ’—पाठ प्र. १.
३९. ‘ कोढों ’ ऐवजीं ‘ कोणी ’ —पाठ प्र. ४ व ६.

४०. त्या संकरें नरक प्रकारें अनेक । होती हा विवेक सर्वा ठावा ॥१॥ कुळघ्नांच्या कुळा लागे दोषज्वाळा । मग तो उन्हाळा खडखडीत ॥ २ ॥ पिंडोदकक्रिया लोपे देवराया । वोडंबरी[४०] वांया जाय जैसी ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व पूर्वजांसी च्यव* । जळीं भंगे नाव कोण तारी ॥ ४ ॥

**दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।**
**उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥**

४१. त्या दोषें त्या मग कुलघ्नांचे खग । उडवितां अंग टिकों नेदी ॥१॥ वर्णसकरसे[४१] अनंता होतसे । माजि कां न दिसे सार्थक जी ॥ २ ॥ बुडति जातिधर्म कुळवर्ण आश्रम । नुरे जेथें नाम आचाराचें ॥ ३ ॥ कुळधर्म खरे सांगूं मी किती रे । तुका म्हणे सारे खर बुडती ॥ ४ ॥

**उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।**
**नरके नियतं वासो भवतीत्युनुशुश्रुम ॥ ४४ ॥**

४२. गेले ज्याचे धर्म अधर्म हे शेष । काय त्या विशेष धर्म सांगूं[४२] ॥१॥ मनुष्याचें हित जनार्दना स्थित । होतें विरकळीत पापयोगें ॥ २ ॥ नरकीं निश्चय वास त्याचा होय । उद्धार न[४३] जाय जयापाशीं ॥ ३ ॥ तया गति ऐसी ऐकतों मवासी† । नको दशा तैशी तुका म्हणे ॥ ४ ॥

**अहो बत महत् पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।**
**यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥**

४३. महापापी पुरे आचरण खरें । त्रिभुवन विसरे जयालागीं ॥ १ ॥ कटकटा वोखटी बुद्धि हे नकटी । आम्हीं निश्चयापाठीं जिच्या बैसों ॥२॥

४०. = जादू, माया. ‘ वोडंबरी ’ ऐवजीं ‘ बोरंबरी ’—पाठ प्र. ४ व ६.
* = पतन, च्युति.
४१. ‘ वर्णसंकरसे ’ ऐवजीं ‘ सर्व संकरसे ’—पाठ प्र. ४ व ६.
४२. या चरणाऐवजीं ‘गेले ज्याचे वंश । धर्म हे अशेष । काय त्या विशेष । श्रम सांगूं ’—पाठ प्रत १.
४३. ‘ उद्धार न ’ ऐवजीं ‘ उद्धरत ’—पाठ प्रत १.
† = भटक्यांची किंवा लुटारूंची अवस्था.

कीं या राज्यलोभा टाळूं पुण्यस्तंभा। स्वजनवधारंभा प्रवर्तलों ॥ ३ ॥
तुका म्हणे क्रोध आलिया शिरच्छेद। किजे परी वेध नको ऐसा ॥ ४ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

४४. जरी मी निःशस्त्र उगा माझें गात्र। फाडिती हे अस्त्र घालूनियां ॥१॥ अवघे बरबाळे[४४] छेदो माझे गळे। परी मी नातळे विकल्पासी ॥२॥ कल्याण हें मज माझें दिसे आज। तुका म्हणे काज हेंचि बोले ॥ ३ ॥

संजय उवाच।

एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

४५. कुरुपतीलागीं संजय प्रसंगीं। वदे ती अवघी वार्ता ऐसी ॥ १ ॥ बोलोनी साकल्य पार्थिवा वैकल्य। ध्यावया कैवल्य वांछी शांती ॥ २ ॥ बाणेसी कमान हातीची सोडून। उगा तो आपण स्वस्थ बैसे ॥ ३ ॥ शोकें जाजावला विव्हळ चित्ताला। मोहें कवळिला तुका म्हणे ॥ ४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अर्जुनविषादो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

इति श्रीगीता अभंग प्रथमोध्याय:। श्रीकृष्णार्पणमस्तु ॥[४५]

४४. = सगळे.
४५. प्रत १.

## ॥ अथ द्वितीयोऽध्यायः ॥

### — सांख्ययोग —

श्रीभगवद्गीता अभंगात्मक—द्वितीय प्रसंग[४६]

**संजय उवाच ।**

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

४६. श्रीगुरु व्यासाचा शिष्य सद्विद्येचा । धृतराष्ट्र देवाचा[४७] तोषदानी ॥ १ ॥ बोले राया देव उघड अपूर्व । तरी हें वैभव भोक्ता होसी ॥ २ ॥ कृपेनें व्यापिला सांडित अश्रुला । येथें पार्थ भ्याला विषादानें ॥ ३ ॥ मग मधुरिपु शांतवी अमुपू । शांत व्हाया वपू तुका म्हणे ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**

४७. बोले भगवान योग्या जो निधान । कैसें कश्मलपण[४८] तुज आलें ॥ १ ॥ उदेलें विषमीं न लागे सत्कर्मा । जेणें राहावें धामीं अकीर्तिच्या ॥२॥ नरकासी जोडिसी हें दिसे आम्हासी । त्यागीं बुद्धि ऐसी तुका म्हणे ॥ ३ ॥

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत् त्वय्युपपद्यते ।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

---

४६. प्रत १.

४७. ‘ देवाचा ’ ऐवजीं ‘ खेदाचा ’—पाठ प्र. १.

४८. = चित्ताचें मालिन्य.

४८. पार्था षंढ होणें नको लाजिरवाणें । तुज पूर्णपणें बाधक जें ॥ १ ॥ द्वाड हे कल्पना तुज जी साजेना । तुच्छ त्यागी रणालागी ऊठ ॥ २ ॥ लंडीपण परंतपा हें त्यागीं पां । मार्ग धरी सोपा वडिलांचा ॥ ३ ॥ तुका म्हणे देवो बोलतां सद्भावो । वदे महाभावो पुढें ऐका ॥ ४ ॥

अर्जुन उवाच ।

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

४९. कैसा भीष्मद्रोणा भांडो जगज्जीवना । ज्यांसी बोलवेना विपरीत ॥ १ ॥ त्यांसी बाण वरी[४९] वर्षोनीं समरी । पाडूं धरेवरी घडे कैसे ॥ २ ॥ तुका म्हणे माया जीवीं झोंबलियां । विसरला क्रिया कौरवांच्या ॥ ३ ॥

गुरूनहत्वा हि महानुभावा-
ञ्छ्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव
भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

५०. न मीं मारी गा या वडिलां गुरूतें । भिक्षा खाणें माते श्रेय वाटे ॥ १ ॥ द्रव्यलोभें घात करावया लोकीं । जेणें सर्वां मुखीं निंद्य व्हावें ॥ २ ॥ यांच्या रक्तें भोग माखुनी भोगावे । भक्षी मांसासवें मद्य जैसे ॥ ३ ॥ नको रे दयाळा घालूं या अकर्मी । सुखी तुझे नामीं तुका म्हणे ॥ ४ ॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो
यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषाम
स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

५१. आम्ही जिंकूं बरें[५०] तेंचि आम्हा देवा । किंवा मेल्या जीवा मोक्षपद[५१] ॥ १ ॥ दोन्ही मार्ग त्यागें जरी मारूं यांसी । तथापि प्राणासी

---

४९. ' वरी ' ऐवजीं ' बरी '—पाठ प्र. १ व २.
५०. ' बरें ' ऐवजीं ' जर '—पाठ प्र. ६.

चिरंजीव[५१] ॥ २ ॥ वांचों बहू काळ वंशवृद्धि करूं । न इच्छूं वेव्हारू तुका म्हणे ॥ ३ ॥

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥**

५२. या धर्माच्या भ्रमें[५२] बुद्धिमूढ झालों । तुज शरण आलों जगदीशा ॥ १ ॥ श्रीरंगा कल्याण ज्यांमाजि असेल । तोचि वदे बोल आदराचा ॥ २ ॥ स्वामी तूं सद्गुरु शिष्य मी तुमचा । धारक शिक्षेचा तुका म्हणे ॥ ३ ॥

**न हि प्रपश्यामि ममापनुद्या-**
**द्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं**
**राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥**

५३. न तें दिसे कांहीं मम शोकनाशक । जो शोक शोषक इंद्रियांसी ॥ १ ॥ समृद्धि राज्याची त्रिदशेन्द्रलक्ष्मी । पावेन तरी मी सुखी नव्हे ॥२॥ तुका तेव्हां[५३] विनवी अगा पुरुषोत्तमा । बोलतो ते क्षमा अपराध ॥ ३ ॥

**संजय उवाच ।**
**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः ।**
**न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥**

५४. संजय म्हणे राया हृषीकेशाप्रती । केली हे विनंती गुडाकेशें ॥ १ ॥ शेवटीं वचन हेंचि बोले पार्थ । युद्ध आत्मस्वार्थ न करी मी ॥ २ ॥ गोविंदाचे पदीं ठेविला मस्तक । जन्माचें सार्थक तुका म्हणे ॥ ३ ॥

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥**

---

५१. 'पद' ऐवजीं ' असे ' व ' चिरंजीव ' ऐवजीं ' चिरंतन '—पाठ प्र.१.
५२. ' भ्रमें ' ऐवजीं ' श्रमें '—पाठ प्र. १.
५३. ' तेव्हां ' ऐवजीं ' दास '—पाठ प्र. ४ व ६.

५५. त्यातें हृषीकेश हांसोनि बोलिला । विस्मयें दाटला[५४] अभ्यंतरीं ॥ १ ॥ विषाद जाणोनि कळवळिला हरि । बोलेचि उद्धरी संशयातें ॥ २ ॥ सैन्यद्वयांमाजि संवादती दोघे । तुका म्हणे जगा तारावया ॥ ३ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥**

५६. मेघगंभीर रवें बोले रमानाथ । अयोग्य हा पंथ शोक दिसे ॥१॥ आम्ही जें बोलावें तें तंव राहीलें । पांडित्य निघालें तुम्हांपून ॥ २ ॥ पांडित्य बोलसी शोकही करिसी । परि गा नेणसी निज हित ॥ ३ ॥ मेल्याजित्यामाजीं शोका नेदी चित्त । तो मान्य पंडित तुका म्हणे ॥ ४ ॥

**न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

५७. कधीं कोणे काळीं न होतों जी आम्ही । येथें कधीं तुम्ही नसाल कीं ॥ १ ॥ हे राजे ह्या सेना ऐसे आप्तवर्ग । नव्हता प्रसंग समराचा ॥ २ ॥ पुढें नाश झाल्या कांहींच[५५] उरेना । सृष्टीची रचना जाते क्षया[५६] ॥ ३ ॥ तुका म्हणे देव अनादि सांगतो । नित्याचे वर्णितो खेळचि हा[५७] ॥ ४ ॥

**देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

५८. जीवास शरिरीं जैसें बाळपण । सर्वेचि तारुण्य[५८] अवस्था हे ॥ १ ॥ पुढें तैसे वृद्ध गळे देहशक्ती । पुढें मृत्युप्राप्ती ठेविलीसे ॥ २ ॥

५४. ‘ दाटला ’ ऐवजीं ‘ लादला ’—पाठ. प्र. १.
५५. ‘ कांहींच ’ ऐवजीं ‘ कोणीच ’—पाठ प्र. ४, ५ व ६.
५६. या चरणा ऐवजीं ‘ सृष्टि हे स्वतां जाय क्षया ’—पाठ प्र. ४.
५७. ‘ खेळचि ’ ऐवजीं ‘ सकळ ’—पाठ प्र. ४ व ‘ खळचि ’–पाठ प्र. ६.
५८. ‘ तारुण्य ’ ऐवजीं ‘ तरुण ’—पाठ प्र. १ व २.

पुन्हां यम जाची पुन्हां जन्मा येणें । हें घडे रीतीनें अचुक कीं ॥ ३ ॥ तैसी देहांतर प्राप्ती ओळखावी । मोहेना पदवी धैर्ये तुकीं[५९] ॥ ४ ॥

**मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

५९. ऐके आतां पार्था सुख दुःख दोन । देती[६०] विषयपान करणा जेव्हां ॥ १ ॥ याच लागीं नाश उत्पत्ती सोसावी । भारता ऐकावी नीति माझी ॥ २ ॥ तुका म्हणे देवो एक गूज सांगे । जेणें साधु अंगें पावे खुणा[६१] ॥ ३ ॥

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

६०. पै गा न देतील व्यथा । जया पुरुषा समर्था ॥ १ ॥ सम भावना आरंभा । उत्तम नगरी पुरुर्षभा ॥ २ ॥ दुःखी सुखी एक भावो । तोच मोक्षपुरी रावो ॥ ३ ॥ आणिक सांगणें तें कांही । तुका वदे उरलें नाहीं ॥ ४ ॥

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥**

६१. असद्देह न जो नित्य । जीव सन्न तो अनित्य ॥ १ ॥ दोहींचें तत्त्व या दोंत । ब्रह्म देख तत्त्वज्ञांत ॥ २ ॥ तुका करितो प्रार्थना । ज्ञणी म्हणाल उमजेना ॥ ३ ॥

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति ॥ १७ ॥**

---

५९. 'तुकीं' ऐवजीं 'तुका'—पाठ प्र. ४ व ६.
६०. 'देती' ऐवजीं 'देतो'—पाठ प्र. ४ व ६.
६१. 'खुणा' ऐवजीं 'खून'—पाठ प्र. ४.

६२. नाशरहित जाण तेची। जगत्रयीं सत्ता त्याची ॥१॥ वार्ता तयाची कोणाला। नसे ठाऊकी जनाला ॥ २ ॥ त्याचा नाश या जीवानें। नव्हे कोटीही साधनें ॥ ३ ॥ मग शोक अविनाशाचा[६२]। तुका म्हणे मिथ्या वाचा ॥ ४ ॥

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

६३. देह नाशवंत पुरे। जीवज्ञान साचोकारे ॥ १ ॥ अंश ब्रह्माचा तो नित्य। नव्हे कधींही असत्य ॥ २ ॥ अविनाशी अप्रमेयें। जाणुनि युद्ध करी स्वयें ॥ ३ ॥ तुका म्हणे हा विकल्प। धरिल्या बाधील गा पाप ॥४॥

य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम्।
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ १९ ॥

६४. भेदवादी यांचें मत। मारी म्हणती ते नेमांत[६३] ॥ १ ॥ चार्वाकांचें ज्ञान खोटें। मेले म्हणती अवचटें ॥ २ ॥ परी नेणती दोघेही। न तो मारी मरे कांहीं ॥ ३ ॥ तुका विनवितो संतां। चित्त देणें अपूर्वता ॥ ४ ॥

न जायते म्रियते वा कदाचि-
न्नायं भूत्वा भविता वा न भूयः।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो
न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥

६५. नव्हे जन्मची जयासी। तया मृत्यु केवीं ग्रासी ॥ १ ॥ कधीं देहाचे संगती। नेणें येणेजाण्याप्रती ॥ २ ॥ देहासंगे असतांनाही। हेंची त्याचें नवल पाहीं ॥ ३ ॥ अज नित्य शाश्वत तो। देहीं दृश्यें गवसेना तो[६४] ॥ ४ ॥ मारितांही मारवेना। तुका म्हणे या पुराणा ॥ ५ ॥

---

६२. ' अविनाशाचा ' ऐवजीं ' त्या नाशाचा '—पाठ प्र. १.
६३. ' नेमांत ' ऐवजीं ' मनांत '—पाठ प्र. ६.

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥**

६६. पूर्वोक्त याच्या लक्षणा । पुरुष जाणें विचक्षणा ॥ १ ॥ येऱ्हवीं या प्रकृतीला । मारी कोण वेगळाला ॥ २ ॥ मारवितो[६५] कैसा आतां । तुका विनवितो श्रोतां ॥ ३ ॥

**वासांसि जीर्णानि यथा विहाय**
**नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णा-**
**न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥**

६७. वस्त्रें जुनीं त्यागुनीयां । नवीं घेणें पांघराया ॥ १ ॥ शरीराचे तेच भावें । येथें चैतन्यें वागावें ॥ २ ॥ जीर्ण देहत्यागें दुजा । तुका म्हणे याच काजा ॥ ३ ॥

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥**

६८. याला न तोडीती शस्त्रें । वन्हि जाळी ना शिखाग्रें ॥ १ ॥ न पाणी बुडवी यासी । वायु न उडवी बळेंसी ॥ २ ॥ शुष्क वातें अणुगर्भू । हा तो नित्यच स्वयंभू[६६] ॥ ३ ॥ सत्तामात्रें या निराळा । तुका म्हणे धन्य कळा ॥ ४ ॥

**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥**

६९. छेदावया न हा योग्य । यत्न अग्नीचा अयोग्य[६७] ॥ १ ॥ नसे सुकला हा कधीं । भिजला नाहीं काय बाधी ॥ २ ॥ स्थाणुपरी स्थिर

---

६४. या चरणाऐवजीं ‘ देह दृश्य न गवसे जो ’—पाठ प्र. १.

६५. ‘ मारवितो ’ ऐवजीं ‘ मारितो ’—पाठ प्र. २, ४ व ६.

६६. या पादाऐवजीं ‘ हा तो नित्यानी स्वयंभ ’—पाठ प्र. १.

६७. या चरणाऐवजीं ‘ छेदादाहा न हा योग्य । प्रेत्न पुज्याचा अयोग्य ’ —पाठ प्र. १ व ५.

सर्वी । नित्याचल भरली उर्वी ॥ ३ ॥ अचंचळ रूप ज्याचें । तुकया ध्यान लागे त्याचें ॥ ४ ॥

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

७०. ज्यासी आकारची नाहीं । त्याचें चिंतन तें कांई ॥ १ ॥ जेथें द्वैत हें शिरेना । निर्विकार हेंचि जाणा ॥ २ ॥ त्या कारणें यासि असे । शोक न करीं मानसें ॥ ३ ॥ केला शोक फळ काय । तुका म्हणे वायां जाय ॥ ४ ॥

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

७१. आतां देहासवें होतों । जरि मरतो मानिशी ॥ १ ॥ तरी तुज महाबाहो । शोकाग्रहो नसावा ॥ २ ॥ सर्व जाणतयांच्या राया । पाहे हृदया शोधोनी ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपावंता । दासाचिंता तुज आहे ॥ ४ ॥

**जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

७२. जन्मा आलिया मरण । टाळी कोण अर्जुना ॥ १ ॥ मृत्युपाठीं लागे जन्म । कोण नेम ढांसळी ॥ २ ॥ परिहारा जे विरहित । नेदी चित्त त्या शोकीं ॥ ३ ॥ तुका म्हणे जें अयोग्य । होय भोग्य कोठोनी ॥ ४ ॥

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥**

७३. भूतजाति आदि एक । प्रकाशक अव्यक्त ॥ १ ॥ मध्य व्यक्त याचा भाव । जो स्वभाव मृगजळीं ॥ २ ॥ लय अव्यक्तीं नेमिला । खेद आला तुज कैसा ॥ ३ ॥ उगी त्याचीच[६८] वेदना । तुकया ध्यानां ते न ये ॥४॥

६८. ' त्याचीच ' ऐवजीं ' त्या चित्त '—पाठ प्र. ४ व ६.

**आश्चर्यवत् पश्यति कश्चिदेन-**
**माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति**
**श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ।। २९ ॥**

**७४.** कोणी पाहाती आश्चर्ये । निज धर्मे[६९] साटोपें ॥ १ ॥ कोणि आश्चर्य या बोलिलें । निकें भलें मन देती ॥ २ ॥ कोणि आश्चर्य या ऐकें । वार्ता पिके मोक्षाची ॥ ३ ॥ कोणि नेणती ऐकोनी । ऐसी काहाणी म्हणे तुका ॥ ४ ॥

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात् सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ।। ३० ॥**

**७५.** देहधारी न हा बध्य[७०] । जो अवध्य[७०] यमासी ॥ १ ॥ सर्व देहांत भारता । पूर्ण सत्ता चिन्मय ॥ २ ॥ भूतें तरी नाशवंत । खेद करीत कशाचा ॥ ३ ॥ नव्हेसि अर्जुना तूं योग्य । भव आरोग्य तुकया ॥ ४ ॥

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत् क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥**

**७६.** स्वधर्म पाहोनि कृपा । आली बापा ये वेळे ॥ १ ॥ तरि हे योग्य नव्हे दया । पतनीं काया घालील ॥ २ ॥ धर्मयुद्धा रे वांचुनी । श्रेय ये स्थानीं दिसे ना ॥ ३ ॥ क्षत्रियाचे क्षात्रधर्म । तुका वर्म निवेदी ॥ ४ ॥

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ।। ३२ ।।**

**७७.** अर्जिल्याविण झालें हे । पुरत्या पाहे दृष्टीनें ॥ १ ॥ द्वार उघडें स्वर्गाचें । भाग्य साचें म्हणोनी ॥ २ ॥ सुखी निर्भय तें ऐसें । क्षत्रिय हर्षे रणांगणीं ॥ ३ ॥ लाभ म्हणे तुका त्याला । हाच आला जन्माचा ॥ ४ ॥

---

६९. ' धर्मे ' ऐवजीं ' धैर्ये '—पाठ प्र. १.

७०. 'बध्य' ऐवजीं 'बद्ध' व 'अवध्य' ऐवजीं 'अबुद्ध'—पाठ प्र. ४ व ६.

**अथ चेत् त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ।। ३३ ।।**

७८. आतां याच धर्मयुद्धीं । दृढबुद्धि सोडिली ॥ १ ॥ न मांडणें म्हणूनियां । छंद वांया घेतला ॥ २ ॥ तरी सत्कीर्ति जाऊनी । निंदा जनीं पावसी ॥ ३ ॥ तुका म्हणे आनंदती । पाप हातीं घरलिया ॥ ४ ॥

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

७९. तुझी अपकीर्ति लोक । हे चंद्रार्क वाणिती ॥ १ ॥ पुरुष जो कीर्तिमान्य । त्या अमान्य हे गोष्टी ॥ २ ॥ मरण बरें एक वेळां । परि जिव्हाळा हा खोटा ॥ ३ ॥ तुका म्हणे जेथें निंद्य । तेथें वंद्य होईना ॥ ४ ॥

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥**

८०. भयें गेलारे पळाला । पार्थ म्याला आम्हांसी ॥ १ ॥ हांसतील महारथी । अर्थस्वार्थी नाडू हा ॥ २ ॥ महारथी नाम तुझें । सांडेल ओझें ब्रीदाचें ॥ ३ ॥ तुका याच पंथे मान्य । घेसी अन्य लाघव ॥ ४ ॥

**अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः ।**
**निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ।। ३६ ।।**

८१. बोलों नये ते ते बोल । शस्त्रें खोल भेदिती ॥ १ ॥ बहु रिपु पार्था तुज । देती लाज मनस्वी ॥ २ ॥ प्रताप तो निखंडुनी । विटंबणी चाळिती ॥ ३ ॥ दुःख कोण परतें । जें तुकयातें सुख दे ॥ ४ ॥

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ।। ३७ ॥**

८२. मेल्या येथें स्वर्गवास । हा तो मांडिला[७१] उल्हास । आला वांटा स्वकर्मास । तो कोणास भंगेना ॥ १ ॥ नाहीं तरी भुजातेजें । जिंकलिया

७१. ‘ मांडिला ’ ऐवजीं ‘ मोडिला ’—पाठ प्र. ४ व ६.

कुरुराजें । भूमंडळींचें भोगिजे । सर्व सुख नित्यानी ॥ २ ॥ ययालागी शोक त्यागी । उठें धैर्यबळें अंगी । झुंझावया सेलमार्गी । अधिकारी तूं होई ॥ ३ ॥ तुका म्हणे भुमीभार । उतराया हा निर्धार । यास्तव अनुभवसार । देवो त्यास निवेदी ॥ ४ ॥

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

८३. प्रीति धरिल्या जें पावे । सुख तेथें गा संभवे । विषय वियोगीं हेलावे । दुःखार्णव लहरी ॥ १ ॥ दोहीं समबुद्धि धरी । लाभालाभ तया सरी । मग तूं सुखें युद्ध करी । पाप माथा आदळे ना ॥ २ ॥ निर्विकल्प तो निःसंगु । निःसंगीच अनुरागु । तुका म्हणे चांगु । निज मोक्ष आतुडे ॥ ३ ॥

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धियोगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

८४. बोलिलों येथें अर्जुना । सांख्यबुद्धि हेंचि जाणा । सर्वाविशीं तूं देखणा । हित घेई आपुलें ॥ १ ॥ योगीं बुद्धि धनुर्धरा । जींत बहुतसे विचारा । त्यांत देई कर्णद्वारा । जें स्वहित सर्वांचें ॥ २ ॥ अहो प्रत्यक्ष कर्मयोग । योगी ईचा अंतरंग । धुवंगनें घेणें जग । तारावया बुद्धीते ॥ ३ ॥ आतां तिच्या संगतीनें । कर्मबंधें मुक्त होणें । तुका म्हणे सावधपणें । बुद्धिवंतें ऐकावी ॥ ४ ॥

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

८५. विघ्नें छळितां आपूर्ण । दिसों येतें येथें गौण । मिथ्या प्रत्यवायपण । नास्तिकत्वें उडेल ॥ १ ॥ महा भयातेंही नाशी । भूतां जेविं देवलसी । किजे स्वल्प ईश्वरासी । अर्पिल्याचें हें फळ ॥ २ ॥ तुका म्हणे दीनानाथ । हीन दीन पाहुनी पार्थ । दया करोनी परमार्थ । हातीं त्याच्या देतसे ॥ ३ ॥

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन ।**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥**

८६. निश्चयाची एक बुद्धि । जे कां वारक उपाधी । यया मार्गामधीं । ऐके कुरुनंदना ॥ १ ॥ बहु शाखा भवरुखा । छाया[७२] शीतल स्वात्मिका । जे तें अनंत कामुका । बुजवणी जाहली ॥ २ ॥ तुका म्हणे बुद्धियोगें । साधक तरती निजांगें । कोणी कुबुद्धि कुसंगें । प्राणीमात्र बुडाले ॥ ३ ॥

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥**

८७. गूढ[७३] उद्बोधनी प्रीती । वेदीं गर्जीन्नल्या श्रुती । साधन योगाच्या हातीं । स्वर्गफूल अर्पिती ॥ १ ॥ चाळवले[७४] बहू गेले । मुखीं[७४] फळ तें मानिलें । ते वेदवादीं रतले । नाहीं पाहिले अनुभव ॥ २ ॥ स्वर्गापरतें नाही सुख । ऐसे पावले मूढ देख । तुका देवापासी सुख । अक्षयाचें मागत ॥ ३ ॥

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

८८. थोरां कर्म साध्य धनें । जन साधिती साधनें । नावेक हो त्या मार्गानें । द्विजवृंदें चालिली ॥ १ ॥ भोगभोग्यगती अशा । मत्स्य लुब्ध गळामिषा । स्वर्गपर पै दुराशा । जन्मकर्म फलद्रूप ॥ २ ॥ तुका म्हणे वासनेला । भोग गोडी अशेषाला । सुख जाय मग शोकाला । प्राप्त होणें अखंड ॥ ३ ॥

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

---

७२. ' छाया ' ऐवजीं ' द्याया '—पाठ प्र. १.

७३. ' गूढ ' ऐवजीं ' मूढ '—पाठ प्र. १.

७४. ' मुखीं ' ऐवजी ' मुखीं ' व ' चाळविलें ' ऐवजीं ' लाचांवले '—पाठ प्र. १, २, ५.

८९. भोगाभ्यासें भाग्य दिसे । सक्त होईल मानसें । जैसे सकामासी पिसें । पैं नारीचें लागलें ॥ १ ॥ हरिली कामनेनें बुद्धी । उरों नेदी आत्मशुद्धी । हिंवें पीडिला तो कधीं । प्रावरणासी सोडीना ॥ २ ॥ मग समता समाधींत । बुद्धी घालूं नेदी हात । तुका म्हणे प्रेत । काय जाणे अमृता ॥ ४ ॥

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥**

९०. कामिक चित्ताचें रंजन । वेद बोलला वचन । परि विषय ते सान । मानितांचि पोसती ॥ १ ॥ पार्था निष्काम होय तूं । माझें वाक्य धरूनी तूं । जैसा निर्द्वंद्व निश्चितू । नित्य सत्त्व न सोडी ॥ २ ॥ आत्मवेत्ता होऊनियां । त्यागीं काल्पनिक माया । तुका म्हणे काया । काळ जैसा सांडवी ॥ ३ ॥

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान् सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

९१. स्वल्पोदकीं जें जें कार्य पैं उपजे । तें तेंच निपजे डोहामाजी ॥ १ ॥ वेदिं क्रिया काम्य उद्भवे नियम्य । तें तें घडे साम्य ब्रह्मबोधीं ॥ २ ॥ ब्रम्हीं जो ब्रह्मज्ञ सुखी तो सर्वज्ञ । तुका म्हणे प्राज्ञ पुढें ऐका ॥ ३ ॥

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

९२. अधिकार तूंतें कर्मी आहे पार्था । परि न सर्वथा फळीं त्यांच्या ॥ १ ॥ कंटाळून जरी त्याग कर्मी धरी । ते या धरेवरी अयोग्य कीं ॥ २ ॥ झणीं फळ आशा धरिसी वीरेशा । तुका म्हणे नाशा कारण हें ॥ ३ ॥

**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

९३. सिद्धि गेलें कर्म तरी ना संभ्रम । आणि उणे परम[७५] जाचूं नेदी ॥ १ ॥ ऐसें करी चित्त कर्म आचरत । फळीं त्याचा हेत न ठेऊनी ॥ २ ॥ योगस्थ करावें समत्वीं भरावें । तुका म्हणे व्हावें जीवन्मुक्त ॥ ३ ॥

---

७५. ' उणे परम ' ऐवजीं ' उपोपरम '—पाठ प्र. ४ व ६.

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ।। ४९ ।।**

९४. बुद्धियोगाहून कर्मयोग सान । धनंजया ज्ञान बुझें ऐसें ।। १ ।। पाहे रक्षक या बुद्धि कुरुराया । तुच्छ कर्में तूं या टाकी फळें ।। २ ।। प्रतीतीवांचुनी भांबावले ज्ञानी । तुका म्हणे जनीं आटाआटी ।। ३ ।।

**बुद्धियुक्तोजहातीह उभे सुकृतदुष्कृते ।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ।। ५० ।।**

९५. जितो पापपुण्य नाशी बुद्धिगण्य । ज्याची पै अगण्य सद्वासना ।। १ ।। म्हणोनि पांडवा बुद्धियोग घ्यावा । कर्मी अनुभवावा कुशलत्वें ।। २ ।। येणें मार्गें जाणें कर्मासी तोडणें । आनंद भोगणें म्हणे तुका ।। ३ ।।

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ।। ५१ ।।**

९६. शास्त्रज्ञ जे बुद्धियुक्त पैं विशुद्धी । कर्मफळ विधी सोडूनियां ।। १ ।। प्रपंचबंधन विवेकें तोडून । पावती निर्वाण निर्दोषिक ।। २ ।। तुका म्हणे देवज्ञानाचा अनुभव[७६] । सुगम हे ठेव साधकाची ।। ३ ।।

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ।। ५२ ।।**

९७. अज्ञान मोहमये व्याप्तचित्त स्वयें । तेव्हां तेज पाहे तेच बुद्धि ।। १ ।। मग श्रुताश्रुत भोगाची प्रतीत । झाल्या प्राप्त होत वैराग्य तें ।। २ ।। तुका म्हणे प्राण पश्चातापाविण । न देखें निर्गुण वैराग्य तें ।। ३ ।।

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ।। ५३ ।।**

९८. फळांच्या श्रवणें तव बुद्धि शिणे । तणें मळवणें निरंतर ।। १ ।। तें शुद्ध व्हावया समाधि आलियां । जेव्हां कां विसांव्या बुद्धि येते ।। २ ।।

---

७६. ' देवज्ञानाचा अनुभव ' ऐवजीं ' वांछी ज्ञानानुभव '—पाठ प्र.१व५.

तेव्हां तूं पावसी माझिया योगासी । देव अर्जुनासी ऐसें बोले ॥ ३ ॥ ऐकावया चित्त एकाग्र मारुत । तुका म्हणे मात धन्य झाली ॥ ४ ॥

**अर्जुन उवाच ।**

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥**

९९. बोले पंडुपुत्र देवासी उत्तर। सांगा कोण नर स्थितप्रज्ञ ॥१॥ जो कां समाधिस्थ सर्वदा नेमस्त । केशवा प्रशस्त बोलावें जी ॥ २ ॥ वागतो या जगीं कैसा हो प्रसंगीं । तुका म्हणे उगी निगी[७७] कैसी ॥ ३ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

१००. अगा ये अर्जुना सावधान मना । जेणें या कामना टाकियेल्या ॥ १ ॥ स्वरूपीं मानस तोषलें सुरस । निधि पायाळास तया रीती ॥ २ ॥ स्थितप्रज्ञ तोचि म्हणूं सव्यसाची । समाधी जयाची अखंडीत ॥ ३ ॥ आनंदें भरित सर्वकाळ चित्त । तुका म्हणे स्थितप्रज्ञ ऐसा ॥ ४ ॥

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

१०१. न दुःख मानसीं उद्विग्न होईना । सुखहि वांछीना श्रम सोसे ॥ १ ॥ आस्था न धरीच असोनियां जनीं । कामक्रोध मनीं भयातीत ॥ २ ॥ स्थितबुद्धि मुनि तयासी म्हणावें । तुका म्हणे पावे महा सुख ॥ ३ ॥

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत् प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

१०२. सर्वां देहीं प्राण समान त्या परी । नाठवे अंतरीं गुण दोष ॥ १ ॥ बऱ्या वाईटाचा घेतो अनुभव । होऊं नेदी जीव कासावीस ॥ २ ॥ मुखें उच्चारीना तोचि प्रज्ञावंत । प्रतिष्ठा पावत म्हणे तुका ॥ ३ ॥

---

७७. = आचारविचार; वर्तणूक.

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥**

१०३. कूर्म जैसा भाग रोधी शरीराचा । तैसा इंद्रियाचा मेळू धरी ॥ १ ॥ आवरोनी असे ऐसा जो योगीया । प्रज्ञा त्याची तया प्रतिष्ठिता ॥ २ ॥ पर्वकाळीं दान सुकृत दात्याचें । तैसे प्रपंचाचें तुका मानी ॥ ३ ॥

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

१०४. योगी वीतरागी त्याचें एक मन । भोग नसतां जाण वासना हे ॥ १ ॥ जरी असे तरी ब्रह्मात्मदर्शनीं । मुक्त तेथें ज्ञानी होऊं सरती ॥ २ ॥ तुका म्हणे मन झालीया निश्चळ । तेंचि तें केवळ परब्रह्म ॥ ३ ॥

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

१०५. आत्मज्ञानी नर जो पूर्ण प्रयत्नीं । कौंतेया जो ध्यानीं माझ्या रूपीं ॥ १ ॥ परि इंद्रियांसी विसावला जरी । तरी ते अघोरीं घालतील ॥ २ ॥ तुका म्हणे मन इंद्रियांस्वाधीन । म्हणोनि साधन विघ्न पावे ॥ ३ ॥

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

१०६. तया मनालागीं आवरोनी असे । युक्त राजतसे मत्पर जो ॥ १ ॥ इंद्रियें हीं वश ज्याला पै असती । त्याची प्रतिष्ठिती प्रज्ञा होय ॥ २ ॥ तुका म्हणे येथें कुसंग नसावा । तेणेंच पावावा निज मोक्ष ॥ ३ ॥

**ध्यायतो विषयान् पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।**
**सङ्गात् संजायते कामः कामात् क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**

१०७. चिंती विषय त्याला उपजे हे वासना । भोग हा पुरेना विषयांचा ॥ १ ॥ तो या कामालागीं उत्पन्न करीतो । काम तो निर्मितो क्रोधरूपा ॥ २ ॥ तुका म्हणे बीजापासूनि अंकुर । होतो हा विस्तार याच परी ॥ ३ ॥

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात् स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥ ६३ ॥

१०८. क्रोधें देहात्मता बुद्धि हे उपजे । मोहें कवळिजे अंतःकर्ण ॥ १ ॥ तेथुनियां आत्मस्मृतिभ्रंश जाण । स्मृतिभ्रंशें जाण[७८] बुद्धिनाश ॥ २ ॥ मग तेथूनियां पूर्ववत मूढ । होतसे सदृढ म्हणे तुका ॥ ३ ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

१०९. रागद्वेषावीण इंद्रियें स्वाधीन । तरी तेणें मन सोडवेना ॥ १ ॥ घेतसे विषय परि विशुद्धात्मा । प्रसादीं महिमा पावेल तो ॥ २ ॥ हरिहरा मन जें झालें अर्पण । तुका म्हणे पूर्ण प्रसाद तो ॥ ३ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

११०. प्रसादें याचिया सर्व दुःखनाश । पावे अविनाश महा सुख ॥ १ ॥ प्रसन्न ते बुद्धि चित्ताची आयती । पावे तो महती प्रतिष्ठेची ॥ २ ॥ शीघ्र तया सर्व लाभे महा लाभ । तुका म्हणे स्तंभ सुकृताचा ॥ ३ ॥

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

१११. अयुक्त जो त्याला नसे बुद्धि पार्था । ध्यानाचिया पंथा जावो नेणें ॥ १ ॥ ध्यान नाहीं तेथें शांति हे वसेना । सुख आढळेना अशांतासी ॥ २ ॥ तळमळी चित्त कैचें त्याचें हित । तुका म्हणे अंत सद्विद्येसी ॥ ३ ॥

---

७८. 'जाण' ऐवजीं 'मन'—पाठ प्र. ४.

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥

११२. इंद्रियें वर्तती जे कां । मना देती मोकळिका ॥ १ ॥ तयाची रे मग बुद्धी । हरोनि नेत देहशुद्धी ॥ २ ॥ वारा लागलिया नाव । पावो नेणें पैल ठाव ॥ ३ ॥ तुका म्हणे साधकानें । बोध मानिजे सुखानें ॥ ४ ॥

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

११३. अहो तस्मात इंद्रियें । सर्व ज्याचीं मनोमयें ॥ १ ॥ विषयांपासोनी । जो बैसला आटोपुनी ॥ २ ॥ महाबाहो प्रज्ञा त्याची । महिमा पावे प्रतिष्ठेची ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां । लाभ घेणें सावध श्रोतां ॥ ४ ॥

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

११४. ब्रह्मीं लीन त्याची राती । जेथें लोक हे वागती ॥ १ ॥ जागा जेथें साधु राहे । तेथें लोक झोपीं जाये ॥ २ ॥ विषयीं सावध जन । तेथें याचें भ्रांत मन ॥ ३ ॥ तुका विनवी थोडिये । सुख जोडणें जोडिये ॥ ४ ॥

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं
समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत् कामा यं प्रविशन्ति सर्वे
स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥

११५. नाना उदकश्राव । पाहे समुद्राचा[७९] ठाव ॥ १ ॥ तरी मर्यादा न सांडी । पृथ्वी राखितो कोरडी ॥ २ ॥ तैसे भोग भोगी सारे । मस्त नोहे अविचारें ॥ ३ ॥ निष्कामाचें पावे फळ । जरी कुटुंबी केवळ ॥ ४ ॥ शांति बाणे त्याचे अंगीं । शिव वेष्टित भुजंगीं ॥ ५ ॥ अविश्रम ते पदवी । तुकया समचि भोगावी ॥ ६ ॥

---

७९. 'समुद्राचा' ऐवजीं 'उदकाचा'—पाठ प्र. १.

**विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ।। ७१ ॥**

**११६.** सर्व भोग विषयाचे । सुख थुंकुनी कामाचे ॥ १ ॥ भोग भोगी निःस्पृहाचे । आत्मानंद पदवीचे ॥ २ ॥ परि मीं आणि माझें । दोनी नातळती वोझें ॥ ३ ॥ ज्ञानी शांतीस पावतो । तुका म्हणे मम गुरु तो ॥ ४ ॥

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।**
**स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ।। ७२ ॥**

**११७.** हे तो ब्रम्हीची राहाटी । पाहे पार्था ज्ञानदिठीं ॥ १ ॥ इचें घर पावलिया । मोह शिवे ना हृदया ॥ २ ॥ अंत झाला ईच्या संगीं । सायुज्यास पावे अंगीं ॥ ३ ॥ तुका म्हणे वाट । केली सुलभ ते नीट ॥४॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ २ ॥**

इति श्री अभंग द्वितीय प्रसंगः॥४६

॥ अथ तृतीयोऽध्यायः ॥

## — कर्मयोग —

श्रीमद्भगवद्गीता अभंगात्मक तृतियोध्याय[४६]

**अर्जुन उवाच ।**

**ज्यायसी चेत् कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत् किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**

११८. पार्थ वदे वासुदेवा । प्रश्न आमुचा ऐकावा ॥ १ ॥ कर्मागळी बुद्धि होय । ऐसा सांगतां प्रस्ताव ॥२॥ तरी घोर[८०] कर्मी यया । जनार्दना घालावया ॥ ३ ॥ चिंतेपासूनि केशवें । तुका म्हणे जी सोडावें ॥ ४ ॥

**व्यामिश्रेणैव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

११९. या मिश्रीत उत्तरा । ऐकुनि खेदीत अंतरा ॥ १ ॥ बुद्धिस्थिति भांबावली । वृत्ति शौर्याची लाजली ॥ २ ॥ एक पंथ निवडून । सांग जयांत कल्याण ॥ ३ ॥ श्रेय पावे जयास्तव । तुकया भयें नेणें जीव ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**लोकेऽस्मिन् द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥**

१२०. हांसोनि बोले राधाप्रिय । हे कौंतेय अवधारीं ॥ १ ॥ निष्ठा द्विविध या लोकीं । पूर्वी असे कीं बोलिली ॥ २ ॥ ज्ञानयोगेंचि सांख्याला । असे केला निश्चयो ॥ ३ ॥ सत्कर्में कर्मयोगी । तुका भोगी जें सुख ॥ ४ ॥

---

८०. 'घोर' ऐवजीं 'थोर'—पाठ प्र. ४ व ६.

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

१२१. अहो जें कां कर्मातीत । सिद्ध प्राप्त चोखट ॥ १ ॥ परि कर्म केल्याविण । कोण सीण मुकला ॥ २ ॥ कर्मसंन्यासमात्रें । सिद्धि बक्के न पाहे ॥ ३ ॥ ययालागीं तुका वाणी । हे निशाणी कर्माची ॥ ४ ॥

**न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥**

१२२. अहो कर्म केल्याविण । वागे कोण पृथ्वीस ॥ १ ॥ एक पळ न ठरे कधी । कर्मसंधीवांचुनी ॥ २ ॥ ह्याटें छेद करविती । कर्म प्रकृतीच्या गुणें ॥ ३ ॥ तुका म्हणे कर्मातीत । त्या अनंत मानिना ॥ ४ ॥

**कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।**
**इन्द्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥**

१२३. कर्मेंद्रिया अनिवारा । तो पसारा आवरूनी ॥ १ ॥ मनीं चिंती विषयांस । कर्मसंन्यास साधुनी ॥ २ ॥ डोळे झांकी मूढ बसे । मिथ्या दिसे दंभ तो ॥ ३ ॥ तुका विनवितो संतां । ऐसी वार्ता सुनाट ॥ ४ ॥

**यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।**
**कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥**

१२४. अरे पार्था इंद्रियाला । मनें त्याला आवरी ॥ १ ॥ कर्मेंद्रियीं कर्मयोग । करी निःसंग थोर तो ॥ २ ॥ निष्कामाचें तें भजणें । तुका म्हणे विश्रांती ॥ ३ ॥

**नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।**
**शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥**

१२५. कर्मत्यागाहूनि कर्म । श्रेष्ठां वर्म मानतें ॥१॥ तूं करी विचक्षणा । अंतःकरणा जे शुद्धी ॥ २ ॥ देहनिर्वाहा काळजी । न लगे माझी मी जाणें

॥ ३ ॥ कर्म सोडलिया खोटें । मग उफराटे बांधील ॥ ४ ॥ तुका म्हणे जगीं खंती । कर्माहातीं न पडावें ॥ ५ ॥

**यज्ञार्थात् कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः ।**
**तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥**

१२६. देवपितृयज्ञ । जे वेदज्ञ जाणती ॥ १ ॥ याविण मिथ्या येर । नेदी थार परलोकीं ॥ २ ॥ संग त्यागें त्याप्रीत्यर्थ । घे परमार्थ करतळीं ॥ ३ ॥ माझी प्राप्ती जयामाजी । तुका आजी पावला ॥ ४ ॥

**सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।**
**अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥**

१२७. प्रजा यज्ञा संगें विधी । पूर्व बुद्धि प्रेरित ॥ १ ॥ जे निर्माण झाले लोक । त्यांस शोक नसावा ॥ २ ॥ कीं या मखें पावो वृद्धी । कामसिद्धि धेनु वा ॥ ३ ॥ तुका म्हणे आशीर्वाद । भवखेदवारक ॥ ४ ॥

**देवान् भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।**
**परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥**

१२८. देवा भजाया अध्वरें । फळ खरें देतील ॥ १ ॥ तुम्हां लाभचि जाणावा । नित्य भावा नूतन ॥ २ ॥ अन्योन्य भजतां ऐसें । फळ अनायासें श्रेयाचें ॥ ३ ॥ तुका वदे धर्मयज्ञीं । साह्य सुज्ञीं असावें ॥ ४ ॥

**इष्टान् भोगान् हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः ।**
**तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः ॥ १२ ॥**

१२९. इष्ट भोग देती तुम्हां । ऐसा महिमा देवांचा ॥ १ ॥ यज्ञ देव पुजलिया । तुमची क्रिया सफळ ॥ २ ॥ देवीं दिलें तें देवांस । नेदी तामस चोर तो ॥ ३ ॥ तुका म्हणे आत्मपोटा । ढोर तांटा चघळीत ॥ ४ ॥

**यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः ।**
**भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् ॥ १३ ॥**

१३०. यज्ञाचे शेष खाणारे । पाप हरे दर्शनें ॥ १ ॥ आत्मोदरासाठीं नेम । तो अधर्म[८१] व्यापारू ॥ २ ॥ पापी पापचि ते खाती । जे रांधिती स्वेच्छेनें ॥ ३ ॥ तुका म्हणे रोगी जैसे । घेऊ बैसे पथ्यासी ॥ ४ ॥

---

८१. ' अधर्म ' ऐवजीं ' अधम '—पाठ प्र. १.

**अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः ।**
**यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः ॥ १४ ॥**

१३१. भूतें अन्नरसें होती । अन्नोत्पत्ति पर्जन्यें ॥ १ ॥ यज्ञें करूनि पर्जन्य । लोकीं मान्य जो तिहीं ॥ २ ॥ यज्ञकर्मापासूनियां । वर्म तुकया ठावकें ॥ ३ ॥

**कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।**
**तस्मात् सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥**

१३२. वेदांपासूनियां कर्म । उघड वर्म कळतें ॥ १ ॥ वेद अक्षरसंभव । वासुदेव बोलती ॥ २ ॥ तस्मात्सर्वगतही । श्रुति ग्वाही साधकां ॥ ३ ॥ प्रतिष्ठित यज्ञीं सदां । तुकया छंदा पाळक ॥ ४ ॥

**एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।**
**अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥**

१३३. ऐसें वर्तविलें चक्र । कर्मसूत्र यज्ञाचें ॥ १ ॥ लोकीं न वर्तवी जो कां । व्यर्थ असका[८२] यातीचा ॥ २ ॥ वृथा आयुष्य पातकी । इंद्रियमुर्खी घालीत ॥ ३ ॥ तुका म्हणे वांया भ्रष्ट । केले कष्ट निष्फळ ॥ ४ ॥

**यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।**
**आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥**

१३४. श्रद्धा आत्मरूपीं भली । वृत्ति रंगली विटेना ॥ १ ॥ आत्मलाभें झाला तृप्त । भक्त्यासक्त भावार्थी ॥ २ ॥ स्वरूपीं तुष्ट झालें मन । जन विजन सारिखे ॥ ३ ॥ त्याला नसे हे खटपट । तुकया पेठ कौलाची ॥ ४ ॥

**नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।**
**न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥**

१३५. नसे फळ त्याच्या कर्मीं । अविश्रमें विरक्त ॥ १ ॥ प्रत्यवाय उणेपणीं । हे तो काहाणी संपली ॥ २ ॥ न ज्यास सर्व भूतीं । कांहीं प्रीति फळाची ॥ ३ ॥ इच्छा नाहीं म्हणे तुका । तो नेटका मुक्त पै ॥ ४ ॥

---

८२. = आसक्ती; लोभ.

**तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।**
**असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥**

१३६. यालागीं वीरा पार्था । कामी निष्काम अर्था । सदा आपुले परमार्था । साधकानें पाहाणें ॥ १ ॥ करावें तें न सांडे की । कर्मरेषा नेटकी । करी पार्थिवा बाकी । झाडावया पाशाची ॥ २ ॥ काम त्यागिल्या निष्काम । पुरुष पावे परब्रह्म । तुका म्हणे वर्म[८३] । सुटकेचें[८३] निर्मळ ॥ ३ ॥

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि ॥ २० ॥**

१३७. कर्मेंचि करितां सिद्धी । प्राप्त श्रेष्ठांस त्रिशुद्धी । जनकादिक राजांमधीं । पूर्ण झाले विदेही ॥ १ ॥ वैराग्य झालें पुरें । आत्मतत्व कळे खरें । तरी लोकसंग्रहा रे । या कर्मासी नये सोडूं ॥ २ ॥ तुका म्हणे पार्थाप्रती । कर्ममार्गाची पद्धती । देव सांगे लोकस्थिती । आदि अंतीं पाळणें ॥ ३ ॥

**यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।**
**स यत् प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥**

१३८. जैसे आचरती श्रेष्ठ । तो परनिष्ठ[८४] पडे मार्ग ॥ १ ॥ तैसेच इतर लोक । हा विवेक चाळितां ॥ २ ॥ श्रेष्ठ निर्णयासारिखें । जग या सुखें मानावें ॥ ३ ॥ तुका म्हणे सुफळ न्याय । वेदराय सभेचा ॥ ४ ॥

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥**

१३९. पार्था तूं मातें पाहे । नसे कांहींही संदेह । पूर्ण ब्रह्मरूप देह । जन सर्वही जाणतां ॥ १ ॥ नसे कांहीं कर्तव्यता । किंवा फळ इच्छा चिंता । तरी या लोकीं आतां । वागे जगासारिखा ॥ २ ॥ अवाप्त सर्वही कामीं । कामी असोनी निष्कामी । तुका म्हणे तरी नामीं । वर्ते कर्मी निरत ॥ ३ ॥

---

८३. 'वर्म' ऐवजीं 'कर्म' व 'सुटकेचें' ऐवजीं 'सुटें केले'—पाठ प्र. ४.
८४ = परमेश्वरठायीं निष्ठ.

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

१४०. कर्मी जरी न वर्ते मीं । सुखें राहे स्वात्मधामीं । यत्नपूर्वक करी ना मी । मार्ग योनी धर्माचा ॥ १ ॥ मग तैशीच राहाटी । पडे जग परिपाठी । जो तो म्हणेल देव हटी । नाहीं कर्मी वागला ॥ २ ॥ मग कांहो आपणांस । आश्रमधर्माचा सायास । भक्षुं भक्षवे सुरस । पीऊं अपेय पान जें ॥ ३ ॥ भक्त नाहीं देव नाहीं । राजा नाहीं प्रजा नाहीं । गुरु शिष्य नाम नाहीं । ऐसा मार्ग पडेल ॥ ४ ॥ स्वर्ग नरक मिथ्या शब्द । वृथा शास्त्र वृथा वेद[८५] । तुका म्हणे कली छंद । मग सहज अनिवार ॥ ५ ॥

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

१४१. आधी हें मायामय । जग अनिवार होय । सांडोनियां स्वार्थन्याय । भलता पंथ स्वीकारी ॥ १ ॥ त्यांत आमुची वर्तणूक । जरी देखती न्यूनक । भ्रष्ट होसी मग अधिक । पै गा चिंता हे मनीं ॥ २ ॥ जरी कर्मी न वागें मी । स्वेच्छा करीन अन्य कामीं । तरी प्रजारक्षण नेमी । प्रभु ऐसा होईना ॥ ३ ॥ तुका म्हणे धाकें ऐसा । देव वागे सम माणसा । आपण तारक तो सहसा । येर बुडतां कळवळी ॥ ४ ॥

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

१४२. कर्मे नेमिलीं विधीनें । सिद्धि जावया साधनें । फळप्रातीच्या संधानें । अज्ञानास आनंदू ॥ १ ॥ तैसे अवघे नाशवंत । ज्ञानी सिद्धांतें संमत । जाणते जे झाले संत । तरी कर्मा नये सोडूं ॥ २ ॥ लोकसंग्रहो भारता । रक्षणें हा मार्ग आतां । पूर्ण सृष्टिचिया हिता । तुका म्हणे कळवळे ॥ ३ ॥

---

८५. 'वेद' ऐवजीं 'भेद'—पाठ प्र. ४.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसङ्गिनाम् ।
जोषयेत् सर्वकर्माणि विद्वान् युक्तः समाचरन् ।। २६ ।।

१४३. व्हावी कामना संपूर्ण । काम्य हेतूच तूं जाण । तैसेंच मग तूं साधन । कर्मठ ऐसे बोलिजे ।। १ ।। अज्ञान झोंबिन्नलें । ऐसें दृष्टीनें पाहिलें । तरी त्यांचें अंतर भलें । भेदूं नये सुज्ञानें ।। २ ।। जरी तत्त्ववेत्ता झाला । अथवा प्राप्त पुरुष भला । तरी जन्माच्या कर्माला । तेज द्यावें म्हणे तुका ।। ३ ।।

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ।। २७ ।।

१४४. कर्मे सर्व प्रकृतिच्या । गुणीं खेळाचि मायेचा। सोडलीं तीं ज्याच्या त्याच्या । पुन्हां गळीं लागती ।।१।। जंववरी देह संगु । तंव न सुटे प्रसंगु । उगा आग्रही उल्लंघुं । पाहातां येथें नाडेल ।। २ ।। अहंकारें मूढ बुद्धि । म्हणे माझी हे उपाधी । तुका म्हणे कधीं । सुटे ऐसी दिसे ना ।। ३ ।।

तत्त्ववित् तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ।। २८ ।।

१४५. तत्त्वज्ञों गुण कर्माला । भेदोन[८६] अकर्त्याला । पाहे स्वस्व-विषयाला । इंद्रियें हीं वर्तती ।। १ ।। जाणिवचें तुझें अंग । महाबाहो प्रेमें चांग । वशवर्ती लक्ष्मीरंग । भाग्य पूर्ण पांडवा ।। २ ।। स्वकर्माचें पाळण । कीजे नको उत्थापन । तुका बोलिला साधन । तेंच पाहे सर्वदा ।। ३ ।।

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मन्दान् कृत्स्नविन्न विचालयेत् ।। २९ ।।

१४६. लागती प्रकृतिछंदी । पडावया मोहोबंदीं । वृथा संसाराची मांदी । मेळविती पुष्कळ ।। १ ।। गुणीं रिझले प्रकृतीचे । मूढ झोंबे विषयीं लांचे । अज्ञान पाहोनी काचें । खवळूं नये सर्वज्ञें ।। २ ।। मोठें अहंकारीं

---

८६. ‘ भेदोन ’ ऐवजीं ‘ भाग दोन ’—पाठ प्र. १.

पाप। घेऊनि मायेचें निज माप। उगाणिती विषय दाप। तुका त्यासीं दावी ना ॥ ३ ॥

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा।
निराशीर्निर्ममो भूत्वा युध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

१४७. कर्म काय होईल जें। प्रकृतिच्या योगबीजें। तें तें ममरूपीं अर्पिजे। सर्वाध्यात्म मतीनें ॥ १ ॥ टाकूनी ममता आशा। युद्धा करीं तूं वीरेशा। विगतताप माझी दशा। तुझ्या अंगीं बाणेल ॥ २ ॥ ऐकतांच तो बोल। आला पार्थां अंगीं डोल। तुका म्हणे फोल। झाला सर्व संशय ॥ ३ ॥

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः।
श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥

१४८. उपेक्षूनि गुणदोषादि लक्षणें। निष्प्रांजलपणें बोलिलो कीं ॥ १ ॥ तैसेंच पाहावें हेंच अनुष्ठावें। सुखेंचि सुटावें कर्मबंधें ॥ २ ॥ मानव तराया भव[८७] संझाराया। केली नौका व्हाया पैलपार ॥ ३ ॥ तुका म्हणे जड नायकती मूढ। पुढेंही दगड होऊनि राहाती ॥ ४ ॥

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम्।
सर्वज्ञानविमूढांस्तान् विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

१४९. अथवा कुटील द्वेष ठेवी खळ। ज्यासि देहीं मळ अहंतेचा ॥ १ ॥ हें मत सोडोनि द्वेषही जोडोनी। आत्ममत मनीं अनुष्ठिती ॥ २ ॥ तरी ज्ञानमार्गी सर्वांच्या असंगी। बुद्धिभ्रंशें जगीं विमूढ ते ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा वरिष्ठ जाणावा। अव्हेर करावा जेणें त्याचा ॥ ४ ॥

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि।
प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

१५०. ज्ञानी पूर्ण झाला शास्त्रें उमजला। परी त्या लागला पूर्वसंगू ॥ १ ॥ प्रकृति हे मिळे प्राचीनाच्या बळें। तैसी बुद्धि खेळे साधूची कीं

८७. 'भव' ऐवजीं 'दोष'—पाठ प्र. ४ व ६.

॥ २ ॥ पंच भूत भव वेगळे गौरव । देखती अनुभव क्षणक्षणा ॥ ३ ॥ प्रकृति स्वाधीन पडली म्हणोन । निग्रहीं अज्ञान म्हणे तुका ॥ ४ ॥

**इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।**
**तयोर्न वशमागच्छेत् तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥ ३४ ॥**

१५१. पांचा विषयांची गोडी आत्मरुची । घेती ते रागाची वस्ती होते ॥ १ ॥ वाईट पाहिलें क्लेशें उपेक्षिलें । द्वेषाचें हें झालें जन्मस्थान ॥ २ ॥ रागद्वेष दोन वैरी पुरातन । न व्हावे त्या आधीन तुका म्हणे ॥ ३ ॥

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।**
**स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥**

१५२. भलताई स्वधर्म योनिसंभवकर्म । उत्तमें उत्तम अनुष्ठीजे ॥ १ ॥ अगुणी झालीया देतु महाश्रेया । जैसी बाळा माया लांसी* जरी ॥ २ ॥ स्वधर्मी मेले जे घेत रमा सेजे[८८] । परधर्मी रिझे वायां जाय ॥ ३ ॥ वधूचें कुरूप ज्याचें तया सुख । पराव्यासी विख होऊं न ठाके ॥ ४ ॥ तुका म्हणे स्वधर्म कर्मेचि वर्तावें । परधर्मे पावावें पतनालागी ॥ ५ ॥

**अर्जुन उवाच ।**

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।**
**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥**

१५३. पार्थासी संदेहें देवा पुसताहे । आतां कोणें आहे पाठविला ॥ १ ॥ करितो पापासी सांगावें आम्हांसी । बळें योजि ऐसी इच्छा नसतां ॥ २ ॥ अनिच्छें आदळी दोषाचळमौळी । सांगे हे नवाळी वार्ष्णेया तूं ॥ ३ ॥ तुका म्हणे प्रश्न हिताचा ऐकून । बोलिला नंदन वसुदेवाचा ॥ ४ ॥

---

* राक्षशीण.

८८. या चरणाऐवजीं 'स्वधर्मे मेले जे घे तर मासे जे'—पाठ प्र. ४.

श्रीभगवानुवाच ।

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥

१५४. अगा धर्मभ्रात्या नीतीच्या जाणत्या । कामक्रोधास त्या दया नाहीं ॥ १॥ रजोगुणें वाढ तमाचेनी प्रौढ । सत्त्वगुणा मूढ केलें ईहीं ॥२॥ खाऊनि आकल्प तृप्ति नेणें स्वल्प । विवेकासी पाप लाविती हे ॥ ३ ॥ म्हणोनि न्यायाचे मार्ग पाडायाचे । तुका म्हणे यांचें कुशलत्व ॥ ४ ॥

धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

१५५. विस्तु धुरें वेढे नवल हें मोठें । ऐके त्याचे फाटे जन्म खत ॥ १ ॥ आरसा मळानें गर्भासि नाळानें । काय तो बळानें[८९] जीवा तैसा ॥ २ ॥ चैतन्याशेजारीं वस्ती निरंतरीं । अनिवार भारी म्हणे तुका ॥ ३ ॥

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

१५६. ज्ञान जरी शुद्ध होतें असंबद्ध । वेष्टण प्रसिद्ध याचें म्हणुनी ॥ १ ॥ नित्यारि[९०] ज्ञान्याचा हाचि सत्य वाचा । कामना रूपाचा गोंधळू जो ॥ २ ॥ अग्निवत भारी जयाची दुवारी । तुका म्हणे मारी वैराग्यासी ॥३॥

इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

१५७. इंद्रिय मन बुद्धि हीं कामाधिष्ठानीं । बोलिजे सज्ञांनीं तेंहि खरें ॥ १ ॥ येणेंचि मोहित ज्ञान होतें खरें । बुडालें नुद्धरें गर्वडोहीं ॥ २ ॥ विरहित असावें तेणें मग बोलावे । ऐसें न दिसावें काय करूं ॥ ३ ॥ तुका विदेहात्मा केला या अनंतें । आपुल्या उचितें दयाळुवें ॥ ४ ॥

---

८९. ‘ काय तो बळानें ’ ऐवजीं ‘ कीं तत्त्वें वेश्यानें ’—पाठ प्र. ४ व ६.
९०. ‘ नित्यारि ’ ऐवजीं ‘ नित्यानी ’—पाठ प्र. १.

**तस्मात् त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।**
**पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥**

१५८. तस्मात इंद्रियें जे कां दशविध । आहे तया बंध अधिकारी ॥ १ ॥ भरतर्षभा जय घेतां यापासूनी । कामाच्या भुवनीं अग्नि पेटे ॥ २ ॥ ज्ञाननाश पुढें विज्ञाना न ठेवी । तयास नुरवी तुका म्हणे ॥ ३ ॥

**इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।**
**मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥**

१५९. स्थूलापुढें करणें[९१] वागती हे पार्था । मन पैल पंथा तयाचीये ॥ १ ॥ मना पैलीकडे बुद्धिचि तिकडे । आत्मा तो निवडे त्यापरता ॥ २ ॥ साक्षी होऊनियां लिप्त नव्हे कर्मा । आंतुलिया वर्मा रिझें वीरा ॥ ३ ॥ तुका म्हणे देव कृपावंत खरा । वरी उजगरा दशा आली ॥ ४ ॥

**एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।**
**जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥**

१६०. तिनें असे तीसी परता आपण । जाणे वरी खूण हेचि पार्था ॥ १ ॥ जाणोनि थांबवी तीसी मनापासीं । शक्ति चैतन्यासी जंव मिळे ॥ २ ॥ परि सामर्थ्याची उठावणी करी । हा शत्रू संहारी कामरूप ॥ ३ ॥ महाबाहो नाम तरी साच वाटे । अजिंक्य निवटे तुका म्हणे ॥ ४ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मयोगो नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥**

इति गीता अभंगात्मक तृतियोध्यायः ॥[४६]

---

९१. = इंद्रियें.

॥ अथ चतुर्थोऽध्यायः ॥

## — कर्मब्रह्मार्पणयोग —

श्रीभगवद्गीता अभंगात्मक चतुर्थोध्यायः। ४६

**श्रीभगवानुवाच ।**

**इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।**
**विवस्वान् मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥**

१६१. आनंदाचा कंद गोविंद बोलला। ऐके या गोष्टीला पूर्वींचिया ॥१॥ पुरातन योग मीच आत्मा मोहें[९२]। बोलिलों ज्ञान हें भानुदेवा ॥२॥ सूर्य हीतकार मनुसी सांगत। तोहि अनुग्रहित इक्ष्वाकूसी ॥ ३ ॥ ऐसें हें पुर्वींचें आहे भांडवल। सांपडे नवल तुकयासी ॥ ४ ॥

**एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।**
**स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥**

१६२. परंपरागत ऐसाचि जाणिजे। ऋषि देव राजे सुखावले ॥ १ ॥ योग तरी अचळ परि झाला चळ। बहुत युगमुळ जाणोनियां ॥ २ ॥ परंतपा अस्तमाना गेल्या रवी। प्रकाश नुरवी स्वल्पमात्र ॥ ३ ॥ तुका म्हणे भाग्य भासे सज्जनांचें। झाले प्रकाशाचे वांटेकार ॥ ४ ॥

**स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।**
**भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥**

१६३. तोच ह्या आजि म्यां तुज प्रगटिला। योग जो लोपला पूर्वी होता ॥ १ ॥ तूं तंव माझा सखा भक्तही वरिष्ठ। म्हणोनि उत्कृष्ट दया आली ॥ २ ॥ न सांगें बंधूतें नारी सुता दुहिता। माता पिता चुलता वंचिलें म्यां ॥ ३ ॥ अद्भुत रहस्य अप्राप्त सुरवरां। अतुडलें करा तुका म्हणे ॥४॥

---

९२. ‘ आत्मा मोहे ’ ऐवजीं ‘ आत्मज्ञ हें ’—पाठ प्र. ४.

अर्जुन उवाच ।

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

१६४. पार्थ म्हणे मातें विस्मय वाटतो। राग आपण तो धरूं नये[९३] ॥ १ ॥ अलीकडे जन्म तुझा पुतनारी। उत्पन्न द्वापारीं आम्ही झालों[९४] ॥ २ ॥ आद्य युगीं रवी त्याचा आज संवाद। वर्णिसी विषाद[९५] आम्हांपुढें ॥ ३ ॥ आतांचें नेणवे पूर्वी जाणे कोण। अंगीं पावो खुण ऐसें करा ॥४॥ लोक संपादणी तूं तंव त्यावर। उघड विचार तुका म्हणे ॥५॥

श्रीभगवानुवाच ।

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

१६५. बोले नारायण ऐके कुरुनाथा। व्यर्थ नको पंथा संशयाच्या ॥१॥ क्रमिले बहु जन्म माझे आणि तुझेही। मीं जाणतों हेहीं ईशपणें[९६] ॥ २ ॥ देही तूं अर्जुना नेणसी हें वर्म। तुका म्हणे धर्म हाचि मुख्य ॥ ३ ॥

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

१६६. अज म्हणजे नित्य अविनाश अक्षयीं। भाव शेषशायी जाणवितो ॥ १ ॥ भूतें मजपासून कोणापासुनी मी। आणुनी मनोक्रमीं पाहे बरें ॥ २ ॥ होतों शुद्धबुद्ध आत्मैव मायेंत। आपुली आकृत अधिष्ठुनी ॥३॥ तुका म्हणे हरि सांगेल माहात्म। श्रोते हो उत्तम श्रवण कीजे ॥ ४ ॥

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

---

९३. 'धरूं नये' ऐवजीं 'न धरावा'—पाठ प्र. १ व ५.
९४. 'झालों' ऐवजीं 'जाणों'—पाठ प्र. १.
९५. 'विषाद' ऐवजीं 'विद्वद'—पाठ प्र. १.
९६. या चरणाऐवजीं 'क्रमिलीं बहु जन्में माझी तुझी तेंही। मी जाणतों पाही ईशपणें''—पाठ प्र. ४ व ६.

१६७. जे जे वेळे धर्म हानि पावे क्लेशें। दैत्य दुरारोषें अधर्माचेनीं[९७] ॥ १ ॥ अधर्म उंचावे त्रैलोक्य जिणाया। तेव्हां आत्मकाया सृजीतों मी ॥ २ ॥ तुका म्हणे देव सांगतों ऐकावें। जेणें पराभवे संशय हा ॥ ३ ॥

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम्।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥**

१६८. रक्षावया साधुजनां। मारावयासी दुर्जनां ॥ १ ॥ धर्मस्थापना कराया। होतों युगायुगीं कौंतेया ॥ २ ॥ हेंचि देहधारणा मूळ। ऐकें मम मायेचा खेळ ॥ ३ ॥ तुका म्हणे अभयाचें। दानपात्र भाविकांचें ॥ ४ ॥

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

१६९. माझी जन्मकर्मलीळा। जाणे भाविक जो भोळा ॥ १ ॥ धन्य तोचि भूमीवरी। देही असोन निराकारी[९८] ॥ २ ॥ पद शाश्वत पावेल। अनुपम्य हें गाईल ॥३॥ खुंटे पुन्हां त्याचा जन्म। अनुभवें तुकाराम ॥४॥

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

१७०. कामक्रोधभयाविण। तोच साधु पूर्ण जाण ॥ १ ॥ ध्याननिष्ठ मदाश्रित। त्यासि आम्ही म्हणों संत ॥ २ ॥ बहुत ज्ञानतपें शुद्ध। जाणावा तो महासिद्ध ॥३॥ जे पावले स्वस्वरूपीं। तुकया शरण त्या चिद्रुपीं ॥ ४ ॥

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥**

१७१. जो जो जैसें मातें भजे। मीही तया तैसा उमजें ॥ १ ॥ जैसा भाव ठायीं माझे। फळें तेवीं त्यां सहजें ॥ २ ॥ पार्था मानव सकळ। मम मार्गीच निखळ ॥३॥ वर्ततातीं हें तूं जाण। तुका वंदी त्याचे चरण ॥ ४ ॥

---

९७. 'अधर्माचेनीं' ऐवजीं 'अधमाचेनीं'—पाठ प्र. १ व ५.

९८. 'निराकारी' ऐवजीं 'निर्विकारी'—पाठ प्र. ४.

काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

१७२. अन्य देवता पुजिती । जे कां कर्मसिद्धीप्रती[९९] ॥ १ ॥ नानाविध मार्गांतरें । ध्यान उपास्य गजरें ॥ २ ॥ कर्मांमुळेंच त्या सिद्धी । नरलोकीं पैं त्रिशुद्धी ॥ ३ ॥ पावे शीघ्र भाक्तिभावें । तुका म्हणे पूर्व देवें ॥ ४ ॥

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥

१७३. विप्र क्षत्रिय वैश्य शूद्र । वर्णविभाग चत्वार ॥ १ ॥ केले इच्छेनें आपुले । मार्ग भिन्नत्वें स्थापिले ॥ २ ॥ सांभाळितों पुनः पुन्हां । असोनि अलिप्त अर्जुना ॥ ३ ॥ अज अव्यय छंदानें । तुकया जाण तूं संधानें ॥ ४ ॥

न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥

१७४. कर्में लिंपिती नामातें । जरी माझीये साक्षीतें ॥ १ ॥ नवल सांगतों अर्जुना । झणे संशयो हा मना ॥ २ ॥ कर्म सुफल प्राप्ती आशा । नसे चिंतात[१००] नरेशा ॥ ३ ॥ जाणे खुण तोचि मुक्त । होय तोचि[१०१] कर्मातीत ॥ ४ ॥ बद्ध शुभाशुभीं नव्हे । तुका वर्णी[१०२] त्या गौरवें ॥ ५ ॥

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात् त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

१७५. ऐसें जाणुनी मुमुक्षीं । कर्में केलीं पूर्व पक्षीं ॥ १ ॥ कुरुवर्या त्या आधारें । करी कर्में साचोकारें ॥ २ ॥ केलीं पूर्वज पूर्वजीं । तुका जयांसी नवाजी ॥ ३ ॥

---

९९. ‘ कर्मसिद्धीप्रती ’ ऐवजीं ‘ कर्मसिधी प्रीति ’—पाठ प्र. १.
१००. ‘ चिंतीत ’ ऐवजीं ‘ किंचित ’—पाठ प्र. ४.
१०१. ‘ तोचि ’ ऐवजीं ‘ सर्व ’—पाठ प्र. १.
१०२. ‘ वर्णी ’ ऐवजीं ‘ वीनवी ’—पाठ प्र. १.

**किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।**
**तत् ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥**

१७६. येथें मोहिलें ज्ञानियें । खुण नये ध्यानासी ॥ १ ॥ कैसें कर्म अकर्म तें । संशयातें दर्शवी ॥ २ ॥ जाणून मीं तूज सांगें । अनुभव अंगें सूटसी ॥ ३ ॥ तुका म्हणे दिव्य मत । सावध चित्तें ऐकावें ॥ ४ ॥

**कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।**
**अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥**

१७७. तत्त्व वेदोक्त कर्माचें । कर्म त्याचें अवधारीं ॥ १ ॥ निषिद्ध विकर्माचें जें । तेथें बुझे सर्वज्ञ ॥ २ ॥ अकर्माचेही जाणावें । जीवीं ध्यावें एकत्वें ॥ ३ ॥ तुका वदे कर्मगती । गहन म्हणती यास्तव ॥ ४ ॥

**कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।**
**स बुद्धिमान् मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥**

१७८. न बाधे तें नव्हे कर्म । मुख्य वर्म तें ऐसें ॥ १ ॥ अकर्मता कृष्णार्पणीं । सत्य वाणी मानावी ॥ २ ॥ अकर्मीच कर्म पावे । हें तो अवघे चोखट ॥ ३ ॥ तुका वदे सर्वकृत । देखे मात सर्वज्ञ ॥ ४ ॥

**यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः ।**
**ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ १९ ॥**

१७९. कर्म संकल्प त्यागुनी । आत्मज्ञानीं रतला ॥ १ ॥ सर्व कर्मा जो आरंभो । निर्मळ नभो चंद्रमा ॥ २ ॥ ज्ञानाग्नीनें जाळी कर्मा । शिव शर्मा पैं जैसा ॥ ३ ॥ तोचि पंडित बोलती । तुका स्तुति करी त्याची॥४॥

**त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः ।**
**कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किंचित् करोति सः ॥ २० ॥**

१८०. सर्व टाकूनि फळाशा । स्वात्मतोषाभीतरीं ॥ १ ॥ निराश्रय सदा तृप्त । पारंगत सच्छास्त्रीं ॥ २ ॥ सर्व कर्मीं प्रवर्तला । जैसा भला मिथिलेश ॥ ३ ॥ तरी कांहीं न तो करी । साक्षोत्तरीं तुकयाचे ॥ ४ ॥

**निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।**
**शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥**

१८१. देह चित्त वश करुनी । जो साधनीं विनटला ॥ १ ॥ परिग्रह न ते आशा । मद ईर्षा नेणेचि ॥ २ ॥ शरीरमात्रें जो कर्म । करी धर्म रक्षुनी ॥ ३ ॥ बंधनातें छेदून वर्ते । लाभ सरते तुकयासी ॥ ४ ॥

**यदृच्छालाभसंतुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः ।**
**समः सिद्धावसिद्धौ च कृत्वापि न निबध्यते ॥ २२ ॥**

१८२. लोभ सर्वांसी सारखा । तुष्ट देखा अयाचित ॥ १ ॥ सुखदुःख द्वंद्व नेणें । मत्सर तेणें भावेंचि ॥ २ ॥ सिद्धीं असिद्धींत सम । आत्माराम साधका ॥ ३ ॥ बद्ध नव्हे कर्म करितां । तुका वार्ता निवेदी ॥ ४ ॥

**गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।**
**यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥**

१८३. कर्तृत्वापासूनि मुक्त । जो विरक्त सर्वदां ॥ १ ॥ थोर चित्त आत्मरूपीं । कीं चिद्रूपीं खेळे तो ॥ २ ॥ मखार्थ कर्म आचरे । निर्व्यापारें आवडी ॥ ३ ॥ सर्वही तें जातें लया । ठायीं जया तुकाराम ॥ ४ ॥

**ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।**
**ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥**

१८४. कर्ता अग्नि हविर्द्रव्यें । जिवेंभावें एकाग्र ॥ १ ॥ ब्रह्म वह्नींच अर्पून । झाला लीन माझारी ॥ २ ॥ कर्मी ब्रह्मसमाधिस्थ । चिंताग्रस्त[१०३] सारिखा ॥ ३ ॥ त्याणें ब्रह्मीच पावणें । सुख बाणे तुकयासी ॥ ४ ॥

**दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।**
**ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥**

१८५. इंद्रादि भावेंचि यज्ञ । जो सर्वज्ञ स्वाकारी ॥ १ ॥ उपासिती कर्मयोगी । पुढें भोगी निज मोक्षु ॥ २ ॥ जे कां ज्ञानी ब्रह्माग्नींत । मन

१०३. ‘ चिंताग्रस्त ’ ऐवजीं ‘ चिंताग्नींत ’—पाठ प्र. ४ व ६.

च्चित्त सामग्री ॥ ३ ॥ यज्ञरीतींच होमिती । तया प्राप्ती निज लाभु ॥ ४ ॥ तुका म्हणे आणीकही । यज्ञ पाहीं सांगत ॥ ५ ॥

**श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।**
**शब्दादीन् विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥**

१८६. ज्ञानेंद्रिय कर्मेंद्रिय । दहा करणांचा प्रत्यय । एकवटी समुदाय । स्वात्मसत्तें याजक ॥ १ ॥ पृथकाकारें निग्रह । सोडवुनी दुराग्रह । करुनि आत्म अनुग्रह । नियमाग्नी होमिती ॥ २ ॥ त्या इंद्रियाग्नीत । सावधान याजक होत । वर्ण अर्थ सार हुत । शब्दालागी होमिती ॥ ३ ॥ तुका म्हणे संतांप्रती । जैसी सारांश पद्धती । ऐसें निवेदी श्रीपती । पार्थाप्रती ऐकावें ॥ ४ ॥

**सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।**
**आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥**

१८७. कोणी आईक अर्जुना । पाहे निगमभावना । सर्व इंद्रियस्वाधिना । हेच इष्ट सामग्री ॥१॥ पंच प्राण या देहांत । वागताती आत्मस्थित । त्यांचीं कर्मे यथास्थित । तीं चहूंकडे[१०४] निमिलीं ॥२॥ आतां वृत्तीनें निवृत्ती । पद पावुनि झाली तृप्ती । येथें चिद्भानूची दिप्ती । व्यापे पृथ्वी आकाश ॥ ३ ॥ तुका म्हणे तेच कळा । निरोधाग्नीची ज्वाळा । होमिती घनसांवळा । आत्मतोंडें वर्णित ॥ ४ ॥

**द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।**
**स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥**

१८८. धनापासुनी अभिज्ञ । देवद्विजपितृयज्ञ । होतो तोचि द्रव्ययज्ञ । पैं तत्त्वज्ञ जाणिती । ॥ १ ॥ तपोयज्ञ तापसांचा । योगयज्ञ तो योग्यांचा । सुव्रत[१०५] वेदार्थाचा । ज्ञानज्ञही बोलती ॥ २ ॥ यत्नशील जे पांडवा । अनुष्ठिती स्वात्मदेवा । तुका म्हणे तेच देवा । झाले पूर्ण आवडते ॥ ३ ॥

---

१०४. ‘ तीं चहूंकडे ’ ऐवजी ‘ तींच कुडें ’—पाठ प्र. १.
१०५. ‘ सुव्रत ’ ऐवजी ‘ सुप्रत ’—पाठ प्र. १ व ५.

**अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।**
**प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥**

१८९. अपान अधस्थ आसनें। साधुनि आधार अधिष्ठानें । तेथें होमिजे प्राणें। आत्माहुति अपानीं ॥ १ ॥ मग उर्ध्वदशेची ते गति। स्वाधिष्ठानाचे वरती । मनुपुरांत[१०६] आहुति । अपान घेत प्राणाची ॥ २ ॥ कोणी प्राण अपानास । निरोधोनि षट्चक्रांस। जीणोनि प्राणायामास । उतावेळ झाले जे ॥ ३ ॥ तुका म्हणे साधकजनीं । योगमार्गा अनुभवुनी । पंथ ठेविला नित्यानीं । वागावया पांथिकां ॥ ४ ॥

**अपरे नियताहाराः प्राणान् प्राणेषु जुह्वति ।**
**सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥**

१९०. हळू योग वाटे वात। साधून आहार नियमीत। तेथें मन केविं तृषीत। पिडूं शकेल हें नेणें ॥ १ ॥ प्राणी प्राणास होमिती । हठयोगी ऐसे रीतीं। सर्व यज्ञें पावन होती । त्या बोलती यज्ञवित् ॥ २ ॥ तुका म्हणे नारायणें । केलें पार्थासी सांगणें। ना तें साधूंचें मागणें। होतें कांहीं पुर्वीचें ॥ ४ ॥

**यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।**
**नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥**

१९१ यज्ञशेष जे अमृत। देवादिक ज्या इच्छित। त्याचे भोक्ते झाले संत। पूर्ण हटप्रयत्नें ॥ १ ॥ मग यांत लाभ काय । ऐसा कोणी पुसता होय । तरी परब्रह्म ठाय। पै पावती भरंवसे ॥ २ ॥ आतां आळसी पांडवा। नसे याज्यत्व स्वभावा। त्यासी इहलोक बोलावा। मान कैसा परत्रीं ॥ ३॥ कुरु-उत्तमा अर्जुना। चित्त द्यावें या वचना। कांहीं असल्या कल्पना । त्या तूं मातें निरूपीं ॥ ४ ॥ तुका म्हणे चोखट। जें कां ज्ञान-यज्ञा वरिष्ठ। तें सेविताती ब्रह्मनिष्ठ । सोहंमंत्रें करूनी ॥ ५ ॥

---

१०६ ‘ मुनुपुरांत ’ ऐवजीं ‘ मणिपुरांत ’—पाठ प्र. ४.

**एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।**
**कर्मजान् विद्धि तान् सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ।। ३२ ॥**

१९२. बहु यज्ञांचा विस्तार। झाला विधीपासून साचार। सर्वही कर्म सारासार। ऐसे जाणुनी सूटसी ॥ १ ॥ कर्मी बद्धता पांडवा। म्हणोनि जडपण ठेवा। याचे संगें जड जीवां। तरुणोपाय कासया ॥ २ ॥ ऐसें कल्पिसी मानसी। ज्ञानी आशंका विवसी*। हातीं नलगे ठेव्यासी। पै गा भूतें झोंबल्या ॥ ३ ॥ तया भूतांची झाडणी। करील येथें गदापणी। पंचाक्षरीं तो निर्वाणी। सोडविलें सोडवा ॥ ४ ॥ तुका ध्याय ध्यानाजवळ। याची अखंडीत माळ। म्हणून संतांमाजी खेळ। झाला ब्रह्मप्राप्तीचा ॥५॥

**श्रेयान् द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।**
**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥**

१९३. द्रव्ययज्ञाहून श्रेष्ठ। ज्ञानयज्ञ हा वरिष्ठ। पार्था यातें ब्रह्मनिष्ठ। बहुधा ऐसे जाणती ॥ १ ॥ लौकिक वैदिक कर्में। सर्वही तीं ज्ञानकर्में। पावे संपत्तीस प्रेमें। नोहे कदा दरिद्री ॥ २ ॥ हळहळ गेली ज्याची। तो संपत्तिवंत त्याची। कीर्तिपाठ तुका वाची। लोकांमाजी सर्वदा ॥ ३ ॥

**तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।**
**उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥**

१९४. ते ज्ञान प्राप्ती खुण। ऐकें पांडवा लक्षण। आधी सद्भावें नमन। मग प्रश्न आवडीचा ॥ १ ॥ सेवा भावार्थे करावी। निरपेक्षता असावी। तेव्हां कृपा उपजे जीवीं। मग तो होय उपदेश ॥ २ ॥ शास्त्रज्ञ आणि तत्त्वज्ञ। ज्ञान सांगती सर्वज्ञ। तेव्हां सहज वर्मज्ञ। तुका म्हणे भाविका ॥ ३ ॥

**यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पाण्डव ।**
**येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥**

१९५. जें ज्ञान जाणुनियां। पुन्हां ऐसा मायामया। न मोहसील कौंतेया। दृश्य भास दिसेना ॥ १ ॥ स्थूल सूक्ष्म जीं भूतें। अथवा

* = हडळी.

स्थावरजंगमातें। आत्मरूप तूं तयातें। आपणातें देखसी ॥ २ ॥ मग मजसीं ऐक्यता। होय कैसी ऐकें आतां। जैसें पावकें कवाळितां। दे ऐश्वर्य आपुलें ॥ ३ ॥। गंगा सिंधुसमागमी। की भानूच्या ठायीं रश्मी। तैंवीं एक तेथ नामी। तुका न वचे निराळा ॥ ४ ॥

**अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।**
**सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥**

१९६. असलास जरी पापिया शरीरी। नोहे कवणे परी उद्धाराची ॥ १ ॥ थोर पापी भिती ऐसी जरी गती। झाली तुजप्रती पार्थवीरा ॥ २ ॥ तरी पापसिंधूवरी हे अगाधु। आहे की निर्बाधु ज्ञाननौका ॥ ३ ॥ तुका म्हणे सार निवडी रमावर। श्रवणेंचि उद्धार भाविकांचा ॥ ४ ॥

**यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात् कुरुतेऽर्जुन ।**
**ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते तथा ॥ ३७ ॥**

१९७. किंवा जैसा पेटे वन्हि जाळी काष्टें। तेथें सान मोठें न विचारीच ॥ १ ॥ तैसा एक वेळां ज्ञानाग्नि उजळला। झाल्या कर्मकळा भस्म करी ॥२॥ तेथें पुण्य पाप नोळखे स्वरूप। उडवी संकल्प-पतंग ते ॥ ३ ॥ तुका मुक्त झाला या मार्गे जो गेला। तोचि या जनाला उपदेश ॥ ४ ॥

**न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।**
**तत् स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥ ३८ ॥**

१९८. ज्ञानासम नसे प्रायश्चित्त दिसे। शुद्ध जें आपैसे देहा करी ॥१॥ ऐसे न साधन देखती लोचन। सर्व गुणें मान ज्ञानासीच ॥ २ ॥ ज्ञात्याच्या प्रयत्नें लाभे योग चिन्हें। मग सिद्धि रत्नें येती हातां ॥ ३ ॥ कालें या चित्तांत अनुभव बिंबत। तुकयाचें हित येवढेंची ॥ ४ ॥

**श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।**
**ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥**

१९९. श्रद्धाळू तो ज्ञान पावे हें तूं जाण। पूर्ण समाधान जयापाशी ॥ १ ॥ जो का इंद्रियातें आणितो हरीते। आणि ब्रह्मत्वातें तत्पर जो ॥ २ ॥ ज्ञानास पावूनी शांतीस घेऊनी । बैसे निगमवनीं म्हणे तुका ॥ ३ ॥

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

२००. बुडे अज्ञ तैसी अश्रद्धा मानसीं। वसे जयापासी निरंतर ॥ १ ॥ हीन जो संशयी बुद्धि तैसी नाहीं। रुखरूख पाही सर्व काळ ॥ २ ॥ बुद्धि संशयाची न दों लोकीं रुची। फळश्रुतिकाची तुका म्हणे ॥ ३ ॥

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥

२०१. कर्मयोगांतरीं संन्यासाची थोरी। वंद्य द्विजवरीं अग्रपूजे ॥ १ ॥ मुक्त झाला देहीं नुरे संशय कांही। वेदशास्त्रग्वाही पाहूनियां ॥ २ ॥ जो कां आत्मवेत्ता तया कर्मवार्ता। न बाधिती चित्तामाजी घेई ॥ ३ ॥ तुका म्हणे मुक्त झाले देहातीत। अधम नेणत वायां गेले ॥ ४ ॥

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

२०२. तस्मात तूं हा वैरी संशय संहारी। जो वागे अंतरीं अमंगळ ॥ १ ॥ छेदी ज्ञानखड्गें शीर याचे वेगें। स्वकर्म तूं अंगें अनुष्ठीं पां ॥ २ ॥ तुका विनवणी ऐकावी सज्जनी। समाप्त येथूनि प्रसंग हा ॥ ३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मब्रह्मार्पणयोगो नाम[१०७] चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीता अभंगात्मक टीकायां चतुर्थोध्याय ॥[४६]

१०७. या अध्यायाला ‘ ज्ञानयोग ’ म्हणून प्र. १ मध्यें संबोधलें आहे.

## ॥ अथ पञ्चमोऽध्यायः ॥

## — कर्मसंन्यासयोग —

श्रीमद्भगवद्गीता अभंगात्मक—पंचमप्रसंग[४६]

अर्जुन उवाच ।

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

२०३. पुसे पंडुपुत्र परिसे नीरदगात्र । संशयाचें क्षेत्र एक दिसे ॥ १ ॥ बोलोनियां कर्म संन्यासाचें वर्म । कर्मयोगोत्तम निवेदिसी ॥ २ ॥ परि या दोहींत श्रेष्ठ दावी हित । मज सांगा साद्यंत कृष्णराजा ॥ ३ ॥ तुका म्हणे जगव्यापकाचा संग । तेथें ज्ञान मग काय उणें ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच ।

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात् कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

२०४. बोले लक्ष्मीकांत विश्वाचा जो अंत । कल्याणकरांत संन्यास हा ॥ १ ॥ कर्मयोग तैसा जाण तूं वीरेशा । थोर त्यागोद्देशा कर्मांचिया ॥ २ ॥ कर्मयोग श्रेष्ठ बोलती परनिष्ठ । विचारेंचि जेष्ठ तुका म्हणे ॥ ३ ॥

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।
निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात् प्रमुच्यते ॥ ३ ॥

२०५. संन्यासी जाणावा येथें तो बरवा । नेणें द्वेषभावा कदा जगीं ॥ १ ॥ सुख आढळतां नेणें सुखवितां । मूळ विरक्तता यतीश्वरा ॥ २ ॥

निर्द्वंद्व सर्वदां भोगीत आनंदा । अनायासें बंधा पासाव* तो ॥ ३ ॥ सुटे हा संशय केवीं देत त्राय । जेथें ऐक्यमय तुका झाला[१०८] ॥ ४ ॥

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः ।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥ ४ ॥

२०६. बोलती ते सांख्ययोगासी पंडित । पृथक् अज्ञानांत ज्यांची बुद्धि ॥१॥ कीं हा एक दिसे अनुष्ठील तया । फळ पावे द्वयांमाजी एक ॥२॥ आतां विचारांत वरी दृष्टि देई । जेणें तुक्याठायीं विरामेल ॥ ३ ॥

यत् सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।
एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥

२०७. पावती ज्या स्थळा सांख्य अनुभूती । तेथेंच पावती योगीराज ॥१॥ सांख्ययोगा ऐसें ऐक्य जो पाहील । डोळस होईल पार्थिवा तो ॥२॥ श्रीकृष्णवचन प्राण हा वेदांचा । तुका म्हणे साचा अनुभव ॥ ३ ॥

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

२०८. नव्हे ऐसा तो संन्यास । दुर्लभ कर्मांविण ओस ॥ १ ॥ कर्मयोग आचरणी । घेती स्वसुख निर्वाणी ॥ २ ॥ पावे झडकरी परब्रह्म । ऐसा मार्ग हा सुगम ॥ ३ ॥ तुका म्हणे आन एक । ऐका बुद्धीचे बोधक ॥ ४ ॥

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रियः ।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

२०९. चित्तशुद्धि कर्मयोगें । कोणा पुसावें न लागे ॥ १ ॥ अहो जिंकुनियां मन । केलीं इंद्रियें स्वाधीन ॥ २ ॥ जीव भूतांचा हा देह । नलगे किमपी संदेह ॥ ३ ॥ अलिप्त जो करितांही । तुका म्हणे तो विदेही ॥ ४ ॥

---

* = पासून. १०८. ‘ झाला ’ ऐवजीं ‘ म्हणे ’—पाठ प्र. १.

नैव किंचित् करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यञ्शृण्वन् स्पृशञ्जिघ्रन्नश्नन् गच्छन् स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥

२१०. ऐसें कांहीं न करी तो । स्मृति साक्षीतें वर्ततो ॥ १ ॥ मानितो नित्याचारी । तत्त्ववेत्ता ब्रह्मचारी ॥ २ ॥ विषयीं वर्ततां जातां । न सुटे समाधी तत्त्वतां ॥ ३ ॥ निद्रा घेतां श्वास सांडी । तुका म्हणे सहज खोडी ॥ ४ ॥

प्रलपन् विसृजन् गृह्णन्नुन्मिषन् निमिषन्नपि ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥

२११. वाचा पाणि पाद लिंग । गुद पांच हें कर्मांग ॥ यांच्या आचरतां क्रिया । अंतर शुद्ध बाहेर माया ॥ २ ॥ निमिषादिकहीं हालतां । छिन्न नव्हे संयोगता ॥ ३ ॥ इंद्रियें आत्मविषें । पैं वागतां तुका हर्षे ॥ ४ ॥

ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥ १० ॥

२१२. कर्मे ब्रह्मीं समर्पून । झालें मानस उन्मन ॥ १ ॥ करी सांडुनियां संग । निरपेक्ष तोचि चांग ॥ २ ॥ पापें न लिंपे तो जैसे । स्फटिक रंगाचे कडवसे ॥ ३ ॥ जळीं पत्र कमळणीचें । तुकयासी साम्य त्याचें॥४॥

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥

२१३. काया मानस एकाग्र । बुद्धि होऊं नेदी उग्र ॥ १ ॥ गेली वासना पळाली । करणें एका पंथीं आली ॥ २ ॥ मन[१०९] वांच्छी चित्तशुद्धी । करी निःसंगमत्व[१०९] सिद्धी ॥ ३ ॥ संग टाकुनियां क्रिया । स्वात्मप्राप्ती हे तुकया ॥ ४ ॥

---

१०९. ' मन ' ऐवजीं ' मग '—पाठ प्र. ४ व १, ' निःसंगमत्व ' ऐवजीं ' निःसग नत्वें '—पाठ प्र. ६.

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ॥
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥

२१४. योगी ऐशा चिन्हीं जाण । कर्मफळीं निराकरण ॥ १ ॥ आत्मस्थितीस पावला । सहज शांति आली त्याला ॥ २ ॥ सकामता लागे पाप । जेथें कामनासंकल्प ॥ ३ ॥ बद्ध फळांशें बाधतो । तुका म्हणे वायां जातो ॥ ४ ॥

सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन् न कारयन् ॥ १३ ॥

२१५. करुन निष्कामें कर्मास । योगी संपादी संन्यास ॥ १ ॥ सुखी होऊनियां मनें । न करी क्षुद्रादि साधनें ॥ २ ॥ नवद्वारें पुरे देहीं । वस्ती संरक्षी विदेही ॥ ३ ॥ स्वयें न करी करवीही ना । तुका म्हणे इतर जना ॥ ४ ॥

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

२१६. कर्तृत्वकर्म लोकांचें । अथवा त्यांच्या प्रपंच्याचें ॥ १ ॥ ईश्वर निर्मूनि निराळा । कर्मसाक्षित्वें वेगळा ॥ २ ॥ न तो कर्मास करवी । अथवा फलश्रुति भोगवी ॥ ३ ॥ वर्ते संसाराचें चक्र । तुका सर्वदा अवक्र ॥ ४ ॥

नादत्ते कस्यचित् पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ १५ ॥

२१७. पापही ने घे तो कोणाचें । जेणें योगें पूर दुःखाचें ॥ १ ॥ ने घे पुण्यही ईश्वर । पावावया स्वर्गद्वार ॥ २ ॥ अज्ञानानें जें वेष्टित । ज्ञान मोहें विस्काळित ॥ ३ ॥ यास्तव करिती भोगिती । तुका म्हणे अहंमती ॥ ४ ॥

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत् परम् ।। १६ ।।

२१८. अज्ञान निज बुद्धीचें । नाशी ज्ञान जिव्हाळ्याचें ।। १ ।। परि ज्ञान शुद्ध चोखट । नाशी अज्ञानाचें दुःख ।। २ ।। परा जडाचें तें ज्याचें । अंध नेत्र तिमिराचे ।। ३ ।। ज्ञानसूर्य उदयांत । तुका झाला स्वरूपवंत ।।४।।

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ।। १७ ।।

२१९. बुद्धि चित्त त्याची ज्ञानीं । एकविध नियमुनी ।। १ ।। परमाश्रयें तोचि निष्ठा । साजे सदा योगभ्रष्टा ।। २ ।। मोक्ष पावती ऐसे ते । विश्वंभरीं एक चित्तें ।। ३ ।। तुका म्हणे दग्ध केलें । ज्ञानें संचित जाळलें ।। ४ ।।

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ।। १८ ।।

२२०. विद्याविनयसंपन्न[११०] । अयाचित लोकमान्य ।। १ ।। ब्राह्मणी धेनूंमध्यें । यातिभेदादि संबंधें ।। २ ।। गजी शुनी ते चांडाळी । सम पंडित त्याह्याळीं ।। ३ ।। ज्ञान ज्याचें अखंडीत । तुका म्हणे तो पंडित ।। ४ ।।

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ।। १९ ।।

२२१. सर्वां भूतीं आपुलें मन । जेणें समान स्थापिलें ।।१।। तेणें जीत असतां वीरा । केला मातेरा भवाचा ।। २ ।। सम ब्रह्म तें निर्दोष । जें निःशेष निर्मळ ।।३।। तस्मात् ब्रह्मीं न ते समीं । तुकया वर्मीं मन राते ।। ४ ।।

---

११० ‘ विद्याविनयसंपन्न ’ ऐवजीं ‘ विद्यासद्गुणसंपन्न’—पाठ प्र. १ व ५.

न प्रहृष्येत् प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् ।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

२२२. न हर्षे प्रिय होतांना । ज्याच्या मना निश्चळता ॥ १ ॥ नोहे घाबरा अप्रियें । ज्ञानराय ज्ञान्यांचा ॥ २ ॥ न जो मूढ स्थिरबुद्धी । देह-बुद्धी रहीत ॥ ३ ॥ ब्रह्मीं स्थिर ब्रह्मवेत्ता । तुकया चित्ता मिळाला ॥ ४ ॥

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत् सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

२२३. स्पृहा न बाह्य विषयीं । एके ठायीं एकला ॥ १ ॥ सुख पावतां स्वरूपीं । सहज पापीं त्यागिला ॥ २ ॥ युक्तचित्त ब्रह्मयोगी । सुखा भोगी अक्षया ॥ ३ ॥ तुका म्हणे यापरतें । काय उरतें बोलाया ॥ ४ ॥

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।
आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

२२४. जो कां स्पर्शे भोगविषय । मोह बाह्य धरूनी ॥ १ ॥ तें तव कारण दुःखाचें । जेथें वेंचे आयुष्य ॥ २ ॥ आद्यंतवंत पार्था । हे अवस्था भूमीची ॥ ३ ॥ रमे ज्ञानी न त्या सुखीं । तुका दुःखी प्रपंचीं ॥ ४ ॥

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक् शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

२२५. जो जिताचि अर्जुना । सोढूं भावना शकेल ॥ १ ॥ पूर्वीच मरणाहुनी । त्याहाळुनी उपेक्षी ॥ २ ॥ कामवेग क्रोधोद्भव । स्वानुभव रक्षक ॥ ३ ॥ नर तो सुखी तोंचि योगी । पांडुरंगीं तुकया तो ॥ ४ ॥

योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

२२६. अंतरसुखी अंतरिं रमे । उंच प्रेमें निर्मळ ॥ १ ॥ अंतरयोतींत जो स्वतां । निर्मुक्तता प्रपंचीं ॥२॥ योगि ब्रह्मचि तो झाला । सांग त्याला उणीव ॥ ३ ॥ पावे निर्वाणपदा । तुकया सदा हरिकृपें ॥ ४ ॥

लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

२२७. लाभे ब्रह्मरूपता देही । निःसंदेही आकल्प ॥ १ ॥ क्षीणपातक जे ज्ञानी । जगीं बसुनी अलिप्त ॥ २ ॥ स्थिरमति नासे द्वैत । यातायात नोळखे ॥ ३ ॥ सर्वभूतहितीं रत । पाहाती संत तुकयासी ॥ ४ ॥

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

२२८. कामक्रोधाविरहीत । झाला संत तो एक ॥ १ ॥ जेणें प्रयत्न केला बहू । मन बाहू कवळिला ॥ २ ॥ देह मग मरो वांचो । अथवा सांचो संपत्ती ॥ ३ ॥ केवळ मुक्त आत्मविद । तुकया पद वंदित ॥ ४ ॥

स्पर्शान् कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥ २७ ॥

२२९. पुढें साहावे प्रसंगीं । सांगणें आहेच योगी । ययालागीं तो सारंगी । दंश येथें जाणवी ॥ १ ॥ आस्था लागावी अर्जुना । ऐसी मनाची वासना । म्हणोनि सांख्य तें सज्जना । यथा शक्ति सांगत ॥ २ ॥ बाहेर बाह्य विषयां । वीतरागें दापूनियां । दृष्टि देऊनि भोंवया । मध्यभागीं अवकाशीं ॥ ३ ॥ घ्राणीं वाहे निज प्राण । तेविंच मेळवी अपान । तुका वदे देतो मान । लोकांमध्यें योगिया ॥ ४ ॥

यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

२३०. बुद्धींद्रियें हीं आकारा । मन धरणें साधन धारा । मुनि मोक्षाच्या मंदिरा । एकसरां चालिले ॥ १ ॥ चाड न धरी सिद्धिची । तेविंच कामना मोक्षाची । झाला मुक्त सव्यसाची । पुनः पुनः किती सांगूं ॥ २ ॥ पैं गा जन्माचें सार्थक । मातें भासे हेंच एक । जाणुन तुकयाचा विवेक । पदरीं घेती ज्ञातये ॥ ३ ॥

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥

२३१. भोक्ता यज्ञतपांचा मी । आहें ऐश्वर्यभूमी । सर्व लोकीं महेश मी । सखा तेवीं सर्वांचा ॥ १ ॥ ऐसा प्रभूचा अन्वय । झाला तेथें अहं-क्षय । मग शांति वधुप्राय । तो पावतो निर्मळ ॥ २ ॥ तुका विनवी वारंवार । माझ्या मतीं हर्ष फार । संतीं न करावा अव्हेर । प्राकृत भाषा म्हणोनी ॥ ३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे कर्मसंन्यासयोगो नाम पञ्चमोऽध्यायः ॥ ५ ॥

इति श्री भगवद्गीता अभंगात्मक पंचमोऽध्यायः४६ ॥

॥ अथ षष्ठोऽध्यायः ॥

## — आत्मसंयमयोग —

श्रीमद्भगवद्गीता अभंगात्मक षष्ठमप्रसंग[४६]

**श्रीभगवानुवाच ।**

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥**

२३२. पांडवासी विस्मय । देव वदतां योगिराय । आपणा ठावका अन्वय । असावा हें वाटलें ॥ १ ॥ मग पुसावें ह्या हेत । कां कीं जेथें हरि प्रीत । तेंच आपुलेंही हित । हें तों कधीं टळेना ॥ २ ॥ ऐसा भाव अंतरींचा । जाणुनि सखा वदे वाचा । ऐके पार्था संशयाचा । मूळ ठावो फिटेल ॥ ३ ॥ आम्हीं अंतरीं ठेविजे । मग तें कोणासी अर्पिजे । ऐसें न भेटेल दुजें । पैं मायेचें आवडतें ॥ ४ ॥ अन्यायासी वंची जो कां । होय अधिकारी पातका । असो काळजी सूटका । आजि झालें हें भाग्य ॥ ५ ॥ दाना योग्य तूं सत्पात्र । जैसे कन्येजोगें गोत्र । अथवा परमार्थी श्रोत्र । जैसा दीजे विरक्ती ॥ ६ ॥ तरी ऐके विचक्षणा । गुज घेई अंतःकरणा । अनाश्रित[१११] हे वासना । कर्मफळीं ज्या नाहीं ॥७॥ करावें तें करी तो । तोच योगी संन्यासी तो । न निरग्निही जो होतो । अक्रिय तो पैं नाहीं ॥८॥ तुका वदे विचक्षणीं । मांदुस गीतारत्नखाणी । घ्यावें एकेक निवडुनी । वचनें शेषशायींचीं ॥ ९ ॥

**यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पाण्डव ।**
**न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥**

---

१११. ‘ अनाश्रित ’ ऐवजीं ‘ अनश्रुत ’—पाठ प्र. ४ व ६.

२३३. म्हणावा जो संन्यास तो । कर्मयोग सिद्ध होतो । दोहीं मार्गे जैसा जातो । एका क्षेत्रा वंदाया ॥१॥ कीं या काम्याचे त्यागें । जो संन्यास घेतो अंगें । कर्मयोगही प्रसंगें । नव्हे कांहीं दुसरा ॥२॥ तुका विनवी भावार्थी। लोक परिसो परमार्थी । ज्यास प्रीत योगपंथीं । अहर्निशीं अखंड ॥३॥

**आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।**
**योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥**

२३४. योगारूढ जो कां ज्ञाता । जगीं व्हावया मान्यता । संपादित आमुची वार्ता । पैं गा जीवीं धरूनी ॥१॥ कर्म त्यासही पांडवा । कारण या गौरवा । जैसा तेलबळें दिवा । प्रभा दावी अनंत ॥२॥ तया योगारूढालागीं। ध्यानस्थित कारण अंगीं । पुढें उजळी हेमांगी । तुकया कारागीर तो ॥३॥

**यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।**
**सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥**

२३५. जेव्हां न विषयीं कदा । गुंते दैवीक संपदा । तुज सांगतो प्रमदा । लाघव जैसे शुकासी ॥ १ ॥ कर्मीही न रुते मन । जैसे श्रीपादासी स्वप्न । झाला गजवाजी वाहन । जागा होतां तें मिथ्या ॥ २ ॥ टाकी भोगाचे संकल्प । गेला जीवींचा विकल्प । तेव्हां आरूढ ज्ञानदीप । तुकया ऐसें बोलतो ॥ ३ ॥

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।**
**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥**

२३६.अरे विषयडोहांत । जें कां बुडालें संतत । तें तंव उद्धरावें चित्त । आत्मबळें अभ्यासें ॥ १ ॥ नये बुडवूं प्रपंचीं । पुढें जाणीव गेल्याची । कोण पुसे धनवंताची । लाज जाय धन गेल्या ॥२॥ मित्र हें आपुलें चित्त । साह्य झाल्या फळ देत । शत्रूही हेंच होत । हा उद्धरूनी अनर्थ [११२] ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्वांचीक । साधन हेंचि गमे एक । चित्त झाल्या प्रसन्मुख । काय उणें लाभासी ॥ ४ ॥

---

११२. या पादाऐवजीं ‘ हाडे धरूनी अनर्था ’—पाठ प्र. १.

बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

२३७. मित्र चित्त तें म्हणावें । जें कां स्वरूपीं विसांवे । विश्वरूप अनुभवें । जिंकी स्वात्ममतीनें ॥ १ ॥ हें कां अलभ्य साधन। विधि इंद्र चंद्रेशान[113] । मनवती ऐसा मान । पैं भोगी ते निवाडे[114] ॥ २ ॥ नाहीं तरी अज्ञानांत । मिथ्या भवसिंधु दावित । तुका म्हणे जीव भ्रांत । होय शुद्ध हें झाल्या ॥ ३ ॥

जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

२३८. अरे शांताचे कुरुपती । जितचित्ताची आयती । थोरपण हे निगुती । चित्त थोर स्वरूपीं ॥ १ ॥ त्याचें चिन्ह हेंचि वीरा । मान अपमान वारा । झगटल्या या शरीरा। मेरु ऐसी धैर्यता ॥ २ ॥ तैसेंच शीत उष्ण । विषामृता जैसा कृष्ण । सुखदुःखीं तो सहिष्ण । तुकया चर्को[115] नेदी जें ॥ ३ ॥

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ॥ ८ ॥

२३९. ज्ञान भोज्य गुरुहातें । धाला जेवूनि तृप्तीतें । सुखें उद्गार अवचितें । पैं गा देत सर्वदा ॥ १ ॥ जितेंद्रिय ब्रह्मचारी । राहे कूटस्थ व्यापारी । भास न भासे अंतरीं । ज्याचा अंत आढळेना ॥ २ ॥ तोच योगारूढ हेम । भेंडा[116] धोंडा जया सम । तुका म्हणे सर्वोत्तम। हे रोकडी प्रतीती[117] ॥ ३ ॥

११३. = ब्रह्मदेवादिकांना

११४. ‘ निवाडे ’ ऐवजीं ‘ निवावे ’—पाठ प्र. ६.

११५. ‘ चर्को ’ ऐवजीं ‘ चळों ’—पाठ प्र. १.

११६. = मातीचें ढेंकूळ.

११७. ‘ प्रतीती ’ ऐवजीं ‘ प्रचिती ’—पाठ प्र. १.

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

२४०. कोणी कापिलिया मान । दुःखें न पावे रुदन । मित्र जोडे राजशुन । गजवाहनीं मिरवी ॥ १ ॥ दोन्ही सारिखे जयासी । तैसे चित्त सख्यापासी । घेत नित्य विसाव्यासी[११८] । असखाही तेवींच ॥ २ ॥ साधु भोंधू[११९] मिथ्या बोली । समबुद्धि पुजा केली । तुका म्हणे ज्ञानवल्ली[११९] । त्याची झाली सुफळ ॥ ३ ॥

योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

२४१. कर्मयोगी चित्त योजी सदोदित । जैसा रोगी घेत दिव्य रस ॥ १॥ एकांत सेवन आवडतें मन । पथ्या न लोटून शहाणा वागे ॥ २॥ स्थिरचित्तें चिंती एक जगत्पती । सद्विद्या सत्प्रीती अनुरागें[१२०] ॥ ३ ॥ टाकी आशा तैसा परिग्रह वीरेशा । नाहीं जीवदशा तुका म्हणे[१२१] ॥ ४ ॥

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

२४२. स्थापुनियां शुद्ध देशीं ये प्रसिद्ध । प्रयाग अंबुद संतग्राम ॥ १॥ स्थिर हें आपुलें आसन जेणें केलें । बहू ऊंचललें ऐसें नको ॥ २ ॥ नीच तरी भूमि दोष लागे ऊर्मी । कुशमृगचर्मी पट दिव्य ॥ ३ ॥ तेथें सुमुहूर्तें बैसावें निरुतें । आठवी गुरुतें तुका म्हणे ॥ ४ ॥

---

११८. 'विसाव्यासी' ऐवजीं 'विश्रांतीसी'—पाठ प्र. १ व ५.

११९. 'साधुभोंदू' ऐवजीं 'साधुबोधा'—पाठ प्र. ४ व 'ज्ञानवल्ली' ऐवजीं 'ज्ञानवेली'—पाठ प्र. १.

१२०. या चरणाऐवजीं 'सद्वैद्यासी प्रीति अतुरातें'—पाठ प्र. १.

१२१. या चरणाऐवजीं 'कां जे जीवदशा नाहींच ते ॥ ४ ॥' यापुढें : 'तुका म्हणे संता । हे प्रचिती घेतां । सर्वज्ञ तो चित्ता । माजी ठेवी ॥ ५ ॥' —पाठ प्र. १.

**तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः ।**
**उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥**

२४३. करुनी मानस एकाग्र ह्य्यास । नेदीं बाह्य पैस मना घेवो ॥ १ ॥ स्थिर चित्त होय इंद्रिय सक्रीय[१२२] । वोळंगती[१२३] पाय सदोदित ॥ २ ॥ चित्तशुद्ध्यर्थीचा योग पैं हटाचा । जयो आसनाचा तुका म्हणे ॥ ३ ॥

**समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।**
**संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥**

२४४. माज पाठ शीर ग्रीवा नीट स्थिर । धरुनी निर्धार स्थिर[१२४] कीजे ॥ १ ॥ उठतां उपाधी तैशा देहीं आधीं । गिळीजे अंबुधी नदा जैसा ॥ २ ॥ आवरोनि मना धरी जो धारणा । तुका म्हणे जाणा जोगिया तो ॥ ३ ॥[१२५]

**प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।**
**मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥**

२४५. असे सर्व काळ चित्तासी निरवळ । योजून प्रबळ निर्भय जो ॥ १ ॥ शांत मति करणें जिंकी अंतःकरणें । व्रतं निर्मळपणें आचरे हें ॥ २ ॥ चित्तासी मद्रूपीं लावून निक्षेपीं । वसे स्वस्वरूपीं मत्पर जो ॥ ३ ॥ तुका म्हणे तेथें सिद्धि स्वसामर्थ्यें । येतां योगिनाथें न पाहाणें ॥ ४ ॥

---

१२२. ' इंद्रिय सक्रीय ' ऐवजीं ' इंद्रियांस क्रिया '—पाठ प्र. ४.

१२३. = ओळंगती किंवा वळंगती; टांगती.

१२४. ' स्थिर ' ऐवजीं ' दृढ '—पाठ प्र. १.

१२५. या तिसऱ्या चरणाऐवजीं " लोकावरिल तें । काढोनि मागतें । दृष्टि ठेवि चित्तें । प्राण अग्रीं ॥ ३ ॥ कैसा ध्वनि कोठें । लोकीं दीशा राहाटे । तुका म्हणे दीठे । न पाहिजे ॥ ४ ॥ "—पाठ प्र. १ व २.

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।**
**शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥**

२४६. एवं चित्त ऐसें योजून विन्यासें । मन ह्यातीं तैसें आकळावें ॥ १॥ मोक्षा अधिकारी होय निर्विकारी । शांतिदेवी वरी श्रीकृष्णाची ॥ २ ॥ तुका म्हणे येथें संशयी अनाथ । पडती त्या पंथ लावी देवो ॥ ३ ॥

**नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।**
**न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥**

२४७. नव्हे योग ऐसा खावें बहु तैसा । लंघनें भरंवसा जाय सारा ॥ १॥ बहु झोंप घेणें योगाचीं लक्षणें । न होती कीं जागणें चिर जेथें ॥ २ ॥ अर्जुना तूं जाण योगाचें प्रमाण । अंतरींची खुण आम्ही सांगों ॥ ३ ॥ तुका म्हणे देवो कृपाळू पाहा वो । योगाचा वोल्हावो आतुडवी ॥ ४ ॥

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥**

२४८. युक्तीनें वागीजे शीण न आणिजे । आहार घेईजे स्वल्प तैसा ॥ १ ॥ चेष्टा कर्मसूत्रें युक्तीचीं पवित्रें । जाणिजे स्वतंत्रें जाणतेनीं ॥ २॥ निद्रा केवीं जागा येथें महाभागा । युक्ति शुद्ध गंगा पाहिजे गा ॥ ३ ॥ तयासी हा दुःख नासोनि दे सुख । तो योग पैं चोख तुकया लाभे ॥ ४ ॥

**यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।**
**निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥**

२४९. आत्मस्वरूपीं चित्त रमे सदोदित । निःस्पृह संतृप्त कृपाघन ॥ १ ॥ काम होय शुन्य गति ते अनन्य । पाहातां अमान्य न हों आम्ही ॥ २ ॥ सिद्ध ऐसें त्यातें म्हणावें सर्वार्थें । ऐसें रमानाथें वर्णियलें ॥ ३ ॥ ध्यान कैसें कीजे तें श्रोतीं घेईजे । तुका म्हणे माझें हित ऐका ॥ ४ ॥

**यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ।**
**योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः ॥ १९ ॥**

२५०. निर्वात सदनीं दीप उपमेनी[126] । चंचळ आसनीं होऊं नये ॥ १ ॥ योगीयाचें चित्त मिळे ऐक मात । मजला[127] हे मात एकवीध ॥ २ ॥ किंवा पतीव्रता आलिंगित कांता । वियोगाची वार्ता सहज राहे ॥ ३ ॥ तुका म्हणे घनवृष्टिधरासन । तैसें योगीं मन स्थिरावलें ॥ ४ ॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।**
**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥**

२५१. जेथें उपरमे चित्त योग प्रेमें । सहज देहधर्में सांडावला ॥ १ ॥ योगाचिया पंथें निरोधी सर्वार्थें । उसंत पैं जेथें विरामलें ॥ २ ॥ जेथें आत्मा मिळे चित्तानंदमेळें । अखंडित खेळे निरामयीं ॥ ३ ॥ पाहातो षडष्-पद जेवीं अरविंद । तुका म्हणे नाद मुरे ठायीं ॥ ४ ॥

**सुखमात्यन्तिकं यत् तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ।**
**वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥**

२५२. नसे अंत त्यास अनंत म्हणावें । सुखानें मिळावें ऐसें ठायीं ॥ १ ॥ बुद्धि दृढ धरी तैसींच इंद्रियें । दमी योगराय योग्यांचा तो ॥२॥ जाणें त्यांतें मग तो हा करितां कर्म । वृत्तीस जो धर्म चळों नेदी ॥ ३ ॥ धाऊलें पांथिक जैसी उपेक्षीना । तुका म्हणे मना धरुनी वागे ॥ ४ ॥

**यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।**
**यस्मिन् स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥**

२५३. न मानी तो लाभ अधिक त्याहूनी । जीवा समाधानी अखंडित ॥ १ ॥ ज्या सुखाची गती हातास आलिया । मग कष्ट झालियां नेघे

१२६. ‘ उपमेनी ’ ऐवजीं ‘ उमेनी ’—पाठ प्र. ४ व ५.

१२७. ‘ मजला ’ ऐवजीं ‘ मासला ’—पाठ प्र. १.

जीवीं ॥ २ ॥ आधिव्याधि रोग राजक्षोभ झाला। तुका म्हणे त्याला आठवेना ॥ ३ ॥

तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम्।
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

२५४. दुःखसंयोगाची धुळी अंगा न लागे। नभ जैसें न भंगे[१२८] वज्रघायें ॥ १ ॥ बुद्धियोगीं कैसी पाण्यांत[१२९] मासोळी। मग तळमळी पार्था[१२९] कोण ॥ २ ॥ चित्त आत्मरूपीं राहे सर्व काळ। ऐसें यत्नबळ स्वीकारीं तूं ॥ ३ ॥ निश्चयें[१३०] सुदृढें ऐसाच साधावा। तुका म्हणे दावा यम न करी ॥ ४ ॥

संकल्पप्रभवान् कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः।
मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ॥ २४ ॥

२५५. संकल्प करितां कामातें त्यागुनी। शुचि अनुष्ठानी सर्वत्यागें ॥१॥ मनस्वी खेळतो विषयद्वारीं खेळ। कर्णग्रामबळ भंजी छंदें[१३१] ॥ २ ॥ सर्वाठायीं दंड मना-हातीं दिला। कीं वाल्हा[१३१] बैसला रामजपीं ॥ ३ ॥ तुका म्हणे गोष्टी फुकट न साधे। विरळा कोटीमधें योगीरावो ॥ ४ ॥

शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥ २५ ॥

२५६. धारणा युक्तीनें गुरुमुखें साधी। सहज समाधी प्राप्त होय ॥ १ ॥ नव्हे गाढमूढ लोक रंजवणें। तटस्थता येणें देहावरी ॥ २ ॥ ताटस्थ्या तें नाम समाधि बोलती। उघड फजिती जनांमध्यें ॥ ३ ॥ येथें

---

१२८. ‘ न भंगे ’ ऐवजीं ‘ उबगे ’—पाठ प्र.४

१२९. ‘ पाण्यांत ’ ऐवजीं ‘ उदकीं ’ व ‘ पार्था ’ ऐवजीं ‘ अर्थ ’—पाठ प्र. १ व ३.

१३०. ‘ निश्चयें ’ ऐवजीं ‘ निश्चळ ’—पाठ प्र. ४.

१३१. ‘ छंदें ’ ऐवजीं ‘ यत्नें ’ व ‘वाल्हा’ ऐवजीं ‘लांबा’—पाठ प्र. १.

स्वरूपांत प्रवेशे हळुहळु । स्थिर मन मेळू चिन्मात्रींच ॥ ४ ॥ कांहीं न चिंतावें मग पैंठा[१३२] झाल्या । तुका म्हणे आल्या तिन्ही लोक ॥ ५ ॥

**यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।**
**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥**

२५७. ज्या ज्या पैं पदार्थी चित्ताचें चळण । निधे तेथें ज्ञान शुद्ध ठेवी ॥ १ ॥ मन हें अस्थिर चंचल पांडवा । याचा नित्य दावा परमार्थी ॥ २ ॥ म्हणोनि जें पाहे तेथें आत्मा लावी । वशत्वें वळवी मनोवृत्ती ॥ ३ ॥ त्यांतचि असतां विसरलें पुरें । करावे जागे रे तुका म्हणे ॥ ४ ॥

**प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।**
**उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥**

२५८. ऐसे या चित्तानें प्रशांत दशेला । योग्य भासे मला सुख पार्था ॥ १ ॥ साधे रजतमातीत ब्रह्मता । रुप अकर्मता तुका म्हणे ॥ २ ॥

**युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।**
**सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ २८ ॥**

२५९. चित्त सदा योजी जैसी कामी वधू । किंवा लक्ष व्याधु धरी बनीं ॥ १ ॥ योगी तो पांडवा दुजी न वासना । मायेविण तान्हा सुख नेणें ॥ २ ॥ ब्रह्मस्पर्शे निवे सायासें वेंचला । अत्यंत सुखाला भोक्ता तोच ॥ ३ ॥ इतर तीं भोगें नव्हे संपादणीं । तुका ते काहाणी ऐकेचना ॥ ४ ॥

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥**

२६०. सर्व भूतांमध्यें आत्मा असे एक । भूतें सकळीक आत्मयांत ॥ १ ॥ नित्य योगी चित्त ऐसें ठेवी जरी । सर्व नेत्रद्वारीं समदर्शी ॥ २ ॥ योग नव्हे तरी ऐसें मार्ग चाल । येणें योगें फोल नव्हे साधु

---

१३२. = नौका.

॥ ३ ॥ तुका म्हणे कृष्ण एक नवल सांगे । तो श्लोक प्रसंगें ऐकिजे हो ॥ ४ ॥

**यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।**
**तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥**

२६१. मातें सर्वत्रांत जो पाहे अर्जुना । जगाची भावना दिसे जया ॥ १ ॥ मज आंत विश्व घेत हा अन्वय । व्यतिरेकें सव्य योगचि तो ॥ २ ॥ सोडिना मीं मग त्याचा त्यास झाल्या । सृष्टि प्रळय गेल्या रसातळीं ॥ ३ ॥ तोही मग मज सोडीना सहसा । तुका म्हणे कैसा लाभची हा ॥ ४ ॥

**सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः ।**
**सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥**

२६२. सर्व भूतस्था त्या मातें जाणोनियां । भजे एकत्वीं त्या भाव जरी ॥ १ ॥ मजमध्येंचि तो योगिया जाण पां । तेजगर्भीं आपा वस्ति जैसी ॥ २ ॥ जरी तो प्रपंचीं सर्वथा गुंतला । तरी मुक्तत्वाला काय वाणू ॥ ३ ॥ तुका म्हणे ब्रह्मलोकींचे रहिवासी । आले या घरेसी साकारत्वें ॥ ४ ॥

**आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥**

२६३. समदृष्टि सर्वभूतें । जो कां पाहे मद्रूपातें ॥ १ ॥ मजसमान जाणिजे । योगी अर्जुना वंदिजे ॥ २ ॥ देहीं सुखदुःख लागे । त्याचा निरवर न पांगे ॥ ३ ॥ देव म्हणे माझ्या बोलें । श्रेष्ठ तुकया कळलें ॥ ४ ॥

**अर्जुन उवाच ।**

**योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।**
**एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात् स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥**

२६४. करांजुली जोडोनियां । अर्जुन पुसे कृष्णराया ॥ १ ॥ आतां योग बोलिलासी । साम्यें श्लोक-चतुष्टयासी ॥ २ ॥ स्थिर मी याच्या

स्थिती । न देखें हे कोण गती ॥ ३ ॥ सांग मातें मधुसूदना । तुका म्हणे जगजीवना ॥ ४ ॥

**चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥**

२६५. मन हेंच कृष्णदेवा । चंचल वागवी स्वभावा ॥ १ ॥ इंद्रियांत बलोत्तर । ब्रह्महरां अगोचर ॥२॥ याचा निग्रह वायूची । मोट बांधूं शक्ति कैंची ॥ ३ ॥ तुका येतो काकुळती । एवढी वारावी फजिती ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।**
**अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥**

२६६. हास्यमुखें दैत्यध्वंस । वदे खरेंच प्रश्नास ॥ १ ॥ तुवां केलें धनुर्धरा । महाबाहो पार्थवीरा ॥ २ ॥ मन चंचळ दुर्जय । आहे मजला प्रत्यय ॥ ३ ॥ तरी अभ्यासवैराग्यें । मन वळिजे संतसंगें ॥ ४ ॥ जिंकिजेल जैं तें मन । तुकया तेव्हां समाधान ॥ ५ ॥

**असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।**
**वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥**

२६७. माझी हेचि बुद्धि कीं रे । योग नोहे साचोकारें ॥ १ ॥ मन नाटोपे जंववरी । योगसिद्धि न त्या वरी ॥ २ ॥ म्हणोनि प्रयत्नशीलानें । वश्य कीजे या साधनें ॥ ३ ॥ यत्नशीलापुढें किती । मग या दुर्मनाची ख्याती ॥ ४ ॥ वृथा भय इंद्रियांचें । तुकया बाळा बागुलाचें ॥ ५ ॥

**अर्जुन उवाच ।**

**अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।**
**अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥**

२६८. अर्जुन पुन्हां विनवितो । एक ऐकें हा शब्द तो ॥ १ ॥ निष्ठा असोनि आळस । नाहीं केला पूर्णाभ्यास ॥ २ ॥ पुढें साधनीं बैसतां ।

गेलें आयुष्य अनंता ॥ ३ ॥ चळे मन दोही पक्षीं । ना तो प्रपंच कमळाक्षी ॥ ४ ॥ कृष्णा त्यासी गति कोण । सांगे तुका म्हणे खूण ॥ ५ ॥

कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥

२६९. तो काय उभयभ्रष्ट । मेघ थिगळ पैं नष्ट ॥ १ ॥ अपक्कें मोह पावे । ब्रह्ममार्गी न त्या पावे ॥ २ ॥ महाभुजा देवराजा । मतें आमुचें या काजा ॥ ३ ॥ तुका म्हणे हेंच भय । वाटे साधकां निश्चय ॥ ४ ॥

एतन्मे संशयं कृष्ण च्छेत्तुमर्हस्यशेषतः ।
त्वदन्यः संशयस्यास्य च्छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

२७०. निःशेष या संशयासी । उरो नेदी हे विवसी ॥ १ ॥ तूं एक छेदिसी श्रीकृष्णा । आहे भरंवसा सहिष्णा ॥ २ ॥ संहर्ता या संशयाचा । ऐसा प्रताप कोणाचा ॥ ३ ॥ गुरु न दिसे तुजवीण । तुका वाहे आपुली आण ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच ।

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
न हि कल्याणकृत् कश्चिद्‌दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

२७१. हर्षे बोले भगवान । वायां न जाय साधन ॥ १ ॥ येथें अथवा स्वर्गांत । बाधा त्यासी अपीडित ॥ २ ॥ मार्ग कल्याणदायक । कोणी दीन नव्हे लोक ॥ ३ ॥ बापा न जाय दुर्गती । तुका म्हणे याच गती ॥ ४ ॥

प्राप्य पुण्यकृतान् लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

२७२. पुण्यलोकातें पावुनी । राहे अमृत सेवुनी ॥ १ ॥ हर्षे भोगी कल्पवरी । त्याची सत्ता सुरांवरी ॥ २ ॥ मग इच्छा फिरलिया । पावे मृत्युलोकीं यया ॥ ३ ॥ शुचि श्रीमंत घरांत । योगभ्रष्ट तुका मुक्त ॥ ४ ॥

**अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।**
**एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ।। ४२ ।।**

२७३. किंवा योगीयाचे पोटीं । योगभ्रष्ट पावे हटी ।। १ ।। अथवा भले कुळीं लोक । तेथें होय प्रकाशक ।। २ ।। जन्म दुर्लभ इशाना[१३३] । ऐसा लोभ त्या सज्जना ।। ३ ।। मातापिता उभयपक्षीं । तुका वदे देव साक्षी ।। ४ ।।

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।**
**यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनन्दन ।। ४३ ।।**

२७४. या देहीं पूर्वाभ्यासा । निज मानसा पावेल ।। १ ।। पावे बुद्धिचा संयोग । पुन्हां योग आरंभी ।। २ ।। मग मोक्षीं बहु यत्नें । वेंची रत्नें मतीचीं ।। ३ ।। कुरुनंदना सायास । तुका बहुवस स्वीकारी ।। ४ ।।

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।**
**जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ।। ४४ ।।**

२७५. अभ्यास तो त्याला पूर्व । बळ सर्व पावे तो ।।१।। बळ योजीं[१३४] चित्त जोडे । भ्रांति उडे मायिक ।। २ ।। जिज्ञासु वेदागमा । शब्दब्रह्मा मिळाला ।। ३ ।। न पडे धनदारपालवीं । तुकया चवी लागल्या ।। ४ ।।

**प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ।। ४५ ।।**

२७६. योग साधितां प्रयत्नें । अलभ्य रत्नें हातीं ये ।। १ ।। जाय वासना पातकी । काया निकी प्रक्षाळी ।। २ ।। अनेक जन्म क्रियमाणा । मुक्तिराणा वरिला तो ।। ३ ।। तुका म्हणे हित दिसे । तरि अनायासें ऐकावें ।। ४ ।।

---

१३३. = ( ईदृश ) अशांना.

१३४. ' बळ ' ऐवजीं ' बाळ ' व ' बळ योजी ' ऐवजीं ' बाळयोगीं '— पाठ प्र. ४.

**तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।**
**कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥**

२७७. तपियांहून[१३५] थोर । योगीश्वर वंदिजे ॥ १ ॥ माझ्या मतें म्हणे हरि । ज्ञान्यां शीरीं हा दिसे ॥ २ ॥ कर्मयोग्यांहून श्रेष्ठ । हो तन्निष्ठ तस्मात तूं ॥ ३ ॥ योगी होय तूं अर्जुना । मागे दाना तुकया ॥ ४ ॥

**योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।**
**श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥**

२७८. स्वरूपीं निष्ठचित्तें जो कां । लोकलोकां माझारी ॥ १ ॥ या सर्व योगियांत । मज मानत तो सांगूं ॥ २ ॥ भक्तियोगें मातें भजे । तो विराजे प्रेमळ ॥ ३ ॥ योगी थोर वंदावा तो । तुका देतो अभय ॥ ४ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे आत्मसंयमयोगो नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥**

इति श्रीमद्भगवद्गीता अभंगांकित षष्ठमोध्याय ॥४६

१३५. 'तपियांहून' ऐवजीं 'तापसांहुनी'—पाठ प्र. १.

*

॥ अथ सप्तमोऽध्यायः ॥

## — ज्ञानयोग —

### श्रीभगवद्गीता अभंगात्मक सप्तम प्रसंग ४६

**श्रीभगवानुवाच ।**

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन् मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

**२७९. द्वारकानाथ** बोले । पार्था ऐकिलें पाहिजे ॥१॥ सप्रेम मन मद्रूपीं । जो निक्षेपी भावाळू ॥ २ ॥ मदाश्रित योगाभ्यासी । अहर्निशीं अखंड ॥३॥ सर्वशत्वें जाण मातें । स्फुट ऐके तें तुकया ॥ ४ ॥

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥**

**२८०.** विज्ञानेंसी तूतें ज्ञान । मी संपूर्ण सांगतों ॥ १ ॥ जें जाणोनि पुन्हां येथें । जाणणें तें नुरेची ॥ २ ॥ ऐसी नवलीक बोली । तुका चाली निवेदी ॥ ३ ॥

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥**

**२८१.** मनुष्यांचियां सहस्रांत । नर क्वचित प्रयत्नी ॥ १ ॥ यांही मोक्षयत्नी जाण । जाणे खूण तत्त्वाची ॥ २ ॥ तो विरळा मज वाटे । तुकया भेटे सोयरे ॥ ३ ॥

**भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।**
**अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥**

**२८२.** पंचभूतें बुद्धि मन । अहं आठवा लागून । वागवी तंव पुस्यंदन ।

कर्मे ज्यास सारथी ॥ १ ॥ तें ओढील तिकडेची। चाली पडली रथाची। यास्तव मीरण भोगाची। तें वाजट[१३६] क्षणीक ॥ २ ॥ अष्टधा प्रकृती भेदलीसे। माझी मजचि सायासें। झाली उत्पन्न कैसे। चराचर व्हावें हें ॥ ३ ॥ तुका म्हणे केली देवें। तीस कवणें वारावें। वारिलिया लाभ पावे। किंवा हानि उदंड ॥ ४ ॥

**अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।**
**जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥**

२८३. येथें अपर कारण। करूं पाहे जो आपण। मूळ प्रकृति संपूर्ण। महाज्ञानी बोलती ॥ १ ॥ परावाची परा माया। तुझे मानसीं सखया। परात्पर तो आपणिया। पैं म्हणती तो सुजाण ॥ २ ॥ आतां जीव जे चिदंश। झाले जयाचे उद्देश। जाणिजे हें जगदीश। तुका म्हणे बोलिला ॥ ३ ॥

**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।**
**अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥**

२८४. ईपासोनि होती भूतें। मूळ चिच्छक्ति जाण ते। बहु जाणती जाणते। गोष्टी नसे झांकिली ॥ १ ॥ आतां उत्पत्ति कीं लय। स्थान निर्मळ मीं होय। आहे सर्वांचा प्रत्यय। तुज असे बहु मुखें ॥ २ ॥ मीं गा तैसाच जाणिजे। वेदादिकीं आक्षेपिजे। तुका म्हणे हें घेईजे। निज पदरीं अर्थासी ॥ ३ ॥

**मत्तः परतरं नान्यत् किंचिदस्ति धनंजय ।**
**मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥**

२८५. धनंजय या धरेचा। घे तूं धनंजय नामाचा। त्यासी म्हणे यादवांचा। राजा आपण होय जो ॥ १ ॥ नसे कांहीं मजहूनी। पैलिकडे

---

१३६. = ख्याती, प्रसिद्धी.

पाकशासनीं । मज माझारी होऊनी । हें ठेविलें ईश्वरें ॥ २॥ सूत्रीं मणी एक हेम । अलंकाराचें द्विनाम । पाणी कल्लोळ हें सम । तुका वर्म निवेदी ॥ ३ ॥

**रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।**
**प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥**

२८६. या पृथ्वींत पुण्यगंधु । तो मी म्हणे दीनबंधु । जळीं विभूति प्रसिद्धु । रस मीच कौंतेया ॥ १ ॥ तेवीं चंद्र आणि सूर्यांत । आहे माझी प्रभा दीप्त । प्रणवशब्द मी वेदांत। उघड घेई अनुभवें ॥ २ ॥ नभीं विषय शब्दाचा । तो मीं कैवारी दासांचा । नरीं अर्थ पुरुषार्थाचा । वीर्यमान मींच गा ॥ ३ ॥ ऐसा माझा प्रादुर्भावो । पुढें सांगूं अनुभवो । पुण्यगंध पृथ्वीचा हो । भूलवणी म्हणे तुका ॥ ४ ॥

**पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ।**
**जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥**

२८७. आतां पंच पावकांत । आहे जोत्स्ना मीच जोत । जीवन जें प्राणियांत । पैं गा मीच नांदतों ॥ १ ॥ तप तापसां माझारीं । आहे म्हणत कंसारी । तरी धाक चराचरीं । पै लागतो तयांचा ॥ २ ॥ नाहीं शस्त्र अस्त्र सेना । नाहीं मेळाविलें धना । तरी धाक तपोधना । दे मुनि-इंद्रा-विधीसी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम ज्याचें । ऐकिल्या यम काळाचें । हृदय फुटे मग जीवाचें । काय बोलूं महात्म्य ॥ ४ ॥

**बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।**
**बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥**

२८८. सर्व भूतांमध्यें बीज । तो मी म्हणे लक्ष्मी निज । विधी पुरातन आज । पार्था प्रगटीं तुजपुढें ॥ १ ॥ भूतें मिथ्या मृगजळ । मीं दिनकर सर्वकाळ । नव्हे ऐश्वर्य विकळ । रतिमात्र फाल्गुना ॥ २ ॥ असे तद्बीज नित्य मी । बुद्धिमंतांत बुद्धि मी । तेज तेजस्वीयांत मी । तुका म्हणे हरि वदे ॥ ३ ॥

**बलं बलवतां चाहं कामरागविवर्जितम् ।**
**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥**

२८९. बळवंतांमाजी बळ । तो मीं बोले मेघनीळ । कामरागहीन चळ । नातुडे तें नित्य मीं ॥ १ ॥ विरुद्ध न धर्मासी । काम तो मीं गुण-राशी । याचलागीं पुण्यराशी । पैं वेंचती असंख्य ॥ २ ॥ अरे पार्था धनुर्धरा । चराचरांचा पसारा । बागवितो सदयोदरा । तुका म्हणे अनुभवें ॥ ३ ॥

**ये चैव सात्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।**
**मत्त एवेति तान् विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥**

२९०. आतां सत्त्वगुणीं शुद्ध । रजोगुणीं तो विरुद्ध । तम केवळ निषिद्ध । भाव ऐसे तयाचे ॥ १ ॥ आहे माझी सूत्रदोरी । तरी अक्षय गा थोरी । त्याची आहे दानवारी । अप्रसिद्धांत आणवी ॥ २ ॥ ते मिथ्या सर्प दोर । रुपें आहे निर्विकार । कीं मी रज्जू नसे थार । मज रज्जूंत सर्प ते ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्य गोष्टी । आली अनुभवा सृष्टी । देव जाणे हें अदृष्टी । मायामोहें नेणती ॥ ४ ॥

**त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।**
**मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥**

२९१. अरे त्रिगुणभावांत । विश्व मोहिलें संतत । मातें नेणोनियां मात । मायेचीच ऐकती ॥ १ ॥ नेणें जो आत्मा दोरू । गुण सर्प पैल थोरू । झांकी उघडी बाजारू । तैसे नव्हे गारुड ॥ २ ॥ उघड येतें अनु-भवा । बाल्यतारुण्यप्रभावा । वृद्धपणींहि विसांवा । तुका म्हणे विसरले ॥ ३ ॥

**दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥**

२९२. मी देव माझी हे त्रिगुणवेणी हे । नंदिनी संदेहें असंभाव्य ॥ १ ॥ न तरवे कांहीं उपावचि नाहीं । मातें भजे तोही तरूं शके ॥ २ ॥

माझिया नामाची सांगड फुकाची । मग त्या मायेची सत्ता राहे ॥ ३ ॥ तुका म्हणे मात बोलला अनंत । उतरले संत संख्या नसे ॥ ४ ॥

**न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।**
**माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥**

२९३. मातें न भजती पापी जे कुमती । मूढ मूर्खोत्पत्ति झाली ज्यांची ॥ १ ॥ अधम ते प्राणी भ्रष्ट कुव्यसनी । बुद्धि जे मायेनीं हरितली ॥ २ ॥ पावले वैभवा दैत्यांच्या कुभावा । कुहरांत दिवा मालविला ॥ ३ ॥ तुका म्हणे संगीं यमाचा निःसंगीं । राहाती कुसंगीं कल्पवरी ॥४॥

**चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।**
**आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥**

२९४. भजती पुण्याचे न येथें फुकाचे । आमुच्या द्वाराचे अधिकारी ॥ १ ॥ चतुर्विध जाणा ऐकावें अर्जुना । ठेवी गोष्टी मना पैल तीरीं ॥ २ ॥ आरोग्य कामास दुसरा जिज्ञास । अर्थार्थी परीस आत्मविद ॥ ३ ॥ ज्ञानीयांत युक्त सांगेल अच्युत । तुका म्हणे अंत नाहीं सुखा ॥ ४ ॥

**तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।**
**प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥**

२९५. युक्तज्ञानी दीसे ज्यांत भक्ति वसे । एकत्वीं विलासे भक्ति ज्याची ॥ १ ॥ तो थोर अर्जुना आवडे तो मना । त्या प्रीय भावना आत्मा जैसा ॥ २ ॥ तोही आत्मा मज प्रिय हेंचि निज । बोले यदुराज तुका म्हणे ॥ ३ ॥

**उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।**
**आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥**

२९६. तोही थोर परी ज्ञानिया शरीरीं । मीच वस्तिधारी मानिताती ॥ १ ॥ मातें सर्वस्वानें ज्याचेनीं भजनें । सद्गतीतें मनें वरीयली ॥ २ ॥ भजे युक्त चित्तें प्राचीन संचितें । योजि वंचिना ते काया मनीं ॥ ३ ॥ अनुराग येणें घेत बळ दुणें । सार्थक करणें मानी तुका ॥ ३ ॥

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ।। १९ ॥

२९७. बहुत जन्मांचिये अंतीं ऐसी सोय । लाभे निधि होय पायाळाच्या ॥ १ ॥ ज्ञानी मातें भजे ऐसाच जाणिजे । तो यशेंच बिरजे कणगर्भी ॥ २ ॥ किंवा वासुदेव दिसे भास सर्व । जेवीं बिस्तरे पर्व विधीमुखें ॥ ३ ॥ तो थोर दुर्लभ न अति सुलभ । तुकया अंगीं कोंभ[137] उमटला ॥ ४ ॥

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ।। २० ॥

२९८. ज्या ज्या कामीं ज्ञान नेलें सुरसाधन । अंतरां आयन ध्यावयातें[138] ॥ १ ॥ त्यास मी प्रिय कीं आत्माच नित्य कीं । तोही स्वात्मा बाकी काय उरे ॥ २ ॥ मज प्रिय प्रीय नव्हेच अप्रिय । तुका तो सुप्रिय किती वाणूं ॥ ३ ॥

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥

२९९. जो जो जी जी तनु भक्ति पुरातनू । श्रद्धे सनातनु म्हणे भजों ॥ १ ॥ त्या त्यास अचळा श्रद्धेचा जिव्हाळा । देतो कुंतीबाळा त्या त्या रूपें ॥ २ ॥ आमुची अगत्य येतुली सांप्रत । तैसें त्या सर्वत्र माझे ठायीं ॥ ३ ॥ मातेच्या उदरीं वसवी कुमार । प्रीत भारे थार तुका पदीं ॥ ४ ॥

स तया श्रद्धया युक्तस्तस्याराधनमीहते ।
लभते च ततः कामान् मयैव विहितान् हि तान् ॥ २२ ॥

३००. त्या श्रद्धेनें त्यांस पूजी सावकाश । त्यांत जो अन्यास सेवाधारी ॥ १ ॥ त्यापांसोनि पावे काम जो सद्भावें । कामातें स्वभावें मीच निर्मी

---

१३७. = कोम किंवा कोंब; मोड.
१३८. ‘ ध्यावयातें ’ ऐवजीं ‘ ध्यावें तें हें ’ —पाठ प्र. ४

|| २ || सारांश जे वृत्ति राखोनि[१३९] प्रवृत्ति । देत आत्मप्रीती कृपाळू मी || ३ || तुका म्हणे देव नभभक्तभाव । वायूचा प्रभाव कवळीत || ४ ||

**अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।**
**देवान् देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ।। २३ ।।**

३०१. अल्पबुद्धि ज्याला फळें प्राप्त त्याला । होती सकळांला अंतवंत || १ || मेले ते तयास पावती बहुवस । मद्भक्ता निवास माझ्या ठायीं || २ || म्हणोनियां ज्ञानी असे जो साधनीं । तेणें मीं निदानीं नये सोडूं || ३ || आपुलें महात्म्य वर्णी जळद्शाम । तुका म्हणे प्रेम असो येथें || ४ ||

**अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।**
**परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ।। २४ ।।**

३०२. पार्थीवा आपुलें वर्णितो नवलें । भक्तें वश केलें भूलवणी || १ || व्यक्त मी मानितों ऐसेंचि कल्पितों । अव्यक्तांस होतो शब्द कैसा || २ || अज्ञानपणानें विसरती मनें । मूढ या भावनें येती केवीं || ३ || प्रत्यक्षा प्रमाण लाविती दूषण । अव्यक्त निर्गुण गूढ कल्पी || ४ || नेणतां हें पर वस्तु अगोचर । अव्यक्त प्रकार अत्युत्तम || ५ || तुका म्हणे दया हरिची असलिया । तरीच प्रत्यया गोष्टी येती || ६ ||

**नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।**
**मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ।। २५ ।।**

३०३. झांकलों मी असे कोणासी न दिसें । योगमाया भासे मजवरी || १ || सर्वांसी प्रगट न दिसे मी अचाट । मूढ फोलकट काय जाणें ||२|| जो कां मी अनादी अनंत परवादी । मौन येथें वेदीं घेतलेंसे || ३ || अगाध मीचही कांहीं जें स्वल्पही । तुका गर्जे ग्वाही मृत्युलोकीं || ४ ||

---

१३९. ' राखोनी ' ऐवजीं ' सारोनी '—पाठ प्र. १.

**वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।**
**भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥**

३०४. जीं गेलीं तयांस जाणें मी वीरेशा । होती त्यांची दशा पाहातां हे ॥ १ ॥ भूत भविष्यानें होणार जें पुढें । आहे मजकडे जाणीव तें ॥२॥ मातें गा कोणीच नेणती पांडवा । ऐशा नवलावा किती सांगूं ॥ ३ ॥ तुका म्हणे आत्मा जाण तैसा देह । देहास संदेह आत्मरूपीं ॥ ४ ॥

**इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत ।**
**सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परंतप ॥ २७ ॥**

३०५. प्रिय इच्छा तैसा अप्रियांत द्वेष । होतसे उत्कर्ष त्रिभुवनीं ॥ १ ॥ द्वंद्व मोह यासी असे मूळ बीज । जाणसी सहज बोलों आम्ही ॥ २ ॥ सर्व भूतें सृष्टिकाळीं मोहालागीं । पावती प्रसंगीं अनुभवें ॥ ३ ॥ पूर्वील मोहदोरा ओवी जीवमणी । तुका म्हणे खाणी दुःखाची जे ॥ ४ ॥

**येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।**
**ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥**

३०६. क्रिया चोख ज्यांची तिचिया बळानें । कां पृथ्वी जळानें नीच पाहावी ॥ १ ॥ ज्यांच्या अंतरींचीं गेलीं पुण्यपापें । अंगीं मारे सर्पे चंदनाच्या ॥२॥ मातें जो भजेल सुटेल निश्चयें । त्यासी नाहीं भये दोघांचें या ॥ ३ ॥ दृढव्रत तेंचि येणार मोक्षासी । तुका म्हणे ऐसी गोष्टी झाली ॥४॥

**जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।**
**ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥**

३०७. नाशावया जन्ममरणाचें मूळ । जे कां यत्नशीळ मदाश्रय ॥१॥ ते ब्रह्म जाणती काशास्तव तरी । अध्यात्मिक सारी कर्ममार्गू ॥ २ ॥ तेंचि

गा तरले तारीती आणिकां । मार्ग हा आसका विस्तारूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे आतां शेवटील श्लोक । तो जगन्नायक बोले कैसा ॥ ४ ॥

**साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।**
**प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥**

३०८. अधिभूता अधियज्ञासी रे पार्था । सहीत वीरनाथा अधिदैव ॥ १ ॥ मीच होय ऐसा भरंवसा मानुनी । भजती अनुदिनीं प्राणी जे का ॥ २ ॥ प्रयाणींही तेच जाणती पांडवा । तुका म्हणे जीवा केलें मुक्त ॥३॥

३०९. [१४०] ऐसे हे प्रसंग संपले पैं सात । गीतादेवी भक्तवरदानी ॥१॥ श्रवणें पठणें करी कार्यसिद्धि । माईक उपाधि सारूनियां ॥ २ ॥ तुका विनवणी करी साधुजनां । श्रवणीं भावना शुद्ध करा ॥ ३ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे ज्ञानयोगो नाम सप्तमोऽध्यायः ॥ ७ ॥**

इति श्रीगीता अभंग सप्तमोध्यायः ॥[४६]

---

१४०. प्रत १ मध्यें फक्त.

## ॥ अथ अष्टमोऽध्यायः ॥

### — अक्षरब्रह्मयोग —

श्रीभगवद्गीता अभंगात्मक—अष्टम प्रसंग[४६]

**अर्जुन उवाच ।**

**किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।**
**अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥**

३१०. पूर्व प्रसंगांत परमहंसयोग । निवेदी श्रीरंग आत्मलाभें ॥ १ ॥ परि प्रसंगांतीं ऐकिलें पार्थिवें । आध्यात्म बरवें अधिभूत ॥ २ ॥ गूढ ना समजे यास्तव आशंका । घेऊनी असका[८३] घे तूं झाडा ॥३॥ ते सप्त प्रश्न एकामागें एक । ऐका सकळीक भाविक हो ॥ ४ ॥ ऐका महाराज राजमुगुटांत । जोडोनियां हात विनवितों ॥ ५ ॥ देवराया काय ब्रह्म तें सांगावें । तैसेच बोलावें आध्यात्मही ॥ ६ ॥ पुरुषोत्तमा कर्म कशास म्हणावें । अधिभूत बरवें कैसें सांग ॥ ७ ॥ अधिदैवत त्या संस्कारूनि बोले । वर्म न कळलें बोले तुका ॥ ८ ॥

**अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन् मधुसूदन ।**
**प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥**

३११. अधियज्ञ कैसा कोणता म्हणावा । देहीं या जाणावा आम्हीं कैसा ॥ १ ॥ जाणावाचि कैसा प्राणाच्या प्रयाणीं । प्रत्यक्ष काहाणी हातीं लाभे ॥ २ ॥ [१४१] सूज्ञ जे तयांनीं विचार पंथानें । यावें मधुसुदनें बोलावें

---

८३ = आसक्ति, प्रेम, लोभ.

१४१. या ऐवजीं ' जाणावाचि कैसा प्राणाच्या प्रयाणीं । प्रत्यक्ष काहाणी हस्तीं लाभे'—पाठ प्र. ४.

हें ॥ ३ ॥ तुका म्हणे प्रश्न सात अर्जुनाचे । हंस सत्याब्धीचे हेलावे हे ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच ।

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

३१२. हांसोनि बोलिला कर्ता जो जगाचा । आमुच्या लाभाचा संशय हा ॥ १ ॥ शुद्ध ब्रह्म जें तें म्हणावें अक्षर । अध्यात्म प्रकार भावें बोले ॥ २ ॥ भूत भौतिकांची जे कांहीं उत्पत्ती । सृष्टि करीजे ती कर्म जें कां ॥ ३ ॥ तुका म्हणे श्रोतीं व्हावें सावधान । करावें चिंतन भगवंताचें ॥४॥

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

३१३. अधिभूतां क्षर तनू हा विकार । जीवात्मा प्रखर अधिदैव ॥ १ ॥ बिंब त्याच प्रमें प्रतिबिंब न्यायें । अधियज्ञ होये याच देहीं ॥२॥ तुका म्हणे आतां सांगेल अंतर । न धरुनियां दूर सज्जनांसी ॥ ३ ॥

अन्तकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

३१४. मातेंच प्रयाणीं जीवीं धरुनियां । देह सोडलिया नामस्मरणें ॥ १ ॥ जाय प्राण न या मद्रूपावांचूनी । विश्रांति नयनीं आढळेना ॥२॥ संशय कायसा कांकणा आरसा । पाहाणें धारसा[१४२] लागलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे नामें झाला गज मुक्त । प्राणी तो अशक्त उद्धरेच ॥ ४ ॥

यं यं वापि स्मरन् भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।
तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

३१५. जें जें आणीकही ध्यान । अंतीं हृदयीं धरून ॥ १ ॥ देह त्यागिला जयानें । जाय पाहे तो तीं स्थानें ॥ २ ॥ एक रंगलें अंतर । आत्मा तेथें धरी थार ॥ ३ ॥ तुका म्हणे इहपरी । वासनेच्या करी दोरी ॥ ४ ॥

---

१४२. = धरणाराला.

**तस्मात् सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ॥ ७ ॥**

३१६. तस्मात् तूं सर्वदा पार्था । मातें स्मर भावपंथा ॥ १ ॥ युद्ध निःशंक करावें । मन हृदयीं सांठवावें ॥ २ ॥ बुद्धि आलिया आमुचे ठायीं । मुक्त होशी संशय कायी ॥ ३ ॥ निश्चयें पावसी मातें । तुका शरण अनन्यातें ॥ ४ ॥

**अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।**
**परमं पुरुषं दिव्यं याति पार्थानुचिन्तयन् ॥ ८ ॥**

३१७. अगा अभ्यासाचा योग । दृढ असलिया चांग ॥ १ ॥ मग अन्यत्र मार्गांत । पार्था न जातां महंत ॥ २ ॥ मनें ऐसीया कसवटी । दिव्य पुरुषीं घाली मिठी ॥ ३ ॥ पावे सतत चिन्मात्र । तुकीं एक चिंतन मात्र ॥ ४ ॥

**कविं पुराणमनुशासितारम्**
**अणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।**
**सर्वस्य धातारमचिन्त्यरूपम्**
**आदित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥**

३१८. अरे पुराण सर्वज्ञ । प्रदायक फलाभिज्ञ ॥ १ ॥ स्मरेल जो सूक्ष्म दीपा । अतींद्रीय आत्मरूपा ॥ २ ॥ अतर्क्यत्व गुणें रूपीं । धरीं विश्व झाला लोपी ॥ ३ ॥ भानु प्रकाशून तमीं । तुका अव्यक्ताचे व्योमीं ॥ ४ ॥

**प्रयाणकाले मनसाऽचलेन**
**भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।**
**भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्**
**स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥**

३१९. प्राणप्रयाणीं या मना । आवरोनियां अर्जुना ॥ १ ॥ मद्भक्तीच्या योगबळें । करुनी प्राणें एक मेळें ॥ २ ॥ निज भ्रुवचक्रयुग । भेदीं पावे ज्योतिर्लिंग ॥ ३ ॥ दिव्य पुरुषा अनादी । तुका समर्पिला पदीं ॥ ४ ॥

यदक्षरं वेदविदो वदन्ति
विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति
तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

**३२०.** जें कां अक्षर बोलती । वेद संत जयाप्रती ॥ १ ॥ यती वीतरागी ज्यांत । निघती धरूनि गुरुहात ॥ २ ॥ अह्रो इच्छुनियां जगीं । त्यागें लागले या मार्गी ॥ ३ ॥ त्याची प्राप्ती सांगो तुज । तुकया निरोधाचें बीज ॥ ४ ॥

सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।
मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥

**३२१.** कोंडोनिया नवद्वारें । नेमी जाणें प्रत्याहारें ॥ १ ॥ मन हृदयीं कोंडोनी । प्राण मस्तकीं धरुनी ॥ २ ॥ योगधारणा अनुष्ठी । तुका नोहे कांहीं कष्टी ॥ ३ ॥

ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन् देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

**३२२.** ॐ हें एकाक्षर ब्रह्म । वेदशास्त्रांत उत्तम ॥ १ ॥ असा जपे मातें स्मरे । कायावाचाश्रद्धाद्वारें ॥ २ ॥ जाय अर्चिरादि मार्गी । एकट दुजा न संसर्गी ॥ ३ ॥ तयां ब्रह्मयासह गती । तुका म्हणे मुक्त होती ॥ ४ ॥

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥

**३२३.** नव्हे इतरांसारिखा । ऐसा जाणूनियां सखा ॥ १ ॥ चित्तीं चिंती सदा स्मरे । वत्स धेनूसी हुंबरे ॥ २ ॥ पार्था सुलभ मी त्याला । रक्षीं अंतरबाह्याला ॥ ३ ॥ नित्य योजिला योगी जो । तुका म्हणे त्यासी भजो ॥ ४ ॥

**मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।**
**नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥**

**३२४.** मज पावोनियां जन्मा । न फिरेच ज्याच्या प्रेमा ॥ १ ॥ घर दुःखाचें नश्वर । देह अपवित्रच थोर ॥ २ ॥ न पावती पुन्हां संत । पहाया चोरांचा संघात ॥ ३ ॥ थोर पावले जे गती । तुका वर्णी पुढतोपुढती ॥ ४ ॥

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ।**
**मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥**

**३२५.** अरे अर्जुना पुनरा-। वृत्ति नेम चराचरां ॥ १ ॥ विधि लोकादिकांहूनी । उसळती येणीं जाणीं ॥ २ ॥ परि मातें पावलियां । कोण फिरेल कौंतेया ॥ ३ ॥ पुन्हां जन्मा न ये तुका । कधीं पहावया लोकां ॥ ४ ॥

**सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।**
**रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥**

**३२६.** युगें हजार एके दिवसें । म्हणती येतसे सहजें[१४३] ॥ १ ॥ रात्री तैसीच विधीची । जे सृष्टीची बुडवण ॥ २ ॥ गेले जाणती तेथें जे । सुख भोगें भोगावया ॥ ३ ॥ क्रममुक्त्यर्थ राहिले । तुकीं न आले तुकयाच्या ॥ ४ ॥

**अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।**
**रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥**

**३२७.** व्यक्ति प्रकृतीपासुनी । तूं सज्ञानी जाणसी ॥ १ ॥ विधीदिनागमीं होती । आपुल्या चित्तीं ओळखे ॥ २ ॥ या तत्त्वीं प्रकृति लीना । कांहीं वासना न ठेवी ॥ ३ ॥ निशा आरंभितां होती । तुका प्रतीति[१४४] निवेदी ॥ ४ ॥

---

१४३. या पादाऐवजीं 'गणतीस जैं गा येती ॥'—पाठ प्र. १.
१४४. ' प्रतीति ' ऐवजीं ' प्रकृति '—पाठ प्र. ४.

**भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।**
**राञ्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥**

३२८. तोच हा ग्रामभूतां । ब्रह्मसत्ता झाला जो ॥ १ ॥ होतो होऊनि नासतो । मी पाहातों नित्यानीं ॥ २ ॥ लीन अवश हा रात्रीं । तृणपत्रीं बीजेसी ॥ ३ ॥ पुन्हां दिनारंभीं होतो । व्यापार तो म्हणे तुका ॥ ४ ॥

**परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात् सनातनः ।**
**यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥**

३२९. सत्ता निराकार तया । विकार जया नसे जो ॥ १ ॥ भूतां प्रकृतीहुनी । सृष्टिभुवनीं ना दिसे ॥ २ ॥ निराळी जे सर्वा भूतीं । आहे वस्ती आगम ॥ ३ ॥ विश्व नासतां न नासे । तुका वसे अव्यक्तीं ॥ ४ ॥

**अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।**
**यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥**

३३०. निराकार जें अक्षर । नसे क्षर प्रळयांत ॥ १ ॥ बोलली ती श्रेष्ठ गती । पुनरावृत्ति परिछिन्न ॥ २ ॥ न येती तेथें जे गेले । साधन भले साधुनी ॥ ३ ॥ माझें धाम तेंच तुका । पाडी चिरा चौऱ्यायशीं ॥ ४ ॥

**पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।**
**यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥**

३३१. तो तो अद्वैत भक्तीनें । कीं प्रीतीनें हृदयींच्या ॥ १ ॥ पार्थों पाविजे पुरुषें । छंदोत्कर्षे विवेकें ॥ २ ॥ हीं भूतें जया स्वरूपीं । लीन व्यापी लहरी ॥ ३ ॥ ज्यानें व्यापिलें हें जग । निरुद्वेग असुनी ॥ ४ ॥ तुका म्हणे माहात्म्य अंतीं । रमापती बोलतो ॥ ५ ॥

**यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।**
**प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥**

३३२. ज्या काळीं न पुन्हां जन्म । ऐसें वर्म एक आहे ॥ १ ॥ योगी होतांही जन्मतो । तो सांगतो अवधारी ॥ २ ॥ देवताही सांगूं क्रमें । नेणों प्रेमें वंचूं गा ॥ ३ ॥ मार्गीं भेटती भावेंचि । ऐके तोंचि म्हणे तुका ॥ ४ ॥

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।**
**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ।। २४ ।।**

३३३. पावकज्योत हृदयांत । हें जागृत असावी ।। १ ।। दिन पक्ष शुक्ल मास । षट्पूर्णांस जैं येतीं ।। २ ।। उत्तरायण हा मार्ग । पायीं स्वर्ग-जात्यासी ।। ३ ।। तुका म्हणे वेदवेत्ते । विधिलोकांतें पावती ।। ४ ।।

**धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम् ।**
**तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ।। २५ ।।**

३३४. धूमोराति कृष्णपक्ष । मास साक्ष तेवींच ।। १ ।। दक्षिणायन चंद्रामृत । झाल्या प्राप्त यद्यपि ।। २ ।। योगी पूर्ण तरी फीरे । हें कां धीरें* चुकेना ।। ३ ।। तुका म्हणे प्रसिद्ध हे । मार्गद्वय निर्मिले ।। ४ ।।

**शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते ।**
**एकया यात्यनावृत्तिमन्यया वर्तते पुनः ।। २६ ।।**

३३५. शुक्ल कृष्ण गती ऐशा । दोन्ही सांगितल्या जैशा । इतर नव्हति गा तैशा । पैं बोलाया आधार ।। १ ।। जेणें पंथ हा पाहाणें । तरोन भरोसें घेणें । ओळखती पैं शाहाणे । बऱ्या शाश्वत पार्थिवा ।। २ ।। अर्चिला पहिला पथ । तो तरी नव्हे गा अनाथ । कीर्ति ठेवूनि सनाथ । पणें साधु बहु गेले ।। ३ ।। ते न येती घेऊं जन्म । दुसरीचें खोटें कर्म । तुका म्हणे खरें काम । तरी ध्यावें पदरांत ।। ४ ।।

**नैते सृती पार्थ जानन् योगी मुह्यति कश्चन ।**
**तस्मात् सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ।। २७ ।।**

३३६. जाणोनी माझ्या मतें । मार्ग दोन्ही हे आयते । ओळखीजे बुद्धिवंतें । गति किंवा अवगती ।। १ ।। परि हे अज्ञाना प्रसंग । आत्मयोगी तो निःसंग । त्यासी न पडे व्यासंग । ऊर्ध्व-अधमीं ज्ञात्याला ।। २ ।। यया-

* ' धीरें ' ऐवजीं ' वीरें '—पाठ प्र. ८.

लागीं बहुतांपरी । आम्ही शिक्षीलें उत्तरीं । अर्जुना तस्मात् तरी । खुण अंतरीं धरून ॥ ३ ॥ योग युक्तीनें साधी रे । मग जनन व्याधि रे । तुज सखया न बाधी रे । तुका वदला निश्चयें ॥ ४ ॥

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव
दानेषु यत् पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा
योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

३३७. वेदांमध्यें पाहतांना । तैसें तपही अर्जुना । अथवा विध्युक्त हवना । करतां फळ जें जोडे ॥ १ ॥ दश दानें महा दानें । भूमि कन्या शय्या दानें । संग्रवारक अवदानें । पुण्य जे कां अर्पिती ॥ २ ॥ अतिक्रमीं जाणोनियां । सर्व मातें आणोनियां । राहे अलिप्त त्या वायां । गेला म्हणेल कोण गा ॥ ३ ॥ नाशवंत सांडी सारें । योगी चढे साक्षात्कारें । तेंच आद्य परंपरे । तुका मग्न ज्यामाजीं ॥ ४ ॥

३३८. [१३९] ऐसी अष्टम प्रसंगीं । गति नेमीत सारंगी । साधकांस कळे अंगीं । सुख ऐसें भोगाया ॥ १ ॥ अहो योगी श्रेष्ठ त्यांत । जो कां हरिरुपीं संतत । त्याची वर्णियली ख्यात । याच्च अष्टम अध्यायीं ॥ २ ॥ पुढें नवम ऐकावा । ज्यांत देवो सांपडावा । तुका म्हणे आम्हां बरवा । ज्या वर्णनीं आल्हाद* ॥ ३ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे अक्षरब्रह्मयोगो नामाष्टमोऽध्यायः ॥ ८ ॥**

इति श्रीगीता अभंगात्मक । श्रीतुकाराम वाक्य सिद्धांत ।
अष्टमोध्याय संपूर्णमस्तु ॥ श्री पांडुरंगार्पणमस्तु ॥[४६]

---

* ' अल्हादु ' ऐवजीं.' आनंदु [1]—पाठ प्र. १, ७ व ८.

॥ अथ नवमोऽध्यायः ॥

## — राजविद्या राजगुह्ययोग —

### श्रीभगवद्गीता अभंग नवम प्रसंग[४६]

**श्रीभगवानुवाच ।**

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥**

३३९. पूर्वे प्रसंगीं बोलला । अर्जुनासी देव भला । अक्षरें प्रथम निरूपिला । परब्रह्म योग जो ॥ १ ॥ आतां राजविद्या येथें । राजगुह्य तेणें पंथें । ऐकिजेल जी समर्थे । काय कैसें महात्म्य ॥ २ ॥ हें तो गुह्यांहूनि गूह्य । आम्ही तूतें सांगों पाहे । तूं सज्जन परिसूं लाहे । तरी कां पां वंचना ॥ ३ ॥ विज्ञानेंसी तुज ज्ञान । यया ज्ञानें एक साधन । आहे मोक्ष अनुसंधान । तुका ज्यांत उद्धरे ॥ ४ ॥

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥**

३४०. विद्यागुह्यांत जो राजा । धर्म उत्तम सहजा । पावन व्हावयासी प्रजा । नित्य सेवी श्रद्धेनें ॥ १ ॥ नव्हे शाब्दिक हें ज्ञान । कांहीं धरिसी अनुमान । देतों प्रत्यक्ष निवडून । येईल पाहे अनुभवा ॥ २ ॥ नित्य जें सुख सुकाळ । साध्य होतें सर्वही काळ । तेंच करूं हस्तामळ । तुकयालागीं आवडे ॥ ३ ॥

**अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।**
**अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥**

३४१. होईन मी ब्रह्मज्ञानी । ऐशा छंदाच्या आस्थेनीं । पाहाती ग्रंथ संमत मुनी । कैसे अनुभव बोलिले ॥ १ ॥ मुनी बोलिले मजसाठीं । नाना

तर्क हटवटी । तेचि पाहुनी फुंदे* हाटी । परि आम्हां नेणेंचि ॥२॥ शब्द माझा उपेक्षिला । गीताधर्म उच्छेदिला । तो मज मित्रद्रोही झाला । यमपुराला मी वोपी ॥ ३ ॥ मग तेथें लागे दंड । जन्म नरकाचे उदंड । जन्मलियां मृत्यु-दंड । तुका म्हणे चुकेना ॥ ४ ॥

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥

३४२. हाचि विश्व सर्प दोरें । मी या धारण निर्विकारें । पार्था करांवांचून सारें । सूत्र याचें चाळितो ॥ १ ॥ नयनांवांचून पाहातो । कैसा भ्रांत जीव भीतो । मोक्षालय सांडूनि तो । वनीं पळतो विषयांच्या ॥ २ ॥ कोणी दडे कोणी पडे । आयत्या हर्षे नाचे उडे । हृदयावांचून मन वेडें । माझें होतें हांसतां ॥ ३ ॥ शेवट शब्दाचा सांगतो । भूतभास मजमधीं तो । त्या सर्पा मी दोर तो । नसे हाच नवलावो ॥ ४ ॥ मिथ्या सर्प सत्य झाले । रज्जुसर्प भ्रांतीमुळें । सद्गुरुकृपें निरसले । तुकया भ्रांति रज्जुत्वें ॥ ५ ॥

न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

३४३. तेही सृष्टि सर्प वीरा । दुर्लभत्वें मी दूर दोरा । वायु मोडी तरूवरा । पृथ्वीसंगें अलिप्त ॥ १ ॥ पाहे युक्ति कैसी मौज । ऐश्वर्ययोग सांगूं तुज । येऱ्हवीं स्वस्वरूप बीज । हातीं येणें अप्राप्त ॥ २ ॥ भूतीं नसोनी अर्जुना । धरितो हेकें कल्पना । किंवा कल्पी बुद्धि नाना । माझी ऐसी तुका म्हणे ॥ ३ ॥

यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

३४४. नभीं वायु हा दृष्टांत । देतां सत्यभामाकांत । सर्वत्रचि सदोदित । मित्र अथवा रिपू हो ॥ १ ॥ कळे मोठा नभींच तो । अवकाशीं

* = स्फुंदे; प्रौढी मारणें.

बावरतो। आत्मा यांत त्यापरि तो। तूंच सर्व मान रे ॥ २ ॥ श्रुत अश्रुत प्रमाण। अवघा आत्मा बुझे खुण। येथें जी जी म्हणून चरण। वंदी पार्थ म्हणे तुका ॥ ३ ॥

**सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।**
**कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥**

३४५. द्रष्टा रज्जूच मी माया। माझी दृष्टि निजालया। तींत लीन जगकाया। सर्व मीच हें मानीं ॥ १ ॥ जो कल्पादींस सृजी। तो मी प्रभु या भूतां जी। जाणें ज्ञानयोग्यांमाजी। शिव मातें भासतो ॥ २ ॥ म्हणून तो मायातीत। स्वरूपीं रतला संतत। तुका चरणीं शरणांगत। कृपा माझी त्यावरी ॥ ३ ॥

**प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।**
**भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥**

३४६. पुनः पुन्हां पार्था विश्व हें सर्वथा। माया प्रतिपंथा अधिष्ठी तूं ॥ १ ॥ तिची दृष्टि मोहरे जीवोत्पत्तिद्वारें। माझिया विष्करें रूपावरी ॥ २ ॥ निर्मितों मी स्वात्म[१४५] बुद्धीचें महात्म्य[१४५]। दोरी कीं तें स्वप्न जंबुकाचें[१४५] ॥ ३ ॥ भूतग्राम तिला स्वयींच निर्मिला। बरवा भासला तुकयासी ॥ ४ ॥

**न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।**
**उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥**

३४७. मातें सृष्ट्यादिकें व्याप्तीचीं कटकें। अथवा लटिके स्वप्नधर्म ॥ १ ॥ न बाधिती वीरा धनंजय पुरा। पाहे सारसारा धुंडाळूनी ॥ २ ॥ कीं मी उदासीन कैसा तो सांगेन। कर्मासी व्यापून अंतर्बाह्य ॥ ३ ॥ परि ना लंपट पाहातां खटपट। चांगलें चोखट नेणें तुका ॥ ४ ॥

---

१४५. 'स्वात्म' ऐवजीं 'च जाण' व 'महात्म्य' ऐवजीं 'कारण'—पाठ प्र. ४, ६, ७ व ८. 'जंबुकाचें' ऐवजीं 'पंचकाचें'—पाठ प्र. १.

**मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।**
**हेतुनानेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥**

३४८. मी द्रष्टा देखणा सर्व कर्मखुणा । जैसा कां पाहुणा चौ दिवसांचा ॥ १ ॥ दृष्टीनें हें माझें चाले सृष्टिवेझें । अग्निसंगें कुटिजे लोह जेवीं ॥ २ ॥ माया चराचर जाणें मी अक्षर । गोंडाळांत नीर वेगळेंचि ॥ ३ ॥ या हेतूनें विश्व-सर्प महा गर्व । होतो आयुर्भाव मज दोरी ॥ ४ ॥ रवि मृग-जळ तेणें तरी पुष्कळ । तुका म्हणे खेळ अचाट हा ॥ ५ ॥

**अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।**
**परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥**

३४९. तो महा ईश जगा जगदीश । पर हा महेश नेणें भावा[१४६] ॥ १ ॥ तेथें मूढमती मातें अवमानिती । कोण्या बळें तरती कळेना हे ॥ २ ॥ मानवदेहांत देखोनि कर्मांत । म्हणती अनंत आम्हां ऐसा ॥ ३ ॥ परंज्योती प्रभू नेणोनि स्वयंभू । नेणतां हा क्षोभू झाला तुकया ॥ ४ ॥

**मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।**
**राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥**

३५०. वृथा आशा स्वर्ग-वस्ती ज्या नैसर्ग । पिशाच्च्या कुळवर्ग लग्नीं जैसा ॥ १ ॥ वृथा कर्में तेवीं मृत्युलोकीं गोवी । लाव मोहे बरवी काय बाळा ॥ २ ॥ ऐसें हें जाणतां धरी जो ममता । तो ज्ञानी म्हणतां हासूं येतें ॥ ३ ॥ राक्षसी आसुरी प्रकृति मूढा खरी । आश्रित भिकारी तुका वंची ॥ ४ ॥

**महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।**
**भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥**

३५१. महा सुबुद्धि तो पार्था मी सांगतों । नांव घेता येतो डोलूच गा ॥ १ ॥ दैवी प्रकृतीनें आदरी मत्पूजनें । जैसी पद्मवनें मानसांत ॥ २ ॥

---

१४६. ‘ भावा ’ ऐवजीं ‘ रमा ’—पाठ प्र. १.

परि तो गा भक्ति अद्वैतींच प्रीति । कीं मी आदिअंतीं जाणूनियां ॥ ३ ॥ एकापासीं भाव दुजा तेथें वाव । पतिव्रता नांव तुका म्हणे ॥ ४ ॥

**सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।**
**नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥**

३५२. माझी कथा वार्ता ऐके द्रव चित्ता । नित्य रत ममता माझी ऐसी ॥१॥ जेणें देव जोडे त्या यत्नीं वावडे । अभंग पवाडे दृढ व्रत ॥२॥ वंदिती भक्तीनें निजात्मप्रीतीनें । स्वरूपरीतीनें नित्य मुक्त ॥ ३ ॥ जे गा ययापरि त्याच्या द्वारीं करीं । काठी धरूं हरि म्हणे तुका ॥ ४ ॥

**ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।**
**एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥**

३५३. वृत्ति हो मींच कीं भावना ते एकी । सती पै पावकीं माया त्यागें ॥ १ ॥ किंवा मज वाटे ध्यातो तो गोमटें । कर्म हव्य वाटे विश्वतोमुख ॥ २ ॥ एकत्वेंच ऐसा विश्वरूपीं पिसा । एकचि जिज्ञासा परी गमे ॥ ३ ॥ बहुधा असती देवा ये जगतीं । याजक म्हणती तुकयासी ॥ ४ ॥

**अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।**
**मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥**

३५४. विश्वतोमुख पूर्ण त्याची हे गा खुण । बुझे अंतःकरण ऐसाच कीं ॥ १ ॥ मख यज्ञ पुरे पितृव्रत सारें । मीच मी द्रव्य रे मंत्र आज्य ॥ २ ॥ तेथें मुख्य अग्नि तो मी ऐकें कानीं । हूतही निदानीं मीच होम ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं आत्म्याविण कांहीं । सांगे वर्म पाहीं गुरु शिष्या ॥ ४ ॥

**पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।**
**वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥**

३५५. बाप मी माय मी जग धरणार मी । ज्ञेय तें शुद्ध मी जाणीव गा ॥ १ ॥ अकार उकार तिसरा मकार । अर्ध मात्रावर ॐकार मी

॥ २ ॥ ऋग्वेद मी यजुर्वेद महाराज । सामवेद तेज गायन मी ॥ ३ ॥ गति पाळक मी साक्षी आगमनिगमी । तुका म्हणे स्वामी पुढें बोले ॥ ४ ॥

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

३५६. वासस्थान पार्था मीच पैं सर्वथा । नव्हेंच अन्यथा बचन हें ॥ १ ॥ शरणांगतां मान्य सखा मी सौजन्य । इच्छिती जघन्य पडे ना तें ॥ २ ॥ मी सृष्टि उत्पत्ति वाढे माझ्या हातीं । मोडे सहज रीतीं कोपाचिये ॥ ३ ॥ विधी मी बीज मी सतत नित्य मी । तुका म्हणे स्वामी काय बोले ॥ ४ ॥

तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

३५७. तपतो तो ताप वर्षतो ते वृष्टि । ओढितों मी सृष्टि सोडितों मी ॥ १ ॥ मोक्ष मी पांडवा मरण माझेनीच । जडही गा साच मजसाठीं ॥ २ ॥ चैतन्य चंचळ निश्चळ माझेनी । अर्जुना तूं मानी गोष्ट खरी ॥ ३ ॥ तुका म्हणे भाग्य-आथिला हा पार्थ । देव पूर्ण अर्थ सांगे जया ॥ ४ ॥

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा
यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकम्
अश्नन्ति दिव्यान् दिवि देवभोगान् ॥ २० ॥

३५८. इंद्रादिक रूपें यजूनी बहुधा । केला पुण्यबांधा अक्षयत्वें ॥ १ ॥ मार्तेच पैं वेदीं तिहीं सोमपानीं । मग ते निदानीं घेती सुखा ॥ २ ॥ इंद्रासनारूढ होती अमर दृढ । घेती सुरवाड उर्वशीचा ॥ ३ ॥ दिविचर फेरे घेती विमानांत । तुका म्हणे भूत भविष्य केलें ॥ ४ ॥

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं
क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।
एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना
गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥

३५९. ऐसे भोग भोगी जंववरी सुकृत। सरल्या पतीत तोच होय ॥१॥ हांक फोडी धर्मदूत महा गजरें । तळीं या लोटारे उन्मत्तासी ॥२॥ पडे दंड शिरीं तेव्हां अंतराळीं । विमान डळमळी अधोमुख ॥ ३ ॥ तेजें भरे नभ[147] पाहाती भुलोक । म्हणती पुण्यश्लोक ढांसळला ॥ ४ ॥ कौतुक करिती नेणती आपुले । पाप जें कां केलें छळीतसे ॥ ५ ॥ असो हे निपूण वैदिकांचीं कर्मे । निरूपितां वर्मे[148] गतागती ॥ ६ ॥ पावती सखया ऐसे कामकामी । तुका म्हणे आम्ही बरे असों ॥ ७ ॥

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

३६०. अनन्य* त्यागें मातें भजे गर्भवंत । व्यापार नेणत एक ध्यानें ॥१॥ चिंतिती भजती जन जे पार्थिवा । अभियुक्त सेवा नित्य मार्गी ॥ २ ॥ त्यांचा योगक्षेम राहो आनंदांत । वाहातों मनांत चिंता ऐसी ॥ ३ ॥ मज चिंता नाहीं आपुले तनूची । काळजी भक्तांची म्हणे तुका ॥ ४ ॥

येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

३६१. येऱ्हवीं कौंतया अन्यत्रही देवा । भावें करी सेवा कोणी प्राणी ॥ १ ॥ अन्य भक्ति भजे अन्य उपासने । येती भरंवसेनें आमुच्या घरीं ॥ २ ॥ परंतु अविधीपूर्वक संचय । जेणें योगें क्षय सर्वस्वाचा ॥ ३ ॥ तैसें नको वीरा स्पष्ट मी सांगतों । गुंति न करी तो तुका म्हणे ॥ ४ ॥

१४७. ‘ नभ ’ ऐवजीं ‘ प्रभा ’—पाठ प्र. ४, ७ व ८.
१४८. ‘ वर्मे ’ ऐवजीं ‘ कर्मे ’—पाठ प्र. ४.
* ‘ अनन्य ’ ऐवजीं ‘ अन्य ’ —पाठ प्र. ४, ७ व ८.

**अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।**
**न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥**

३६२. मीच स्वामी भोक्ता प्रभु आहुतीचा । आणिक मंत्राचा असो कोणी ॥ १ ॥ अग्नि मम मुखें गोकुळीं गिळिला । यज्ञद्रव्य त्याला उत्पत्ति मी ॥ २ ॥ कीं मातें नेणती पाहाती तत्त्वज्ञाला । तेथें तो उघडा ईश मीच ॥३॥ उपाधिक बीज[149] तेंही मी अर्जुना । ठावकें सज्जना तुका म्हणे ॥४॥

**यान्ति देवव्रता देवान् पितॄन् यान्ति पितृव्रताः ।**
**भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥**

३६३. भजनाचीं फळें असती बहुत । आम्ही सांगों त्यांत मुख्य चार ॥ १ ॥ देवतोपासनी देवांस पावतो । पदवी भोगितो ऐश्वर्याची ॥ २ ॥ पितरां उद्देशें श्राद्ध पक्ष दर्श । तेणें घ्यावा हर्ष पितृलोकीं ॥ ३ ॥ भूतांचें यजन साधन स्मशानीं । अंतीं तेच स्थानीं अधिकारी ॥ ४ ॥ आतां माझी भक्ति मातेंच पावेल । आनंदें गाईल तुका जैसा ॥ ५ ॥

**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।**
**तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥**

३६४. संकट तें नाहीं वैष्णवा पुजेचें । स्वल्प हातवटीचें वर्म सांगों ॥ १ ॥ पत्र हो वृक्षाचें तुळशी बेलाचें । फुलही[150] फुकाचें सांपडे जें ॥ २ ॥ वनफळ भिल्लटीचें परी असो । चवी न गवसो जयामाजीं ॥ ३ ॥ नातरी पाण्याचें संकट पडेना । हेतो मी हिंवेना भाक्ति तापें ॥ ४ ॥ भक्षी पसरूनी मुख लाडें कोडें । निष्काम आवडे म्हणे तुका ॥ ५ ॥

**यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत् तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥**

३६५. तूं म्हणसी आम्हीं भक्ति कैसी कीजे । श्लोकार्थ सांगीजे याचलागीं ॥ १ ॥ करिसी कर्म हातें मुखें जें भक्षिसी । अथवा दानें देसी याजकांला।

---

१४९. ' बीज ' ऐवजीं ' बींब '—पाठ प्र. १ व ५.
१५०. ' फुलही ' ऐवजीं ' फलही '—पाठ प्र. ४.

॥ २ ॥ होमिसी यद्यपि राजसूयमेधीं । नेमें तप कर्षी आचरसी ॥ ३ ॥ पार्था जें तें करी मदर्पण सर्व । एक गेल्या गर्व तुका ह्मणे ॥ ४ ॥

**शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।**
**संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥**

३६६. घेऊनि सुकृत म्हणसी देसी काय । गोष्टी सुखमय तेचि ऐक ॥ १ ॥ फळा बऱ्या वाईटाचा तूं विभागी । पासुनियां उगी वृत्तिमुक्त ॥२॥ असा या संन्यासें युक्तचि तें त्वरा । पावसी सत्वरा मज मुक्त ॥३॥ तुकाराम[१५१] गुरु किंकर पावन । झाला तेणें जन उद्धरिले ॥ ४ ॥

**समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।**
**ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥**

३६७. भूतांकृति भिन्न छंद यांचे भिन्न । साधु सर्वांभिन्न एक मोह ॥ १ ॥ द्वेष ना उमटे जें प्रिय तें तैसें । धरित्रीचें असे शील जेवीं ॥ २ ॥ वडील धाकुटा सद्गुरु न जाणे । ऐसी ममता जेणें साधीजे गा ॥ ३ ॥ माझे ठायीं तोचि त्याचे ठायीं मीचि । दर्पण बींबाची तुका कळा ॥ ४ ॥

**अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।**
**साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥**

३६८. जरी असे दुराचारी । वाल्हा कोळी याचे सरी ॥ १ ॥ भजे मज न आणिका । शैव[१५२] जैसा कीं त्र्यंबका ॥ २ ॥ तो तो साधूच मानावा । जेथें देव सांपडावा ॥ ३ ॥ तेथें निश्चयेंचि देव[१५३] । तुकया नेणें हव्य कव्य ॥ ४ ॥

**क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।**
**कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥**

३६९. तो गा होतो शीघ्रगती । धर्मात्मा हे जाण स्थिती ॥ १ ॥ शांति

---

१५१. ' तुकाराम ' ऐवजी ' तुकादास '—पाठ प्र. ४ व ६.
१५२. ' शैव ' ऐवजीं ' वैश्य '—पाठ प्र. ६.
१५३. ' देव ' ऐवजीं ' दिव्य '—पाठ प. १.

शाश्वत पावतो । कीं मारुति मज भावतो ॥२॥ पार्था नासेना मद्भक्त । ध्रुव तेवीं राहे स्वस्थ ॥३॥ पैज घालीं तूं हे जगीं । तुका लीन पांडुरंगीं ॥४॥

**मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।**
**स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥ ३२ ॥**

३७०. चांडाळादीक जातीनें । आश्रय घ्यावा संगतीनें ॥ १ ॥ पावी तेही महा गती । येथें पुराणें गर्जती ॥ २ ॥ मातें पावती भजतां । येथें नाहीं द्वैतवार्ता ॥ ३ ॥ स्त्रिया वैश्य शूद्रही । तुका म्हणे पार नाहीं ॥ ४ ॥

**किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।**
**अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥**

३७१. पुण्य ब्राह्मण राजर्षी । गाधि जामदग्न्य ऋषी ॥ १ ॥ त्यांचें कायसें नवल । आहे मोक्ष चवरडोल[154] ॥ २ ॥ अनित्य दुःख मृत्युलोकीं । फळ हेंच गा अवलोकीं ॥ ३ ॥ मातें पार्थिवा भजावें । तुकया ऐसें उद्धरावें ॥ ४ ॥

**मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।**
**मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥**

३७२. आतां प्रसंगांतीं गोष्ट । तुसीं एक बोलूं स्पष्ट ॥१॥ मन ज्यांचें माझ्या रूपीं । भक्ति जैशा माझ्या गोपी ॥ २ ॥ माझें यजन वंदन । राधाप्रिय नंदसून ॥३॥ मदाश्रित चित्त असे । मज पावे तुका कैसें ॥४॥

३७३. [155] ऐसा अध्यायींचा अर्थ । नवमीं ऐके भला पार्थ ॥ १ ॥ प्रसंग संपला येथुनी । भाव जाणावा सज्जनीं ॥२॥ राजविद्या राजगुह्य । योग वर्णिलासे पाहे ॥ ३ ॥ श्रवणपठणें संशय । तुका म्हणे लया जाय ॥ ४ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे राजविद्याराजगुह्ययोगो नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥**

इति श्री अभंग नवमः ॥ श्री पांडुरंगार्पणमस्तु ॥[46]

---

१५४. = देवळांतील देवामागील मांदेराप किंवा प्रभावळ.

१५५. हा अभंग प्र. ४ त नाहीं.

॥ अथ दशमोऽध्यायः ॥

## — विभूतियोग —

### श्रीमद्भगवद्गीता अभंगात्मक दशमोध्याय

**श्रीभगवानुवाच ।**

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

३७४. अहो ऐका विद्वज्जन । संत चतुर सज्जन ॥१॥ माझी दुर्बळाची मती । मान्य करा ठेवून प्रीती ॥ २ ॥ जेणें रंजे तुमचें चित्त । नसे साहित्याचा हात [१५६] ॥ ३ ॥ बहु पंडितां पुढारी । लाजे अर्पिका वैखरी ॥ ४ ॥ आतां लागले जें कासे । नये सोडूं त्या प्रयासें [१५७] ॥ ५ ॥ बाळ मित्र रंक गोष्टी । देवें ऐकल्या गोमटी ॥ ६ ॥ जेथें वाटे शालजोडी । तेथें केतुली घोंगडी ॥ ७ ॥ तुमचें केणें कापुराचें । माझें तेणें [१५८] कापुसाचें ॥ ८ ॥ जेथें खवळले रणशूर । त्यांत गांढ्याचा[१५८] बडिवार ॥ ९ ॥ परि ईश्वराकरितां । मज सांपडली गीता ॥ १० ॥ तिच्या संगें अंगीकार । केला तरी द्यावी थार ॥ ११ ॥ आतां देवांचाही देव । बोले दशमीं वासुदेव ॥ १२ ॥ कीं कीरिटी पुन्हां ऐक । बोल माझा हा रसीक ॥ १३ ॥ तुझ्या हितालागीं वदे । ना त्या मीसें अंतरीं नांदे ॥१४॥ हित ज्ञेयाचें जाणीवे । प्रीति मानिसी स्वभावें ॥ १५ ॥ तुका म्हणे भावार्थी या । देव बोलिला कौंतेया ॥ १६ ॥

---

१५६. ‘ हात ’ ऐवजीं ‘ हेत ’—पाठ प्र. १.
१५७. ‘ प्रयासें ’ ऐवजीं ‘ प्रकाशें ’—पाठ प्र. ४, ७ व ८.
१५८. ‘ तेणें ’ ऐवजीं ‘ देणें ’—पाठ प्र. १; व ‘ गांढ्याचा ’ ऐवजीं ‘ गारयांचा ’—पाठ प्र. ४, ७ व ८.

**न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।**
**अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥**

**३७५.** पार्था देव इंद्रादिक । अथवा ऋषींचे नायक ॥ १ ॥ आमुचा प्रादुर्भाव यांतें । न समजला निगम मतें ॥ २ ॥ कीं मी देवां महर्षींचा । आदि कारण सर्वांचा ॥ ३ ॥ तुका म्हणे बीजास्तव । झाला तद नेणे देव ॥ ४ ॥

**यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।**
**असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥**

**३७६.** सुज्ञ त्यांस आम्हीं म्हणूं । माझें महात्म्य लागे वर्णूं[१५९] ॥१॥ अज अनादित्वें ईश । मुख्य सर्वां जो सर्वेश ॥ २ ॥ मनुष्यांत बंधांतुनी । तो सुटला तूं हें मानीं ॥ ३ ॥ तोंड देखलीच गोष्ट । नव्हे तुकया नेदु कष्ट ॥ ४ ॥

**बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।**
**सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥**

**३७७.** आतां सत्पुरुष कैसा । जगीं मान्य सांगू तैसा ॥ १ ॥ बुद्धि ज्ञान क्षमा सत्य । निज शांतीची अगत्य ॥ २ ॥ करी इंद्रियनिग्रहो । चंद्रकले ग्रासुनी राहो ॥ ३ ॥ मोह नाश सुखदुःखें । जन्ममृत्युभयें हरिखें ॥ ४ ॥ तुका करितो विनंती । चिन्हें[१६०] सांगे कमळापती ॥ ५ ॥

**अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।**
**भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥**

**३७८.** तप दान दया साम्य । तुष्टि कीर्ति अकीर्ति गम्य ॥ १ ॥ होती मजचि पासुनी । ऋतु जैसे नभस्थानीं ॥ २ ॥ भूतांचेही पृथक् भाव ।

१५९. ' वर्णू ' ऐवजीं ' गणूं '—पाठ प्र. १.
१६०. ' चिन्हें ' ऐवजीं ' कृष्ण '—पाठ प्र. ४.

लहरीप्रती सिंधु ठाव ॥ ३ ॥ तैसें खेळणें ययाचें । अंतीं[161] आमुच्या तुकयाचें ॥ ४ ॥

**महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।**
**मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥**

३७९. कौशिक भारद्वाजादिक । सप्तऋषी वैवार्णिक । चौघे मनु मिळून । ऐक । अकरा झाले संख्येनें ॥१॥ सनक सनंदन थोर । बुध सूर्य सनत्कुमार । मानसपुत्र हे साचार । पै धात्याचे ओळखे ॥ २ ॥ पूर्वीं झाले हे मद्भक्त । त्याग सर्वांचा विरक्त । परि पाहातां ज्यांची शक्त । प्रजा त्यांच्या लोकीं या ॥ ३ ॥ तुका म्हणे आणिक एक । श्लोक ब्रह्मांडनायक । बोलेल तो पुण्यश्लोक । सावधान ऐकिजे ॥ ४ ॥

**एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।**
**सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥**

३८०. एवं विभूतियोगास । कीं मी आत्मा या सर्वांस । व्यापून वेगळ्यापणास । जो जाणेल जाणता ॥ १ ॥ तोच कोणे एके वेळें । येऊनियां स्वरूपीं मिळे । हेहीं नको हृदयशाळें । टाक मुद्रा तयाची ॥ २ ॥ म्हणउनी अचला अन्वय । मातें योजे निःसंशय । तुकयाची कृपा होय । तो शुक ऐसा अनुभवी ॥ ३ ॥

**अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**
**इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥**

३८१. नाहीं मजविण कांहीं । उदकाविण रस नाहीं । बरें विचारूनियां पाही । मी उद्भव सर्वांचा ॥ १ ॥ मज पासून सर्वही । भारभूताचळा मही । शेष केला कूर्म तोही । आहे वराह आधारें ॥ २ ॥ त्यासही धर्म मूळ लिंग । स्तंभ त्याचा आहे संग । पुढें न सुचे मग जग । म्हणती आधार अच्युत ॥ ३ ॥ ऐसें जाणूनि भजती । अभिज्ञाची अति प्रीती । तुका विनवितां चित्तीं । संशय उडे परिवारें ॥ ४ ॥

---

१६१. ' अंतीं ' ऐवजीं ' अंकीं '—पाठ प्र. १.

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।
कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥ ९ ॥

३८२. सर्व साधनांच्या कळा[१६२] । प्राण चित्त हे चपळा । स्थिरावल्या एक पळा । मग उणें तें काय ॥ १ ॥ यास माझा बोध दावी । बळे तरी युक्त बरवी । नातरी आस्था सोडावी । सुखें ध्यावीं मन्नामें ॥ २ ॥ मग मी काळाचि काळाचा । ग्रास करीन खळांचा । परि आत्मिक स्थळांचा । नेदीं पडों अंतर ॥ ३ ॥ मज वर्णिती सर्वदा । गाती मन्नाम संपदा । कोणी नाचे या संवादा । ऐकोनि तुकयाच्या ॥ ४ ॥

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १० ॥

३८३. तया ऐसा सदा युक्त । जेवीं कौरवीं देवव्रत । प्रपंचीं असून विरक्त। श्रेष्ठ माथां वंदिती ॥ १ ॥ प्रीतीपूर्वक भजनासी । केल्या म्हणसी काय देसी । तरी बुद्धियोगा कैसी । वृद्धि करतो हें नवल ॥ २ ॥ मज जेणें का पावती । ऐसी अचळ करितो मती । तुकया अंगीं प्रळय गती । लागेनाच[१६३] सर्वथा ॥ ३ ॥

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

३८४. योग कृपेचा खडतर । नासत तमाचा अंधार । ज्ञानदीप सुधाकार[१६४] सुखें हातीं वागवी ॥१॥ जें अज्ञान जड द्वाड । भ्रांति लाविते कवाड । मग न दिसे मद्दा गाढ । मध्यरात्रीं अमावासीं ॥ २ ॥ मग ज्ञानार्क झळकतां । तमा पळवी दिगंता । तैं गा सौख्याचा मागता । तुका झाला होता कीं ॥ ३ ॥

१६२. ‘ कळा ’ ऐवजीं ‘ काळ ’—पाठ प्र. १.
१६३. ‘ लागेनाच ’ ऐवजीं ‘ लागेना तो ’—पाठ प्र. १.
१६४. ‘ सुधाकार ’ ऐवजीं ‘ शुद्ध आकार ’—पाठ प्र. ४.

अर्जुन उवाच ।

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।
पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥

३८५. अर्जुन बोले विनयभावें । कांहीं वाक्य ऐकावें । एक अपराध स्वभावें । आमुचा आम्हां वाटतो [165] ॥१॥ तोच बोलून दाखवूं । राखो कायसा अपाऊ । जेणें घेतलासे जीऊ । तो काळज्वर टाळावा ॥ २ ॥ परब्रह्म अधिष्ठान । तुझें अत्यंत पावन । आत्मा शाश्वत निधान । आलें येथें कळोनी ॥ ३ ॥ आदिदेव [166] दिव्य मूर्ती । अज प्रभुवरा कीर्ती । मातें समजली धृती । तुक्या वैश्यासारिखी ॥ ४ ॥

आहुस्त्वामृषयः सर्वेदेवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥

३८६. या रीतीं म्हणती तूंतें । घेऊन श्रुतींचीं संमतें । ऋषी राजर्षी सहितें । नारदादि देवऋषी ॥ १ ॥ देवल व्यास असीत । स्वयें येऊन सांगत । उमजलें जया हित । संजया ऐसें आमुचें ॥ २ ॥ परि काळसर्प दंशें । तनु व्यापिली सारांशें । न ये समज उद्देशें । आतां तुका गहिंवरे ॥ ३ ॥

सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
न हि ते भगवन् व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥

३८७. हें आजीच वाटे सत्य । पहिली ना धरूं अगत्य । गाणें ऐकूं उपांगीत । नादीं जीव ठेवून ॥ १ ॥ तुम्हावरी भाव कैसा । जिवलग सुहृद जैसा । आज उमटला ठसा । परब्रह्मा तव मुखें ॥ २ ॥ हे भगवन् तुझी व्यक्ति । दैत्य दानव नेणती । तेथें आमुचा पाड किती । तुका तरी मनुष्य ॥ ३ ॥

---

१६५. ‘ वाटतो ’ ऐवजीं ‘ आठवे ’—पाठ प्र. १.

१६६. ‘ आदिदेव ’ ऐवजीं ‘ आदिदेहीं ’—पाठ प्र. ४ व ६.

**स्वयमेवात्मनात्मनं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।**
**भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥**

३८८. स्वप्रकाशाचें रूप । अंगें होसी स्वयंरूप । सर्व जाणतयांचा भूप । पुरुषोत्तम पुरुषीं ॥ १ ॥ भूतपालक भूतेशा । देवदेव जगत्परेशा । आमुची पुरविजे आशा । हेच इच्छा तव मनीं ॥ २ ॥ वसुदेव बंदिस्तव । निवटिला दैत्यराव । मज वाटे वासुदेव । झाला मजकरितां ॥ ३ ॥ मोहबंदीं पडिलों होतों । तव कृपें मुक्त झालों तो । तुका वरदें तरला तो । गुरुदास हें नवल [१६७] ॥ ४ ॥

**वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।**
**याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥**

३८९. तुझिया विभूती ज्या दिव्य म्हणताती । पांगलीसे कीर्ति महीपृष्ठीं ॥ १ ॥ अशेष आघवीं मातें निरुपावी । यश तूं गोसावी संपादीं हें ॥२॥ विभूतीनें लोक व्यापून हे देख । असतोसी व्यापक सदोदित ॥ ३ ॥ तुकया आनंद सांगतां संवाद । कीं प्राम वरद तोही सुखी ॥४॥

**कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।**
**केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन् मया ॥ १७ ॥**

३९०. कैसे योगेश्वरा तूंतें या अंतरा । चिंतून संसारा मुक्त होणें ॥१॥ सदा मी चिंतितों तुज ठावा आहे तो । आहेसी सांग तूं [१६८] कोण्या रूपें ॥ २ ॥ योग्य या चिंतनीं जेणें मोक्षदानीं । तें स्थूल ध्यानीं प्रकटीं देवा ॥ ३ ॥ शेषासी न कळे तुकीं अगम्य लीळे । अंथरुणीं वळे याच लाजा ॥ ४ ॥

---

१६७. ' नवल ' ऐवजीं ' वाणूं '—पाठ प्र. ४.

१६८. ' सांग तूं ' ऐवजीं ' सांगतो '—पाठ प्र. १.

विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

३९१. विस्तारें आपुला योग हा संचिला । म्हणसी नाहीं दिला कोणा पुढें ॥ १ ॥ परी मी अनन्य जाणून अमान्य । केल्या हें जघन्य बाधी तुज ॥ २ ॥ जनार्दना विभूती बदाव्या मागुती । कां जे नव्हे तृप्ती श्रवणामृतें ॥ ३ ॥ अमृत अमर करती गणती वर । तुझी अगोचर कृपा सुधा ॥४॥ आतां अर्जुनाची आशंका जीवींची । फेडितां कृष्णाची पूर्ण दया ॥ ५ ॥ तोच शब्द ऐका सावध करी तुका । व्यापार लटिका सोडा म्हणे ॥ ६ ॥

श्रीभगवानुवाच ।

हन्त ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

३९२. हर्षे कृष्ण म्हणे दिव्या ह्या जाणणें । विभूती स्वमनें प्रकाशितो ॥ १ ॥ तूंतें या आपुल्या ऐशा सांगितल्या । होतील ऐकिल्या नाहीं ऐशा ॥ २ ॥ प्रत्यक्ष पाहासी साक्षात्कार घेसी । परि नसे त्यांसी आदि अंत ॥ ३ ॥ सांगेन मुख्यत्वें परिसे निजसत्त्वें । तुकया धन्यत्वें नांवाजून ॥ ४ ॥

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।
अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥ २० ॥

३९३. विभूती मुख्य मी आत्मा नरस्वामी । नीळीमा तो व्योमीं व्यापी जैसा ॥ १ ॥ सर्वांच्या आशयीं स्फुरे सर्वा ठायीं । रीक्तपण नाहीं अणुभर ॥ २ ॥ आदि त्या जडांच्या मध्यांत युक्तीच्या । वैष्णवी शक्तीच्या आधारें ह्या ॥ ३ ॥ घटाला मृत्तिका जेवीं व्यापी ऐका । तैसा आम्हां तुका एकविध ॥ ४ ॥

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान् ।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥

३९४. अदिति आदित्य प्रसवली सत्य । बारावा सांप्रत अहं विष्णु ॥ १ ॥

दृश्य ज्योति यांत सूर्य मीं साक्षात । तरी प्रकाशित पृथ्वीपटा ॥ २ ॥ मरिची मरुत चंद्र ताराकांत । औषधी पोषीत रविस्पर्शे ॥ ३ ॥ क्षयकलंकांनीं बेला जरी व्यापुनी । सदाशिव मूर्ध्नी विराजला ॥ ४ ॥

वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः ।
इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

३९५. सर्वां वेदांमाजीं सामवेद आजी । प्रगटला तेजीं माझ्या रूपीं ॥ १ ॥ इंद्र जो देवांचा व्यापार भुवनाचा । शास्ता दानवांचा वज्री तो मी ॥ २ ॥ तेविंच[169] इंद्रियग्रामीं वावरे मनस्वामी । अनिवार ना तीं[169] अंशें माझ्या ॥ ३ ॥ आतां भूताकृति यामाजि प्रतीती । बोले गोपीपती तुका म्हणे ॥ ४ ॥

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥

३९६. रुद्रांत शंकर यक्षांत कुबेर । वसूंमध्यें थोर पावक मी ॥ १ ॥ शिखरींमाजि मेरू बोले जगद्गुरु । आहे ज्याचा भारु पृथ्वी मानीं ॥ २ ॥ उत्तरें उत्तरे सुरभारें न ठरे । दक्षिण धावरे[170] क्षेत्रासह ॥ ३ ॥ मग अगस्तीसी स्थापिलें वेगेंसी । तुकया वरेसी धीर झाला ॥ ४ ॥

पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥

३९७. पुरुहुतीं श्रेष्ठ पुरोहित वरिष्ठ । देवगुरु श्रेष्ठ अंश माझा ॥ १ ॥ तरी तेहतीस कोटी घालून पदीं मिठी । निज हित गोष्टी विचारिती ॥२॥ आतां पार्था स्वामी कार्तिक अग्र्य मी । सेनापतींत मी म्हणवितों ॥ ३ ॥ सरोवरीं सिंधु म्हणवी दीनबंधु । जेणें दिला वेधु तुकयासी ॥ ४ ॥

---

१६९. ' तेविंच ' ऐवजीं ' मिषें ' व ' ना तीं ' ऐवजीं ' नामीं '— पाठ प्र. १, ७ व ८.

१७०. ' दक्षिण धावरे ' ऐवजीं ' दक्षिणहि द्यारे '—पाठ प्र. ४, ७ व ८.

महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

३९८. महर्षींत भृगु देव म्हणे सांगूं । ज्याच्या क्रोधें वाणूं शांतिरूपें ॥ १ ॥ वाणींत प्रणव अक्षरीं स्वभाव । बोले वासुदेव ऐक्यरूपें ॥ २ ॥ यज्ञीं जपयज्ञ जाण मी सुयज्ञ । पावती अभिज्ञ वांछितही ॥ ३ ॥ अचळीं हिमालय मींच स्वयें होय । तुकयासी ठाव सांपडला ॥ ४ ॥

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥

३९९. सर्वही वृक्षांत राया पिंपळ थोर । माझाच आकार मूर्तीमय ॥ १ ॥ देवर्षींत मीच झालों गा नारद । कीर्तनाचा छंद वाढवाया ॥ २॥ कलह लावून पाहातों कौतुक । क्रोध त्रिपुरांतक ज्याचा नये ॥ ३ ॥ देवां दैत्यांसम मान्य गुरु जैसा । कंस कृष्ण तैसा राखो जाणें ॥ ४ ॥ आत-चित्ररथ मीच गंधर्वांत । कपिल सिद्धांत तुका आला ॥ ५ ॥

उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेन्द्राणां च नराणां नराधिपम् ॥ २७ ॥

४००. उच्चैःश्रवा अश्वीं झाला क्षिराब्धींत । गजीं ऐरावत मीच होय ॥ १ ॥ नरांत भूपाळ मी होय अर्जुना । अकर्म शासना नैय्यायिकीं ॥ २॥ राजनिंदा केली ते मातें लागते । मच्छापबाधा ते प्राणी पावे ॥ ३ ॥ तुका म्हणे राज्य आम्हां त्रिभुवनींचें । सहज निंदकांचें तोंड काळें ॥ ४ ॥

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥

४०१. आयुधीं मी वज्र करीं गिरि चूर । तेजें ज्या थरार धरा कांपे ॥ १ ॥ अंगवाता धाकें शेष जिव्हा काढी । चंद्र दैत्यमढीं जिता होय[१७१] ॥ २ ॥ एवढा प्रताप दधीची ऋषीचा । त्याचिया हाडाचा दंभोली हा ॥ ३ ॥ धेनु कामधेनु संतानांत काम । सर्पीं तुका नाम वासुकि तो ॥४ ॥

---

१७१. या पादाऐवजीं ‘ चंड दैत्यमढीं जीता होय ’—पाठ प्र. १.

**अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।**
**पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥**

४०२. जळजंतूंमाजीं म्हणवितों वरुण । शेष मी आपण नाग जातीं ॥ १ ॥ म्हणून अवतारीं रक्षितो पाठीसीं । मजहून गुणेंसीं आगळा जो ॥ २ ॥ पितृगणांमाजी अर्यमा म्हणवितों । भाग सर्व देतों पितरांसी ॥ ३ ॥ निग्रहकर्त्यांत यम म्हणवितों । ज्यासी लोक भितो तुका म्हणे ॥४॥

**प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।**
**मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥**

४०३. मागील श्लोकांत पितृवृंदीं जाण । अर्यमा हे खुण ओळखावी ॥ १ ॥[१७२] दैत्यांत प्रल्हाद मीच रक्षपाळ । चाळणारा काळ मीच झालों ॥ २ ॥ श्वापदांत सिंह तैसाच खगेंद्र । पक्ष्यांत पक्षींद्र रूप माझें ॥ ३ ॥ शेषाही अधिक भक्ति गरुडाची । तैसीच आमुची तुका म्हणे ॥ ४ ॥

**पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।**
**झषाणां मकरश्चाहं स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥**

४०४. उडती त्यांत वायू शस्त्रपाणीयांत । जानकीचा कांत राम तो मी ॥ १ ॥ मत्स्यांत मगर नद्यांत जान्हवी । रूपें ओळखावीं माझ्या ठायीं ॥ २ ॥ तरीच मस्तकीं घेऊन स्वर्धुनि । शिव आनंदवनीं विराजला ॥३॥ कलियुगीं नाम तारक हरिचें । तैसें भागिरथीचें जीवन तुका ॥ ४ ॥

**सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।**
**अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥**

४०५. आद्यंत तयां तत्त्व सृष्टीचा पांडवा । मध्यही मी तेव्हां प्रकाशीत ॥ १ ॥ ऐसी जाणे खुण विद्या ते अध्यात्म । म्हणवी पुरुषोत्तम विद्येमाजीं ॥ २ ॥ तत्त्ववेत्त्यांमाजीं तत्त्व म्हणवितो । ज्यामाजीं विरतो तुका स्वयें ॥३॥

---

१७२. हा चरण फक्त प्र. २ मध्येंच आहे.

**अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च ।**
**अहमेवाक्षयः कालो धाताहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥**

४०६. अक्षरीं आकार मीच धनंजया । समासीं सखया द्वंद्व नामीं ॥१॥ नित्य जो कां काळ मी स्वयें गोपाळ । आधार सबळ सर्वांचा मी ॥ २ ॥ सर्वां सर्व मुखीं तृप्त अन्नदाता । जीवां वांचविता मीच तुका ॥ ३ ॥

**मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।**
**कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥**

४०७. मरण मी जीवां संहर्ता जयांची[१७३] । जेथें जाणीवेची कळा लोपे ॥ १ ॥ जन्म मी म्हणून होतो पुत्रोत्सव । रंक हो कां राव सुख सम ॥ २ ॥ नारींत स्त्रीलिंगी कीर्ति जे श्री वाणी । जेणें गुणें प्राणी महत्त्वा ये ॥ ३ ॥ स्मृति प्रज्ञा धृति क्षमा तुकारामीं । पावला आरामीं निरंतर ॥ ४ ॥

**बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।**
**मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥**

४०८. सामवेदीं जाण बृहत्सामसूत्र । विचारांचें पात्र तेंही मीच ॥१॥ छंदीं गायत्री जे नामें मी पांडवा । मासांत जाणावा मार्गशीर्ष ॥ २ ॥ ऋतूंत वसंत वर्णी ज्यास व्यास । तुका म्हणे त्रास कळिकाळा ॥ ३ ॥

**द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।**
**जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥**

४०९. कपट्यांमाजी द्यूत तें मीच साक्षात् । चोरी बाजारांत न वारवे ॥ १ ॥ तेजस्वी पुरुषांत[१७४] तेज तें माझेंची । कां जे समर्थाची सत्ता नाहीं ॥ २ ॥ आतां जय तेवीं निश्चयही मींच । दिवसेंदिवस[१७५] उंच कळा चढे ॥ ३ ॥ सत्त्ववंतीं सत्त्व माझेंच पांडवा । जगानीं जाचावा स्वस्थ तुका ॥ ४ ॥

---

१७३. ' संहर्ता जयांची ' ऐवजीं ' न कळतां जाचा '—पाठ प्र. १.
१७४. ' पुरुषांत ' ऐवजीं ' स्त्रियांत '—पाठ प्र. १.
१७५. ' दिवसेंदिवस ' ऐवजीं ' दिनेदिने '—पाठ प्र. १.

**वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः ।**
**मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥**

४१०. वृष्णिवंशीं वासुदेव । तो मी म्हणे देवराव ॥ १ ॥ ज्याचे अचाट पवाडे । वर्णनीं शुक व्यास वेडे ॥ २ ॥ विधिशक्रां अगोचर । नंदगोष्टांगणी ईश्वर ॥ ३ ॥ असो पांच पांडवांत । धनंजय तूं साक्षात ॥ ४ ॥ तापसवेषें बहीण नेली । आमुची मर्जी न पांकळली ॥ ५ ॥ कां जें दोघांचें एकत्व । मुनींत व्यास तेवीं तत्त्व ॥ ६ ॥ कविंमाजीं शुक्र जो कां । तोही मीच मानी तुका ॥ ७ ॥

**दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।**
**मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥**

४११. दंडकर्त्यांमध्यें दंड । तो मी म्हणोनि प्रचंड ॥ १ ॥ जी कीं न्यायमार्गी नीति । तेही मच्छक्ती निरुती ॥ २ ॥ परेचें जें गुह्य मौन । मीच न जाणें ईशान ॥ ३ ॥ आतां ज्ञान जें ज्ञानियां । ज्ञानेश्वर वंद्य ठाय ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसे रीती । सांगूनियां भगवंतीं ॥ ५ ॥

४१२. [176]औषधींमाजीं मी अन्न । एवं सर्व लोकीं मान्य ॥१॥ धातूं-माजी जें कांचन । रूप माझें सनातन ॥ २ ॥ दश दर्भांमाजी कुश । तो म्हणे मी हृषिकेश ॥३॥ ऐकें नरेश पार्थिवा । तुका मानवीं वानावा ॥४॥

**यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।**
**न तदस्मि विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥**

४१३. जें नित्य सर्वही भूतां । बीज तें मी पंडुसुता ॥ १ ॥ न घडे कीं मजविण । चराचरांचें कारण ॥२॥ मातें मूढ न ओळखे । पैं मी सर्वांसी पारिखे ॥ ३ ॥ तुकीं उत्तरे आमुचें । एक मानस तुकयाचें ॥ ४ ॥

**नान्तोऽस्मि मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।**
**एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥**

४१४. झाल्या मजची पासून । दिव्य म्हणों त्यालागून ॥ १ ॥ माझ्या

---

१७६. हा अभंग प्र. १ लींत अधिक आहे—पाठ. प्र. १.

विभूतींचा अंत । परंतपा[१७७] जाणे मात ॥ २ ॥ ह्मा तो विभूतिविस्तार। पाहूं न शके दिनकर ॥३॥ म्यां वर्णिला संक्षेपें । ऐक तुकया आक्षेपें ॥४॥

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

४१५. आतां जे का भाग्यवंत । प्राणी उर्जित[१७८] श्रीमंत ॥ १ ॥ ठसा दैवाचा प्रगटे । सौख्यसिंधु विश्वीं दाटे ॥ २ ॥ तो तो प्राणी कीर्तिमान । जाणें मीच भगवान ॥ ३ ॥ आहे तेजोंशसंभव । तरी तुकयाचा भाव ॥ ४ ॥

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥

४१६. आतां बहुता या ज्ञानें । फांटा भरिजेल मनें ॥ १ ॥ किती अर्जुना जाणसी । [१७९]श्रम नदी उतरसी ॥ २ ॥ जें कां उतरलें अधिष्ठुनी । एक अंशें हें जग मानी ॥ ३ ॥ तुका बदला किंचित । झाला बिस्तार बहुत ॥४॥

४१७. [१८०] झाला प्रसंग समाप्त । कृष्ण अर्जुना संमत ॥ १ ॥ योगशास्त्र खरें दिसे । माया भंजनें शस्त्र असे ॥२॥ येथें विभूती वर्णिल्या। अर्जुना अंगीं विस्तारिल्या ॥ ३ ॥ आतां पुढें चमत्कारें । तुका बोलेल आदरें ॥ ४ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विभूतियोगो नाम दशमोऽध्यायः ॥ १० ॥

इति गीता अभंग दशमोध्यायः । प्रसंग १० ॥ [४६]

---

१७७. ' परंतपा ' ऐवजीं ' परंपरा '—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.
१७८. ' उर्जित ' ऐवजीं ' होते '—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.
१७९. ' श्रम ' ऐवजीं ' प्रथम '—पाठ प्र. १.
१८०. ' हा अभंग प्र. १, २, ७ व ८ मध्यें आहे.

॥ अथैकादशोऽध्यायः ॥

## — विश्वरूपदर्शनयोग —

श्रीभगवद्गीता अभंगात्मक एकादशोध्यायः ॥

४१८. [181]दशम[182] अध्यायीं बोलला। पश्य मे योगमेश्वर बोला ॥ १ ॥ कीं पाहे रे मम ईशाची। विश्वनिर्माण युक्तीची ॥ २ ॥ मजमाजीं विश्व नसे। विश्वामाजिं मी न दिसे ॥ ३ ॥ विश्वपट ब्रह्मदोरा। याही जाणवी विचारा ॥ ४ ॥ येथें संशय वाटला। विश्वरुपीं न भेटला ॥ ५ ॥ तरी हा होय कल्पतरू। मागतांच देईल वरू ॥ ६ ॥ मग काळजी ते वायां। ऐसा निश्चय करुनियां ॥ ७ ॥ पुढें एकामार्गे एक। श्लोक विभूति कौतुक ॥ ८ ॥ ऐकतांना पैं शेवटीं। अपूर्वता कृष्ण-गोठीं ॥ ९ ॥ मेकांशेन स्थितो जगत। पार्थ झाला अशंकीत ॥ १० ॥ तेंच प्रत्यक्ष पहावें। एकादशु तेणें भावें ॥ ११ ॥ तुका एक दशे आला। एक देशीं बावो झाला ॥ १२ ॥

**अर्जुन उवाच।**

**मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम्।**
**यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥**

४१९. घालुनियां लोटांगण। करी आपण विनंती ॥ १ ॥ माझ्या अनुग्रहास्तव। वासुदेव कृपाळू ॥ २ ॥ केवळ गुह्य जें अध्यात्म। ऋषी उत्तम नेणती ॥ ३ ॥ तुवां बोधिलें तेणेंचि। व्यामोहाची बोळवण ॥ ४ ॥ झालों पूर्ण परी ऐका। शब्दीं तुका बुझतो ॥ ५ ॥

---

१८१. फक्त प्रत १, २ व ५ मध्यें हा अभंग दिला आहे.
१८२. 'दशम' ऐवजीं 'नवम' असें प्रत १ मध्यें चुकीनें पडलें आहे.

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतो विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥

४२०. सृष्टिसंहार भूतांचे । निश्चय साचे तूजपून ॥ १ ॥ तुजपासुनी विस्तार । चराचर आघवें ॥ २ ॥ पद्मदळाक्षा महात्म्य । मनोरम हें तुझें ॥ ३ ॥ दिव्य ऐकलें तुकयानें । भरंवशानें सूटला ॥ ४ ॥

एवमेतद्यथात्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

४२१. आपणातें हें बोलसी । आशंकेसी परिहार ॥ १ ॥ परमेश्वरा गा ऐसेची । करी कृपेची सुवृष्टि ॥ २ ॥ विश्वरूप तुझें पाहो । तेणेंच हो निःशंक ॥ ३ ॥ इच्छितो मी पुरुषोत्तमा । जे कां[१८३] क्षमा तुकयाची ॥ ४ ॥

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।
योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥

४२२. जरी असे पाहों ये मी । दिसे कर्मी अधिकार ॥ १ ॥ समर्था मानसी तरी । कृपा करी महाराजा ॥ २ ॥ आपणातें तूं अव्यया । योगनिलया दाखवी ॥३॥ अधिकार तुझ्या मुखें । तुकया सुखें झालासी ॥४॥

श्रीभगवानुवाच ।

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

४२३. हरिखे पार्थाचिये स्तुती । तो श्रीपति साहे ना ॥ १ ॥ म्हणे उदार वाक्यानें । शतशतातें पश्य मे ॥ २ ॥ सहस्रशें रूपें पार्था । त्यांत वृथा ना कोणी ॥ ३ ॥ दिव्य नाना प्रकारचीं । आकृतींचीं भिन्नत्वें ॥४॥ जे कां वेधक तुकयाचें । मीपणाचें मूळ नाशी ॥ ५ ॥

---

१८३. ' जें कां ' ऐवजीं ' जिका '—पाठ प्र. ४.

**पश्यादित्यान् वसून् रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।**
**बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ।। ६ ।।**

४२४. वसु रूद्र देव पाहे । आणि पुत्र हे अश्विनी ॥ १ ॥ देखिलें तें न ये पाहो । मग तूं लाहो घेसील ॥ २ ॥ भारता हें बहु नवल । पूर्वी बोल अदृष्ट ॥ ३ ॥ तुकयाचा भाव जैसा । हरि तैसा बोलला ॥ ४ ॥

**इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।**
**मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ।। ७ ।।**

४२५. देहीं माझ्या यां एकत्र । भरींव पात्र न्याहाळीं ॥ १ ॥ चराचर पाहे आजी । कोठें न दुजी कल्पना ॥ २ ॥ गुडाकेशा सर्व विश्वा । मीं विसांवा अक्षयीं ॥ ३ ॥ जें एकदां पाहिलियां । इच्छा तुकयाची गेली ॥ ४ ॥

**न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।**
**दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ।। ८ ।।**

४२६. परि याच स्वदृष्टीनें । अदेखणें होईल ॥ १ ॥ मज पाहों न शकसी । हें मानसीं उमजलों ॥ २ ॥ तूंतें देतों दिव्य दृष्टी । जेणें कष्टी ना होसी ॥ ३ ॥ पाहें ईश्वरी हा योग । निरुद्वेग तुकयाचा ॥ ४ ॥

**संजय उवाच ।**

**एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।**
**दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ।।**

४२७. उल्हासला संजय बोले । हें ऐकिलें कीं नाहीं ॥ १ ॥ राया ऐसें बोलोनियां । पार्थप्रिय श्रीकृष्ण ॥ २ ॥ महा योगेश जो हरि । दावी सारीं स्वकळा[१८४] ॥ ३ ॥ रूपश्रेष्ठ परमेश्वर । करी गोचर तुकयासी ॥४॥

---

१८४. ' स्वकळा ' ऐवजीं ' सकळा '—पाठ प्र. ४ व ७.

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥

४२८. नाना नेत्र मुखें ज्यांत । जे विक्रांत सौम्यही ॥१॥ नाना दर्शनें अद्भुत । पाहातां मुक्त पांतंका ॥ २ ॥ दिव्य नाना आभरणें । दिशा जेणें समजेना ॥ ३ ॥ आयुधें नाना तीक्ष्ण करीं । तुकया शिरी वंदित[१८५] ॥ ४ ॥

दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

४२९. दिव्य पुष्पी वस्त्रीं दिव्य । मूर्ती भव्य रूपाच्या ॥ १ ॥ दिव्य गंधा विभूषिता । वासुवातादि वेडे ॥ २ ॥ दिव्य सर्वाश्चर्यमय । झाला कौंतेय विस्मित ॥ ३ ॥ जगदात्मक जो अनंत । तुका संत ज्यासाठीं ॥४॥

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥

४३०. नभ उजळलें तेजें । नेणों सहस्र या पैं जे । रवीकारूनि दिनकर राजे[१८६] । प्रभा पार्था दाविती ॥ १ ॥ तेज नव्हे तो बंबाळ । जीव पतंगा कवळ । ऐसे एकार्कीं कल्लोळ । एकसरें उटला ॥ २ ॥ महात्म्य पूर्वीं जें ऐकलें । तें एकाकीं रूपा आलें । महात्म्याचें नवल झालें । संगीं सांगायां नुरे ॥ ३ ॥ असो बोलणें बोलतां । रवीहून उपमितां । तुका म्हणे दशांशतां । उपमा नसे श्रुतीची[१८७] ॥ ४ ॥

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥ १३ ॥

४३१. कामधेनूपासुनि 'पात्र । होय एकाचे सहस्र । तैसा एक होतां उग्र ।

---

१८५. ' वंदित ' ऐवजीं ' अभय '—पाठ प्र. १.
१८६. ' राजे ' ऐवजीं ' जैसे '—पाठ प्रत १ व ५.
१८७. ' श्रुतिची ' ऐवजीं ' श्रुतिमान्य '—पाठ प्र. १ व २.

मूर्तिमय मग झाला ॥ १ ॥ नकळे पाहिली मागिली । वडिल कोणती घाकली । पृथक् पृथक् विस्तारली । सृष्टिवेल यापरी ॥ २ ॥ देवदेवांच्या शरीरीं । देखे तेव्हां कौरव अरी । तुका म्हणे लोभनगरीं । प्रवेशला भयभीत ॥ ३ ॥

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।
प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥

४३२. ल्हानशी मूर्ती होती । गुप्तपणें गेली केउति । घेऊनि आल्या ऐशा व्यक्ती । होत्या कोण्या संदुकींत ॥ १ ॥ हेंच आश्चर्याचें मूळ । कांटे उठले सोज्वळ । नेणें विनोदें सकळ । आमुचेंही नाशील ॥ २ ॥ ईश देखिलाही जरी । मायिक मोह न वचे दुरीं । बाप देहाची हे थोरी । मरे होय न लाजे ॥३॥ असो अर्जुन कंपित । देवा मस्तकीं वंदित । तैसे कृतांजली हात । तुका म्हणे बोलत ॥ ४ ॥

अर्जुन उवाच ।

पश्यामि देवांस्तव देव देहे
सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थम्
ऋषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

४३३. देहीं तुझ्या विश्वंभरा । देख सुरवरसंभारा । देखें बहुनीं साळंकारा । हंती हंती येरा उद्दीत ॥ १ ॥ आणिक एक नवलावो । पंचभूतां तुझा ठावो । त्यांचें दिसतें येवो जावो । पैं आधारें तुमच्या ॥ २ ॥ चराचर त्याचपरी । ब्रह्मा पद्मस्थानांतरीं । अहो पाहातां त्रिपुरारी । जटाजूट गंगेसी ॥ ३ ॥ मुनि दिव्य तेजोमय । नागकुळसमुदाय । ऐसा पाहिला प्रत्यय । तुका साधु ज्यासाठीं ॥ ४ ॥

अनेकबाहूदरवक्त्रनेत्रं
पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।
नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं
पश्यामि विश्वेश्वर विश्वरूपम् ॥ १६ ॥

४३४. नानाप्रकारीं जे दंड । मुख कराळ वितंड । नेत्र वैश्वानर कुंड । पोटें तैशीं भ्यासुरें ॥१॥ त्वद्रूप सर्वत्र अनंत । कोठें पाहातां नलगे अंत । अनादि तूं विश्वतात । मध्य अंतही तूंच ॥ २ ॥ तुज पाहे विश्वेश्वरा । विश्वरूपाच्या अंतरा । तुका म्हणे कमलावरा । भली रे आस पुरविली ॥ ३ ॥

किरीटिनं गदिनं चक्रिणं च
तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्तात्
दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

४३५. गदा धरिली उजवी । चक्र झळफळीत तेवीं । माथां मुकुटाची ठेवी । अनुपम वाटते ॥१॥ आज तेजसिंधुलहरी । घाली ढाळ आह्मांवरी । सर्वत्रही दिशांतरीं । दिप्ती मोठी फांकते ॥ २ ॥ सर्वत्र हें तुझें रूप । परि गा उग्रत्वाचें रोप । येथें दावाग्नी तो दीप । नेणो कोण्या झोंपडीं ॥ ३ ॥ रवी करपे ऐशी आग । किंवा बापा आला राग । तुका राखावा सन्मार्ग । युगायुगीं वाढाया ॥ ४ ॥

त्वमक्षरं परमं वेदितव्यं
त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता
सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

४३६. तूं महाराज समजलासी । शुद्ध अक्षर विलासी । ऐसें कळावें जीवासीं । मायापाशमुक्तत्वा ॥ १ ॥ आत्मा जगाचा गोविंदा । निधी

स्वभावें तूं सदा । तो तूं वाढला एकदां । शाश्वत धर्मपाळ जो ॥ २ ॥ जो कां नित्य तूं अव्यय । सर्वकाळ अप्रमेय । तुका वंदितसे पाय । याचें भय वाटतें ॥ ३ ॥

अनादिमध्यान्तमनन्तवीर्यम्
मनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं
स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥ १९ ॥

४३७. आदि नाहीं मध्य नाहीं । तेथें क्षय आला कांहीं । अनंतवीर्या तुज तेंही । काय सांगूं किती बोलूं ॥ १ ॥ भुजा अनंत आकृती । मग भासे तो शचिपती[१८८] । नेत्रसूर्य हा गभस्ती । तव सत्ते ना उडेल ॥ २ ॥ चंद्र मन म्हणवितें । नेत्री तेज दाखवितें । मुखीं अग्नि अनादि तें । रचना आज पाहिली ॥ ३ ॥ पाहें तयाचा प्रकाश । जो तूं दिनासी दिनेश । त्रिभुवनेसी आकाश । तुकयाठायीं दिसेना ॥ ४ ॥

द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि
व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाद्भुतं रूपमिदं तवोग्रं
लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

४३८. दिशा विदिशा पाहातां । अंतरिक्ष धुंडाळतां । तूं एक दिससी व्यापिता । हे कमलाक्षा कमलेशा ॥ १ ॥ देखोनी हें रूप उग्र ।अद्भुत अद्भुता अत्युग्र । लोक भिती समग्र । हें महात्म्य नवलाचें ॥ २ ॥ तुकयाचिया विनंती । प्रगट पुरवाव्या खंती । तंव सृष्टीच जळती । असतां आयुष्य गोपाळा ॥ ३ ॥

---

१८८. ' तो शचीपती ' ऐवजीं ' तोष चित्तीं '—पाठ प्र. १.

अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति
केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः
स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥

४३९. प्रवेशती हे सुरवृंद । जळीं जळजांसी आनंद । देहीं तुमाचिया खेद । हे पावती हें नवल ॥ १ ॥ कृतांजुली कृपाळुवा । तेही वाणिती तुज देवा । हो कां स्वस्ति ऐशा भावा । महा ऋषी बोलती ॥ २ ॥ सिद्ध मात्रही जितुका । म्हणून तूंतें स्तवी असका । हा विचित्र भासे तुका । पाहोनी झाला विस्मित ॥ ३ ॥

रुद्रादित्या वसवो ये च साध्या
विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घा
वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

४४०. आदित्य रुद्रादि वसु जे तदादि । आणि वेदविद्यीं प्रसिद्ध जे ॥ १ ॥ गंधर्वांचा मेळ यक्षगणपाळ । पाहाती सकळ वासुदेवा ॥ २ ॥ विस्मय पावती नेणें आला शांती । भय वागविती ययास्तव ॥ ३ ॥ मज नवल वाटे होतासी तूं कोठें । एकाएकीं भेटे तुझ्या कैसा ॥ ४ ॥

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं
महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं
दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥

४४१. जीं जीं त्वद्रूपें हें मोठेंसें बहु हें । नेत्रें तोंडें[१८९] पाहे भयानक ॥ १ ॥ भुजांघ्री या बहु मांड्या[१९०] उदरें बहू । कराळा त्या बहू द्रंष्ट्रा

१८९. 'नेत्रें तोंडें' ऐवजीं 'चक्षु मुखें'—पाठ प्र. १.

१९०. 'मांड्या' ऐवजीं 'जानु'—पाठ प्र. १.

तुझ्या ॥ २ ॥ बहु ज्यांत कांहीं देखोनी हें देहीं । भ्यालें जग हेंही मीही तैसा ॥ ३ ॥ मुखा आवर्षणा पडलें नारायणा । तुका ठेवी प्राणा कोणा ठायीं ॥ ४ ॥

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं
व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा
धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ॥ २४ ॥

४४२. अत्युच्च म्हणावें उंची ना गणावें । प्रलयाब्धि हेलावे तेजोमय ॥ १ ॥ दिव्य रूप सत्य नव्हे जें असत्य । आमुची अगत्य ऐसी नव्हती ॥२॥ चंड मुख ज्याचें ह्या दीप्त चक्षूंचें । भयें आत्मयाचें धैर्य गेलें ॥३॥ पाहातां ऐसें दुःख सोडून गेलें सुख । व्यापक ओळख तुकयाची ॥ ४ ॥

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि
दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

४४३. दंष्ट्रा ह्या कराळा नृसिंहाची लीळा । तुम्ही कां गोपाळा धारिलिसे ॥ १ ॥ हिरण्यकश्यपु नोहे येथें पार्थ आहे । कृपा करी मोहें पूर्ववत ॥ २ ॥ विक्राळ तोंडें काळाग्नीचीं कुंडें । देखल्याच पडे पाहाणारा ॥३॥ दिशा नेणें देवा सुख वासुदेवा । प्रसीदात्म भावा तुकयाच्या ॥ ४ ॥

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः
सर्वे सहैवावनिपालसङ्घैः ।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ
सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥

४४४. हे सर्वही जे जे धृतराष्ट्रवीर्य जे । त्यांचें साहाय्य जे अवांतर ॥ १ ॥ अवनीचे पाळ भीष्म येथें काळ । द्रोण आतुर्बळ कर्ण तैसा ॥२॥ आतां आमुचेही विश्वासाचे देही । त्यांचें नवल तेंही तुका बोले ॥ ३ ॥

वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति
दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु
संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥ २७ ॥

४४५. मुखें तुझीं जेथें सत्वर जाती तेथें । भयानक पंथें दंताचिये ॥ १ ॥ विक्राळ दंती दांतांत श्रीपती । चर्वी तूं वीरकांती ज्यांचीं शीरें ॥ २ ॥ अहो देवराया चाविसी हे वायां । आम्हां चिळशीया तुकया अंगीं ॥ ३ ॥

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः
समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा
विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥

४४६. नदी जळें जैसी वाहे ती बळेंसी । वेगें सिंधुपासीं मिळो येतां ॥ १ ॥ तोही आत्ममुखीं प्रवाहातें शोखी । तैसी ज्वाळामुखीं येथें दिसे ॥२॥ अनेक आननें ज्वाळामय रसनें । घेसी तूं स्वादानें रुची देवा ॥३॥ परंतु आश्चर्य वाटे लोकवर्य । प्रवेशतां धैर्य तुका म्हणे ॥ ४ ॥

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा
विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशन्ति लोकाः
तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

४४७. किंवा पेटलिया अग्निमाजीं काया । पतंग मराया एकवटे ॥१॥ तैसे लोकमेळ मराया सकळ । निघती केवळ तुझ्या मुखीं ॥ २ ॥ वेगें शस्त्रें अस्त्रें रथ साळंकारें । गज उष्ट्र वाजी रे वाहनेंसी ॥ ३ ॥ अपारांचीं येणीं अपार तुझी खाणी । सांडूं नेणें कोणी वदे तुका ॥ ४ ॥

**लेलिह्यसे ग्रसमानः समन्तात्**
**लोकान् समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।**
**तेजोभिरापूर्य जगत्समग्रं**
**भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥**

४४८. या सर्व लोकांस जेव्हां गिळतोस । ज्वाळामुखें त्यास चाटसी तूं ॥ १ ॥ तेव्हां प्रभा तीव्र तुझ्या दर्शनाग्र । मज गमे उग्र सौदामिनी ॥ २ ॥ जग करपे ज्यांत व्यापून तयांत । देव तपतात अति उग्र ॥ ३ ॥ नेणों कैसी भूक लागली अचुक । सोडली ओळख तुकयाची ॥ ४ ॥

**आख्याहि मे को भवानुग्ररूपो**
**नमोऽस्तु ते देववर प्रसीद ।**
**विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं**
**न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥**

४४९. तूं कोण या उग्र तनु बोले शीघ्र । घेईं कृपापात्र हितार्चे हें ॥ १ ॥ प्रसन्न तूं होईं तुज वंदन पायीं । करितों हें पाहीं देवराया ॥ २ ॥ जाणों तूतें इच्छीं प्रवृत्ति निर-इच्छीं । नेणें तुझी कैसी आद्य मूर्ती ॥ ३ ॥ कधीं ना देखला ऐसा नायकिला । तो तूं प्रगटला तुकया अंगें ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो**
**लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।**
**ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे**
**येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥**

४५०. देव बोले आतां महाबाहो पार्था । ऐकें रे अन्यथा न मानी तूं ॥१॥ जुनाट लोकांत काळ मी प्रत्यक्ष । मारूं पाहातों साक्ष पाहे माझी ॥२॥ लोकांस या येथें हारूं पाहातसे । न मारिसी केसे वांचतील ॥ ३ ॥ नरवीर सेनेमाजी जे असती । झाली त्यांची शांति धनुर्धरा ॥ ४ ॥ तुज माया येते ती मी सोडलिसे । आतां काय कैसें जाणों तुका ॥ ५ ॥

तस्मात् त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व
जित्वा शत्रून् भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव
निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥

४५१. म्हणून घे तूं हें उठ यश वेगीं । जिंकूनियां भोगीं राज्यलक्ष्मी ॥ १ ॥ सिद्धीची समृद्धि आहे तव निढळीं । निवटी मंडळी राजयांची ॥ २ ॥ म्यां तो केली शांति पहिलीच यांची । निघे सव्यसाची निमित्ताला ॥३॥ तुकयासी तुसी भेद ना अणुभर । हें माझें उत्तर हृदयीं लिही ॥४॥

द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च
कर्णं तथान्यानपि योधवीरान् ।
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा
युध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

४५२. अरे हे द्रोण भीष्म आणि हा जयद्रथ । कर्ण महारथ आणि शूर ॥ १ ॥ त्यांस म्यां मारिलें तूं मारी साक्षीला । अदृष्टी राज्याला म्हणूनियां ॥२॥ झणी दृष्टि[१९१] होसी तूं या कर्मी पार्था । जयश्री सर्वथा वरी तुज ॥ ३ ॥ निमित्ताकारणें घे तूं धनु शूर । तुकयाचें अंतर ऐसें आहे ॥ ४ ॥

४५३. [१९२] गजपुरीं कुरु वृद्धास संजय । सांगे हर्षमय कृष्णगीता ॥१॥ यात्रामिसें लाभ जोडला आयता । म्हणुनिया चित्ता हर्ष त्याच्या ॥ २ ॥ पारि त्या सुखास अंध नेणें कांहीं । व्यापिला जो मोहीं पुत्रक्लेशें ॥ ३ ॥ तुकयाचें सुख प्रपंचीं जाणेना । वैराग्य येईना म्हणूनियां ॥ ४ ॥

---

१९१ ' दृष्टि ' ऐवजीं ' कष्टी '—पाठ प्र. १ व ३.

१९२. हा अभंग प्रत १ व ३ मध्यें आहे.

संजय उवाच ।

एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य
कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।
नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं
सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥

४५४. कळलें अंतर भवरोगें पीडे[१९३] । थुंकून तो तोंडें[१९३] अन्ना टाकी ॥१॥ दैवाचे इतर सेविती पंक्तीशी । तैसा तो रायाशी बोलतसे ॥ २ ॥ ऐकून केशवा वाक्याशी अर्जुन । वपू निज मनें घेई जे कां ॥ ३ ॥ कृतांजली किरीटी बोलतो भयभीत । वंदून अनंत पुन: पुन्हां ॥ ४ ॥ गद्गद या गिरा तेजें जो अर्दिला । जीव स्वरूपाला तुका न ये ॥ ५ ॥

अर्जुन उवाच ।

स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या
जगत् प्रहृष्यत्यनुरज्यते च ।
रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति
सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः ॥ ३६ ॥

४५५. ऐसे हृषीकेश तुझिया स्थितीतें । पाहून हर्षतें त्रिभुवन ॥ १ ॥ अनुरागयुक्त झालें हें पावन । पापीयासी स्नान गंगे जैसें ॥ २ ॥ येथें जे राक्षस दिशांत लंघिती । भयास पाळिती म्हणूनियां ॥ ३ ॥ वंदिती सद्भावें सिद्ध लोक तुज । तुका म्हणे मौज संतांची हे ॥ ४ ॥

कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्
गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।
अनन्त देवेश जगन्निवास
त्वमक्षरं सदसत् तत्परं यत् ॥ ३७ ॥

४५६. न वंदिती कां हे समर्था तुजला । जो थोर विधीला आदि कर्ता

१९३. ' भवरोगें पीडे ' ऐवजीं ' पिडे भवरोगें ' व ' तोंडे ' ऐवजीं ' वेगें ' —पाठ प्र. १.

॥ १ ॥ अनंत जो विश्वपटामाजीं तंतू । तूं सत् असत् अक्षर तूं ॥ २ ॥ शुद्ध ब्रह्म खरें उत्तरें वेदाच्या[१९४] । हृदयीं तुकयाच्या तूंच देवा ॥ ३ ॥

त्वमादिदेवः पुरुषः पुराणः
त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
वेत्तासि वेद्यं च परं च धाम
त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥ ३८ ॥

४५७. विश्वादि तूं सर्व तूं पर पुराण । तूं भूमी या पूर्ण जीवालागीं ॥ १ ॥ विश्वघट होय त्या परता निधान । ज्ञाताही तूं ज्ञानमय यज्ञ ॥२॥ त्वांच विश्वरूपें व्यापिलें सकळां । अनंतरूपाला विश्वंभरा ॥ ३ ॥ आज तुकारूपें मज उमजसी । विश्रांति मनासी आली खरी ॥ ४ ॥

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः
प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः
पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

४५८. तूंच वायू यम वन्हिही चंद्रमा । देवाचाही आत्मा तूंच देवा ॥ १ ॥ पितामहाचा तूं पिता हें कळलें । तुज सहस्र वेळे नमो नमो ॥ २ ॥ नमो नमो सर्व काळ तुज मागुती । ऐकिजे हे मती तुकयाची ॥ ३ ॥

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते
नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं
सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

४५९. देवा पाठीं पोटीं आहे हें कळेना । आहेस नमना करूं तैसें ॥१॥ मागें पुढें वंदूं तव पदालागीं । सर्व तूं यालागीं सर्वां वंदूं ॥ २ ॥ अनंत सामर्थ्य पराक्रमी तूंच । पटीं विश्वयाच्या तंतू तूं गा ॥ ३ ॥ केलें

१९४. ' वेदाच्या ' ऐवजीं ' देवाच्या '—पाठ प्र. १ व ३.

नमन तरी निश्चळ रहावे ना । नेणों करील वंदना माजी कवळू ॥ ४ ॥ मागें जो हरला कीं कौरवांनीं केलें । हें दुसरें आलें तुका म्हणे ॥ ५ ॥

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं
हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं
मया प्रमादात् प्रणयेन वापि ॥ ४१ ॥

४६०. जें बोललों मी सलगी करून । रे यादवा म्हणून कृष्णा सख्या ॥ १ ॥ न जाणतां महिमा देवा पुरुषोत्तमा । चुकलों या कर्मा प्रीतीच्चीया ॥ २ ॥ शय्यासनीं पंक्तीं चालतां मार्गांत । केला जो हास्यार्थ क्षमा असो ॥३॥ अपमान कांहीं न कळतां झाला । तुकया जीवाला शोध न घे ॥४॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि
विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत् समक्षं
तत् क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

४६१. मागें पुढेंही जें मज देवराया । क्षमा अप्रमेया करीं सख्या ॥१॥ अच्युता अद्वया नेणोनियां गर्वें । रुसो फुगो आघवे[१९५] क्षमा असो ॥२॥ चांग तेंच मागो ऊराऊरी देवा । सारथी स्वभावा तुज केलें ॥ ३ ॥ कौरवांचे सभे धाडिले शिष्टाई । पाहातां अन्यायी कोटि तुका ॥ ४ ॥

पितासि लोकस्य चराचरस्य
त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो
लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभावः ॥ ४३ ॥

४६२. पिता होशी तूं जगाचा । चराचर जड जीवांचा ॥ १ ॥ तूं पूज्य सर्वा गुरु । सर्वीं सर्वात्मा साचारू ॥ २ ॥ तुल्य नाहीं कोणी तुज । देवा थोर दिसे मज ॥ ३ ॥ अतुळ प्रभाव त्रिलोका । कोठें येवो नेणें तुका ॥ ४ ॥

१९५. ' आघवें ' ऐवजीं ' अवघे '—पाठ प्र. १.

तस्मात् प्रणम्य प्रणिधाय कायं
प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः
प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

४६३. म्हणून वंदीं देवराया । पसरून स्वात्म काया ॥ १ ॥ देवदेवा व्हो प्रसन्न । आम्ही तरी श्रीसंपन्न ॥ २ ॥ पिता सुता क्षमा करी । जेवीं सखा सख्यांतरी ॥३॥ प्रिय प्रियाला सद्भावें । तुका क्षमा मागे जीवें ॥४॥

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा
भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

४६४. हृष्ट झालों हें अपूर्व । रूप देखूनियां सर्व ॥ १ ॥ परंतु या चित्तामाजीं । भयें कापतसे आजी ॥ २ ॥ आतां पूर्वीचा होतास । देह दाखवीं आम्हांस ॥ ३ ॥ जरी प्रसन्न व्यापका । तरी संबोखावा* तुका ॥ ४ ॥

किरीटिनं गदिनं चक्रहस्तम्
इच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन
सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

४६५. करीं गदा सुदर्शन । किरीट मस्तकीं पावन ॥ १ ॥ कृष्णनाथा अनाथाच्या । भेटी याचितों तुमच्या ॥ २ ॥ सोपी चतुर्भूज मूर्ती । जे कंबटाळे आम्हां हातीं ॥ ३ ॥ ती दाखवूनी हे झांका । जेथें उमज ने घे तुका ॥ ४ ॥

---

* शांतवावा; सावध करावा.

श्रीभगवानुवाच ।

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं
रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं
यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

४६६. बोले देव तो साधूंचा । महा मेघ गंभीर वाचा ॥ १ ॥ पार्था कृपेनें दाविलें । विश्वरूप म्यां आपुलें ॥२॥ आत्मयोगें तेजोमय[१९६] । अनंत कीं विश्वालय ॥३॥ नेणें कोणी तुजाविण । तुका म्हणे माझी खुण ॥ ४ ॥

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैः
न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।
एवंरूपः शक्य अहं नृलोके
द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

४६७. यागीं वेदाध्ययनस्थळीं । दानीं सत्कर्ममंडळीं ॥१॥ उग्र तपांलाही पार्था । जगीं शक्य न सर्वथा ॥ २ ॥ पाहायास रे आणिकां । मी इतरां कुरुनायका ॥ ३ ॥ कांहीं नातुडे लोकांही । अरे देखे तुका देहीं ॥ ४ ॥

मा ते व्यथा मा च विमूढभावो
दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं
तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

४६८. या व्यथेनें मूढ मन । न हो होई सावधान ॥ १ ॥ माझें रूप भयंकर । देखून भ्यालें रे अंतर ॥ २ ॥ आतां एकदां मागुती । निर्भय होई वीरपती ॥३॥ रूप तेंच पाहे पुन्हां । जेथें तुका आला ध्याना ॥४॥

१९६. ' आत्मयोगें तेजोमय ' ऐवजीं ' आत्मरूप तेजोदय '—पाठ प्र. ४.

संजय उवाच ।

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा
स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं
भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

४६९. संजय बोले कुरुवर्या । वासुदेव कृतकार्या ॥ १ ॥ ऐसें बोलले अर्जुना । कृष्णरूप झाला पुन्हां ॥२॥ ग्राहकाच्याच आवडी । व्यापारीक उकली घडी ॥ ३ ॥ न घे जाणून ठेविली । तुका म्हणे शांति दिली ॥४॥

अर्जुन उवाच ।

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

४७०. पार्थ आनंदें निवाला । देव देखतां सानुला ॥ १ ॥ स्वप्नापरी आदितेज । क्षणें मावळे सहज ॥ २ ॥ निशीं उदयांत तारा । तेवीं देखे सैन्यभारा ॥ ३ ॥ आपण रथाखालीं उभा । वरी देखे पद्मनाभा ॥ ४ ॥ शंख चक्रादि हत्यारें । चतुर्पाणि रूप गोजरें ॥ ५ ॥ ठाण लक्षणें नेटका । दिसे सौम्य टविटका ॥६॥ हर्षे बोले धनंजय । तुझे देखियल्या पाय ॥७॥ आतां बुद्धि स्मृति आली । वृत्ति राहिली चांगली ॥ ८ ॥ नको पालट घेऊं पुन्हां । तुका म्हणे जनार्दना ॥ ९ ॥

श्रीभगवानुवाच ।

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकाङ्क्षिणः ॥ ५२ ॥

४७१. भक्तनायकाचे शब्द । ऐकूनि देव झाला स्तब्ध ॥ १ ॥ चुक आपणांकडून झाली । यासी[१९७] जाणीव कळों आली [१९७] ॥ २ ॥ हातीं आल्या मेरू राई [१९८] । सत्य बोलतो अन्वयीं ॥३॥ मग म्हणे गावंढेया ।

१९७. 'यासी' ऐवजीं 'ज्यासी' व 'आली' ऐवजीं 'दिली'—पाठ प्र. ४, ७ व ८.

१९८. 'मेरू राई' ऐवजीं 'मेंढराई'—पाठ प्र. ४.

काय हांसो धनंजया ॥ ४ ॥ अरे अभ्रें वृथा गगन । खरें सांगतों निवडून ॥५॥ जयापासून अपार । होती जाती दश अवतार ॥६॥ कष्ट भोगिती सुरगण । रूप पहायास संपूर्ण ॥७॥ जें कां माझें देखिलें त्वां । नवस करी शिव जीवा ॥ ८ ॥ तुका वदला किंचित । झालें त्रिजगतीं विख्यात ॥ ९ ॥

नाहं वेदन तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधा द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

४७२. दानी तपी वेदीं नामी । पुजादिकांचे संभ्रमीं ॥ १ ॥ शक्य पाहाया ये रीतीं । तुवां देखिली जे मूर्ती ॥ २ ॥ बहु निदानींचा ठेवा । तुवां पाहिला पार्थिवा ॥ ३ ॥ सनकादिक जयासाठीं । तुका म्हणे बहु कष्टी ॥ ४ ॥

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

४७३. तो मी आत्मैक्य भक्तीनें । शक्य पार्था ये रीतीनें ॥ १ ॥ जाणायास पाहायास । अंतीं गती प्रवेशास ॥ २ ॥ जरी आवडी सगुणीं । चित्त ठेवी रे निर्गुणीं ॥ ३ ॥ तेंच सार्थक तत्त्वतां । तुका झालिया जाणता ॥ ४ ॥

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।
निवरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥ ५५ ॥

४७४. झाला निःसंग मद्भक्त । मी थोर हा भरी हेत ॥ १ ॥ करी मत्क्रिया चोखटी । सर्वाभूतीं द्वेष तुटी ॥ २ ॥ तो गा पांडवा पावतो । माझा मज सामावतो ॥ ३ ॥ घंटेपासूनियां नाद । तुका म्हणे मी संवाद ॥ ४ ॥

४७५. [१८०] संजय सांगे धृतराष्ट्रा । विश्वरूपीं झाली यात्रा ॥ १ ॥ एकादशाचे मंडळीं । पार्थ देवता गोंधळी ॥२॥ जन्मेजया सांगे कथा । पै तो वैशंपायन गाथा ॥ ३ ॥ केला समाप्त अध्यावो । तुका उदोकार भावो ॥ ४ ॥

४७६. [१८०] त्याच्या पदाच्या पद्धति । चाले कवि खिद्ध मती ॥ १ ॥ तरीच अधिका उणिवां । देवो रिझला जाणावा ॥२॥ श्रीगुरु पांडूरंगापायीं गुरु दास ठेवी डोई ॥ ३ ॥ येथें तुकयासंगतीं । गीता सांपडली हातीं ॥४॥ तेणें आशिर्वाद दिला । ना तो कर्णीं मंत्र आला ॥ ५ ॥ गेला संशय उडून । तुका तुष्टला भगवान ॥ ६ ॥ विश्वरूप पार्था दावी । मज निद्रिस्ताचे ववी* ॥ ७ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे विश्वरूपदर्शनं नामैकादशोऽध्यायः ॥ ११ ॥**

इति श्री गीता अभंगाकृत एकादशोध्यायः संपूर्णमस्तु ॥
श्री पांडुरंगार्पणमस्तु ॥[४६]

---

१८०. हे अभंग प्रत १, ३, ७ व ८ मध्यें आहेत.
* ववी = घरीं; परकायेंत, ओवंड्यात.

॥ अथ द्वादशोऽध्यायः ॥

## — भक्तियोग —

श्रीभगवद्गीता अभंगात्मक—द्वादशोऽध्यायः[४६]

**अर्जुन उवाच ।**

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

४७७. जाणून श्रीपतीचें मन । द्वादश प्रसंगीं अर्जुन ॥ १ ॥ जीवीं विचारी कीं हित । हेंच असल्या संतत ॥ २ ॥ मग आपण वंचूं नये । देवा दिसे अंतराये ॥ ३ ॥ तरी विश्वरूपाचिया । प्रशंसी तो वाक्यमया ॥ ४ ॥ तरी अव्यक्त चांगलें । किंवा कृष्णरूप भलें ॥ ५ ॥ बरें एक वेळां पुसों । मग तैशा स्थिती वसों ॥ ६ ॥ म्हणून बोले हर्षमय । अहो यादववंशराय ॥ ७ ॥ असे सत्त्वीं[१९९] सदा युक्त । भक्त तुज जे भजत ॥ ८ ॥ कोणी निर्गुणमात्रातें । त्यांत उत्तम कोणतें ॥ ९ ॥ सांगे महाराज भक्तांच्या । प्रीति ठेवा तुकयाच्या ॥ १० ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

४७८. बोले भगवान दासा । निज मानसा मद्रूपीं ॥ १ ॥ योजुनियां स्वरूपीं मन । हें साधन नित्याचें ॥ २ ॥ आत्मभक्तीनें भजती । माझ्या[२००] चित्तीं ते[२००] थोर ॥ ३ ॥ मज संमत पांडवा । तुका बरवा वाटतो ॥ ४ ॥

---

१९९. 'सत्त्वीं' ऐवजीं ' तत्त्वीं '—पाठ प्र. १ व २.

२००. ' माझ्या ' ऐवजीं 'जया'—पाठ प्र. ४, ६, ७ व ८; व 'ते' ऐवजीं ' तो '—पाठ प्र. १.

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥

४७९. ना त्या बोलवे क्षरे ना । उपासना जरी त्याची ॥ १ ॥ अव्यक्तीं लागे चित्त । सर्व अलिप्त अचिंत्य ॥ २ ॥ जें[२०१] अढळ शाश्वत । श्रुतिसंमत जाणवी ॥ ३ ॥ तुका तेथीचा रहिवासी । गुरु दासीं पावला ॥ ४ ॥

संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

४८०. इंद्रियांतें आटोपूनी । स्वात्मज्ञानीं[२०२] चोख जो ॥ १ ॥ समबुद्धीनें सर्वत्र । नेणें क्षुद्र उत्तम ॥ २ ॥ जे हो मातेंच पावती । क्रियाशक्तिसहित ॥ ३ ॥ तुका जैसा सर्वां भूतीं । रत हितीं निर्मळ ॥ ४ ॥

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

४८१. कष्टी होती ते अधिक । तें मी ऐक सांगतों ॥ १ ॥ चित्त योजतां अव्यक्तीं । देहासक्ति मूकला ॥ २ ॥ देहीं गति ते अव्यक्त । मना बूजत अर्पूनी[२०३] ॥ ३ ॥ तुका पावे[२०४] नाना दुःखें । यास्तव तीखें* पावती ॥ ४ ॥

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥

४८२. मातें मानुनियां थोर । सोडी घोर अन्यत्र ॥ १ ॥ समर्पिती सर्व कर्में । विधीवर्में सूचक ॥ २ ॥ उपासती ध्याती मातें । तुकया चित्तें समतोल ॥ ३ ॥

---

२०१. ' जें ' ऐवजीं ' न जें '--पाठ प्र. १ व ३.

२०२. ' स्वात्मज्ञानीं ' ऐवजीं ' स्वात्मध्यानीं '—पाठ प्र. १ व २.

२०३. ' बूजत अर्पूनी ' ऐवजीं ' युक्त निबुजे ' —पाठ प्र. १.

२०४. ' तुका पावे ' ऐवजीं ' तुकयाविण '—पाठ प्र. १.

* तीखें = अति तिखट बाण; वैर.

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात् पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

४८३. मजमध्यें ऐसे चित्तें । झेंपावते जे झाले ॥ १ ॥ भवसागरीं त्यांचा मी । अंतर्यामीं तारक ॥ २ ॥ वेळ न लावितां पार्था । ऊर्ध्वपंथा पाठवी ॥ ३ ॥ तारक हो तो तुकया सम । प्राचिन श्रम हारूनी ॥ ४ ॥

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

४८४. मन मद्रुपीं यालागीं । असलागीं असावें ॥ १ ॥ मला बुद्धींत[२०५] तूं घाली । हाताखालीं अक्षर ॥ २ ॥ मग तूं मजमाजी चरें । चराचरें विरहीत ॥ ३ ॥ प्रवेशसी ना संशय । गंवसे सोय तुकयाची ॥ ४ ॥

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

४८५. स्थिर करूं चित्त आतां । अभ्यासितां येई ना ॥ १ ॥ मदंतरीं ना प्रवेशे । तदुद्देशें सांगतों ॥ २ ॥ अभ्यास सत्प्राप्तीचा[२०६] । सव्यसाची करी इच्छा ॥ ३ ॥ धनंजया सहजें मज[२०७] । लागे लाग तुकयाचा ॥ ४ ॥

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

४८६. न करवे अभ्यासही । ऐसी कांहीं अडचण ॥ १ ॥ मदर्पण करी कर्मे । हो कां वर्मे भलतेसी ॥ २ ॥ शानीं मत्कर्मे करितां । प्राक् संचिता जाळीत ॥ ३ ॥ तूं या स्थितीस पावसी । जे तुकयासी सुलभ गती[२०८] ॥ ४ ॥

---

२०५. ‘ बुद्धींत ’ ऐवजीं ‘ बुद्धी न ’—पाठ प्र. १.
२०६. ‘ सत्प्राप्तीचा ’ ऐवजीं ‘ मत्प्राप्तीचा ’—पाठ १ व ७.
२०७. ‘ मज ’ ऐवजीं ‘ मग ’—पाठ प्र. १.
२०८. ‘ सुलभगती ’ ऐवजीं ‘ सुलभ ’—पाठ प्र. १ व ४.

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

४८७. देहीं नव्हे मन तरी । स्वाधिन करी पुरतें ॥ १ ॥ मदाश्रित सख्या हो रे । मग मोहरे गत लाभ ॥ २ ॥ त्यागीं फळें सर्व कर्मीं । नित्य धर्मीं वासना ॥ ३ ॥ फळ शब्दें सुख स्पृहा । करी तुका हा आपुला ॥ ४ ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥

४८८. अभ्यासाहूनि विश्वात्मा । सच्चिदात्मा ओळखे ॥ १ ॥ तें गा ज्ञान ध्यान त्याला । विशेषाला सृजतें ॥ २ ॥ श्रेय कर्म सुख त्याग । पावे लाग आमुचा ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवन्मुक्त । हरिभक्त चांगलें ॥ ४ ॥

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

४८९. सूत्रचालक परेश । जाणे सर्वात्मा[२०९] विशेष । याच लागीं नुठीं द्वेष । पैं गा तोच निर्वैर ॥ १ ॥ जीवन रंगाचे सारिखें । होय तेवीं जो हारिखें । करुणा मैत्रीं तेवीं देखे । भूतभावीं दयेला ॥ २ ॥ मीपण गेलें गा जयाचें । तेथें माझें ऐसें वाचे । ना शिवे तो दुःखाचे । खत कधीं उकलीना ॥ ३ ॥ तुका वंदी सदा ज्याला । क्षमा धरे सत्य[२१०] त्याला । कष्टीं देखे जो सुखाला । अनुपम[२११] साधु तो ॥ ४ ॥

---

२०९. ‘ सर्वात्मा ’ ऐवजीं ‘ सर्वत्वा ’—पाठ प्र. ४, ७ व ८.

२१०. ‘ धरे सत्य ’ ऐवजीं ‘ धरे:सम ’—पाठ प्र. १ व २.

२११. ‘ अनुपम ’ ऐवजीं ‘ मनुपम्य ’—पाठ प्र. १.

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

४९०. धालें मन तोच तृप्त । योगमार्गात चालत । सर्वदाही अखंडित । जनां हित निवेदी ॥ १ ॥ नायके ना[२१२] तो क्षोभे ना । उपरोधें दुखवी ना । स्थिर चित्ताची वासना । दृढ व्रत या नांव ॥ २ ॥ मन बुद्धीस कालवी । दोघां बांधून पालवी । जो कां आला आमुचे गांवीं । विळा पाऊड वाहाया[२१३] ॥ ३ ॥ तुका विनवितो तया । माझा दास म्हणोनियां । प्रिय त्यागें त्या सुप्रिया । मी गा प्रेमें आलिंगीं ॥ ४ ॥

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

४९१. बुबुळें भ्रमतांच क्षाळी । वा ते अंदोळू कमळीं । न क्षोभवी भूतावळी । ऐसें ज्याचें वागणें ॥ १ ॥ तोही लोकांपासूनियां । त्रास ने घे कुरुराया[२१४] । जीव जेवीं पाळी काया । ऐसा सदा संरक्षी ॥ २ ॥ हर्ष क्रोध दोन्ही नाहीं । त्रास न घे तत्पदींही । सुलक्षण ऐसा मही-। वरी माझा आवडता ॥ ३ ॥ तुका वंदी त्याचें पद । गुणी* वर्णी ज्या गोविंद । जनांमाजी त्या आनंद । विजनींहि त्याहून ॥ ४ ॥

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

४९२. लोकपूजनीं ना गुंते । शुद्ध वासनेच्या हितें । शाहाणा वागवी लोकांतें[२१५] । हे दक्षता चोखट ॥ १ ॥ गृह दारा सुत सुता । उदासीन

---

२१२. ' नायकेना ' ऐवजीं ' नायकता '—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

२१३. 'विळा पाऊड वाहाया' ऐवजीं 'विडा पाऊड तो वाहा'—पाठ प्र.१
वाहाया = चालवण्यास; वापरण्यास.

२१४. ' कुरुराया ' ऐवजीं ' गुरुराया '—पाठ प्र. ४ व ६.

* ' गुणी ' ऐवजीं ' उगें '—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

२१५. ' वागवी लोकांतें ' ऐवजीं ' वागतो लोकांत '—पाठ प्र. ४ व ६.

भाग्य येतां । व्यथा न मानी जो चित्ता । भागवतीं कदर्यू ॥ २ ॥ करी न काम फळ पावो । ऐसा न धरीच लाहो । आरंभास सरी पावो । जान्हवीचा कापडी ॥ ३ ॥ असा मद्भक्त तो प्रीय । नाहीं याविषयीं संशय । तुका निजानंदें गाय । तेथें कान मी देतों ॥ ४ ॥

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् यः स मे प्रियः ॥ १७ ॥

४९३. हर्ष द्वेषाविरहीत । वांच्छा शोक न धरीत । टाकी पाउलें शुभांत । अशुभांत त्या तुल्य ॥ १ ॥ आणि मद्भक्त मजला । प्रिय ऐशा गुणीं झाला । एकुलता एक आवडला । वृद्ध बंधें[216] बाळक ॥२॥ कामनास्तव भक्ति वा रे । कोठ्यावधि करणारे । तुका निष्काम सखा रे । जन्मोजन्मीं दुर्लभ ॥ ३ ॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥ १८ ॥

४९४. गाई चांग व्याघ्र खोटा । नदी नेणें या बोभाटा । शत्रुमित्रीं जैसा होंटा । तळीं शब्द ना लवे ॥ १ ॥ बाळ पीडिलें पूजिलें । कल्पनेनें तैसें झालें । शीत उष्ण उबगलें । स्थळ झाड न सोडी ॥ २ ॥ तेवीं सुखदुःखांतरीं । भजे समान श्रीहरि । समयीं धीर पर-उपकारी । तुका जैसा निःसंग ॥ ३ ॥

तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

४९५. मौनि अर्वाचीक नेणें । स्तुति निंदा केली कोणें । तुष्ट लाभें तोष घेणें । जैसा तैसा संतत ॥ १ ॥ निराश्रय भगवंतीं । ज्ञानें केली शुद्ध मती । माझी भक्ती आचरती । मार्ग इतरां कळाया ॥ २ ॥ तो मत्प्रिय कीति वाणूं । लटिके नव्हे तुझी आणू । तुका म्हणे थोरपणूं । देव सांडी आपुलें ॥ ३ ॥

२१६. 'वृद्ध बांधे' ऐवजीं 'वृद्ध वंदे'—पाठ प्र. १ व ३.

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ।। २० ।।

४९६. बोलल्याच परी जें हें । धर्मामृत जाणून हें । उपासती सर्वदा हे । आत्मभक्ती चोखटी ॥ १ ॥ श्रद्धाळू माझ्या मार्गी । मीच थोर ऐशा-लार्गी । भक्ति वांटी या विभार्गी । भक्त जें कां मम प्रिय ॥ २ ॥ तेही प्रीति कीति सांगूं । आतां आमुचा जीवलगू । त्याची कीर्ति वर्णी चांगू । यासही मी बोलतों ॥ ३ ॥ नाहीं तरी गीताशास्त्र । पुढें जयाचें कत्र[२१७] । अथवा ऐकतील श्रोत्र । कायावाचामनोज्ञें ॥ ४ ॥ तें मी प्रीतीच्या पडिभरें । मुकुटीं वाहीजे आदरें । जैसा तुका स्वाधिकारें । तैसा मातें तो प्रिय ॥५॥

४९७. [१८०]ऐसें बोललें अनंतें । सांगे संजय नृपातें । तैसा जनमेजयातें । वैशंपायन बोधीत ॥१ ॥ गीता भीष्मपर्वी आदि । कीं हे मुक्तीची गवादी । किंवा लडेवाळा खांदीं । वाहे माता द्विलोकीं ॥ २ ॥ येथें अर्जुनाचा प्रश्न । सगुण निर्गुण उपासन । त्यास बोलला भगवान । भक्तियोग निर्मळ ॥ ३ ॥ आतां त्रयोदश पुढें । देव वर्णील सदृढें । जेथें पार्थ प्रश्न गाढे । जडमूढा तारक ॥ ४ ॥ तुकया सद्गुरु संसर्गे । द्वादश अध्याय मार्गे । आला समाप्तीस अंगें । ऐकलाच ऐकावा ॥ ५ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

इति श्री भगवद्गीता अभंगात्मक तुकयाकृत द्वादशोऽध्यायः[४६]

---

२१७. 'कत्र' ऐवजीं ' वस्त्र '—पाठ प्र. १, व 'वक्र'—पाठ प्र. ७ व ८.

॥ अथ त्रयोदशोऽध्यायः ॥

## — क्षेत्रक्षेत्रज्ञयोग —

श्रीभगवद्गीता अभंगात्मक त्रयोदशः[४६]

४९८. [२१८]पूर्व प्रसंगीं ऐकिलें। भक्ति साकल्य वर्णिलें। तेणें अशंकें घेतले। म्हणून प्रश्न हे सद्दा ॥ १ ॥ देहामाजील लिगाडें। निवारुनियां निवाडे। उत्रड शुद्धता सांपडे। ऐसे कांहीं कल्पित ॥ २ ॥ अहा तो दांडगा पार्थिव। दांडाईत त्याची ठेव। यास्तव पुसे वासुदेव। वश झाला हें जाणून ॥ ३ ॥ तेथें तुकयाचें संगति। कांहीं प्रसाद पंगती। लाभे ऐसी केली युक्ति। नका घेऊं कांटाळा ॥ ४ ॥

[२१८]अर्जुन उवाच।

प्रकृतिं पुरुषं चैव क्षेत्रक्षेत्रज्ञमेव च।
एतद्वेदितुमिच्छामि ज्ञानं ज्ञेयं च केशव ॥ ० ॥

४९९. [२१८]देव शीरोरत्ना योगिया चिद्रत्ना। ऐकावें जी प्रश्ना दुर्बळाच्या ॥ १ ॥ यया देहामाजीं ठाणेदार राजी। बैसले ते आजी चाळविती ॥ २ ॥ ऐसें कांहीं भासे तरी बोला कैसें। प्रकृति विलासे आणि पुरुष ॥ ३ ॥ क्षेत्र क्षेत्रज्ञातें कळों हें इच्छिते। ज्ञानही ज्ञेयातें तुका म्हणे ॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच।

इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते।
एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥

५००. षड्गुणालंकृत भगवान बोलत। लावी बापा चित्त सांगतों गा ॥ १ ॥ शब्दांच्या आशंका आल्या भेऊं नका। पूतना सखिखा

---

२१८. हा भाग प्र. १, ३ व ७ मध्यें आहे.

जीविली[२१९] म्यां ॥ २ ॥ देह हेंच क्षेत्र म्हणून पवित्र। म्हणिजे तें विचित्र कुंतीपुत्रा ॥ ३ ॥ यास जो जाणेल[२२०] क्षेत्रज्ञ होईल। तद्वेत्त्याचा बोल ऐसा तुकीं ॥ ४ ॥

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

५०१. क्षेत्रज्ञ सर्वांचें जो तो निश्चयाचें। मीच ऐसा वाचें सांगतों गा ॥ १ ॥ भारता तूं जाण न धरीं अनुमान। दोहींत जें ज्ञान ज्याचें असे ॥२॥ तें ज्ञान माझेंची गोष्टी संमताची। तुका म्हणे तेची बोलेल कीं ॥३॥

तत् क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत्।
स च यो यत्प्रभावश्च तत् समासेन मे शृणु ॥ ३ ॥

५०२. तें क्षेत्र जें जैसें जेणें कल्पिलेंसें। विकारी जें तैसें जयास्तव ॥१॥ क्षेत्रज्ञ तो जाण प्रकारेंच खूण। संक्षेप लक्षण सांगूं ऐका ॥ २ ॥ तुका म्हणे हित सांगे भगवंत। मायीक साद्यंत तोडावया ॥ ३ ॥

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक्।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥

५०३. ऋषीश्वरीं बहुविध स्वानुभवु। वेदिक समुहु वर्णिलेलें ॥ १ ॥ नाना युक्ती त्यांच्या भाषा गीर्वाणींच्या। सिद्धांत गर्भीच्या ठेवण्या ज्या ॥ २ ॥ वाक्यांचे प्रबंध ब्रह्मसूत्र बोध। करूनि विविध आपादिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी प्राकृत शिराणी। झाली हे कहाणी नका म्हणूं ॥ ४ ॥

महाभूतान्यहंकारो बुद्धिरव्यक्तमेव च।
इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥

५०४. महाभूतें पांच अहंकार साच। प्राण पां ऐसाच बुद्धिभेद ॥१॥ अव्यक्त आठवें हें तेकेंच ध्यावें। इंद्रिय मेळावें द्विपंचक[२२१] ॥ २ ॥ मन

२१९. ‘ जीविली ’ ऐवजीं ‘ जिर्विली ’—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

२२०. ‘ जाणेल ’ ऐवजीं ‘ म्हणेल ’—पाठ प्र. ४ व ६.

२२१. ‘ मेळावे द्विपंचक ’ ऐवजीं ‘ मिळावें विपंचक’—पाठ प्र. ४ व ६.

त्या आगळें शब्द स्पर्श कळे । पंचक प्रबळें विषयीक ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसे चोवीस या मिसें । मीच जीव भासे वाचाद्वारें ॥ ४ ॥

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत् क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

५०५. द्विद्वादश ऐसी मिळणी सिद्धांतासी[222] । क्षेत्र इच्छा तैसी सुखासुखें ॥ १ ॥ द्वेष प्रतीति हे वृत्तीची सत्य हे । धारणा जाणा हे तद्विकारू ॥ २ ॥ तुका म्हणे ऐसें खटलें सांचलेंसें । तेथें चाले कैसें शाहाणीव ॥ ३ ॥

अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

५०६. श्लाघेचा आधार दंभही साचार । त्याग शांतिसार अवक्रता ॥ १ ॥ भक्ति श्रीगुरुची स्वामीण गुणाची । कीं ज्ञानमार्गीची दिवटी जी ॥ २ ॥ शौच स्थिरत्व गा चित्त निग्रह गा । आणि वितरागा विषयांच्या ॥ ३ ॥ वैराग्य असावें निरहंकारभावें । तरी सुख भोगावें तुकयाचें ॥ ४ ॥

इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

५०७. जन्म हा चोखटा अद्वैतीं वसोटा* । झाला बारा वाटा उघळी जो ॥ १ ॥ मळमुत्रीं शीणला योनिद्वारें आला । पुढें गंधी त्याला योनिची गा ॥ २ ॥ लांचावला हाटीं सोडीना पिनकूटी । मागें पुढें दाटी तीची करी ॥ ३ ॥ ऐसें जन्म जाणें तेणें न्यायें मरणें । जरा रोग घेणें नित्य दुःख ॥ ४ ॥ हे दोष पाहातो तोच ज्ञानी होतो । मुक्त लीलें जातो तुक्या ऐसा ॥ ५ ॥

---

२२२. ‘ सिद्धांतासी ’ ऐवजीं ‘ संघातासी ’—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.
* वसोटा = आश्रय, आश्रयस्थान.

**असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारागृहादिषु ।**
**नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥**

५०८. आसक्त झालिया लिंपे न कुरुराया । पुत्र किंवा जाया पडे दृष्टी ॥ १ ॥ चांगलें सदन सामुग्री साधन । इष्टत्वादि करून अनिष्टादि ॥ २ ॥ इष्ट झाल्यावरी फुगारा न धरी । समानचि बरी वृत्ति राखे ॥ ३ ॥ सखया सुमित्रा पार्था क्षत्रपुत्रा । सर्वदा या पत्रा वाची तुका ॥ ४ ॥

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

५०९. अद्वैत योगाचें भजन जयाचें । माझिया रूपाचें लागे वेड ॥१॥ भक्तीची शिराणी परि अव्यभिचारिणी । कांता पुण्यखाणी नाथसेवे ॥२॥ एकांताची प्रीति जनपदीं खंती । कंटाळा ज्या चित्तीं राजसभे ॥ ३ ॥ तुका म्हणे जिणें धन्य झालें पणें । लोहें पालटणें परिसेनी ॥४ ॥

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

५१०. अध्यात्मविचारें बोधा जाणें खरें । परी तें प्रखरे नित्यत्व गा ॥ १ ॥ जडीं अजड हें निवडी संदेहें । ह्याच अर्थ पाहे निज ज्ञानीं ॥ २ ॥ पार्था हीं लक्षणें शुद्ध ज्ञानी होणें । आमुचें राहाणें तया गर्भी ॥ ३ ॥ ह्याच उलटा योग अज्ञान प्रयोग । तुका म्हणे सोंग वायां जाय ॥ ४ ॥

**ज्ञेयं यत्तत् प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**
**अनादिमत् परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥**

५११. आतां तूं म्हणसी ज्ञेय वार्ता कैसी । ते तुझ्या कर्णांसी लावितसे ॥ १ ॥ जया ज्ञानें मोक्ष आतुडे प्रत्यक्ष । न उरे त्या लक्ष चौऱ्याशीं गा ॥ २ ॥ अनादि अनंत शुद्धाशुद्धी देत । जेथें मुरे चित्तचांचल्यता ॥ ३ ॥ न सत् न असत् उचित संवाद । तुका म्हणे भेद निमे जेथें ॥ ४ ॥

सर्वतः पाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।
सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ।। १३ ।।

५१२. ते दोर अहि या देहांचिया ठायां । पाय नेत्र तयां शिरें मुखें ।। १ ।। सर्वत्र तें श्रोत्र[223] युक्तचि पवित्र । व्यापून सर्वत्र असे तेजें ।। २ ।। वैष्णवांच्या राया ऐके शब्द यया । श्रुतिसंमती या मिळे स्मृती ।।३।। आतां याच बोले होईल रूप केलें । द्वय लोकीं भलें मानीं तुका ।। ४ ।।

सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ।। १४ ।।

५१३. इंद्रियें ज्या सत्तें विषयांस घेती । किंवा ओळखती खोटें चांग ।। १ ।। विषय इंद्रियें भासक झालें जें । परि ना विरजे तयामाजीं ।। २ ।। जीविती किंवा रे गुणभोगा ठायीं । दीपवत पाहीं साक्ष सदा ।। ३ ।। जें कां राया ऐसें निर्गुण म्हणावें । तुकयानें जाणावें सर्वाधार ।। ४ ।।

बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ।। १५ ।।

५१४. ब्रह्म[224] अंतरंग सर्व भूतांलागीं । वायु नभ अंगीं व्यापकत्वें[225] ।। १ ।। स्थावर जंगम तेणें न्यायें वागे । शुन्य तरी जागे सर्व काळ ।। २ ।। अतींद्रियपणें आकळे योगींद्रा । दूर जें कां इंद्रा संनिध तें ।। ३ ।। तेथें तो घेणारा निवडीत तुका । जो कां झाला असका निःकामुक[226] ।। ४ ।।

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ।। १६ ।।

५१५. असोनि[227] वेगळें भूतमात्राठायीं । वागे हे नवाई असंभव्य[227] ।। १ ।। ऐसा जैं सेवितो वेगळेचपणें । त्याचें काय कोणें

२२३. 'श्रोत्र' ऐवजीं 'क्षेत्र'—पाठ प्र. १ व ३.
२२४. 'ब्रह्म' ऐवजीं 'बाह्य'—पाठ प्र. १.
२२५. 'व्यापकत्वें' ऐवजीं 'अव्यापकत्वें'—पाठ प्र. ४ व ५.
२२६. 'निःकामुक' ऐवजीं 'निका मुका'—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.
२२७. 'नसोनी' ऐवजीं 'असोनी'—पाठ प्र. १ व ३; व 'असंभव्य' ऐवजीं 'असंभाव'—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

कीजेल गा ॥ २ ॥ गिळितो उगळी सर्व भूतां तोची। परि ना घे त्याची ओळखण ॥ ३ ॥ तोच ज्ञेयरूप तुका म्हणे पाही। धरील ही मही ऐसें बळ ॥ ४ ॥

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥ १७ ॥

५१६. जें कांहीं प्रकाश आत्मा तो तयाचा। कां जे रंग त्याचा पालटेना ॥ १ ॥ अंधाराचें कुंडें काळाखें निज बीज। असोनि निस्तेज ज्योतिर्मय ॥ २ ॥ ज्ञान ज्ञेय ज्ञान लभ्य तें अर्जुना। सर्व हृद्भावना सत्ताधार ॥ ३ ॥ अधिष्ठून उरे जगत्रयात जें। न लागे अंत जें वस्तु तुका ॥ ४ ॥

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

५१७. थोडक्या गोष्टींत तुज आम्ही वदों। पाल्हाळें विवादों ऐसें नसे ॥ १ ॥ क्षेत्र सांगूनियां ज्ञान दर्शविलें। अज्ञाना वार्णिलें थोडक्यांत ॥ २ ॥ ज्ञेय तरी हेंच क्रमानें बोललों। भक्तीनें भूललों तुझ्या सख्या ॥३॥ मत्स्वरूपा पावे तोच तुक्यासम। जो कां जाणे वर्म याचें वीरा ॥ ४ ॥

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥ १९ ॥

५१८. प्रकृति आणिक पुरुष पैं द्वय। ज्या भेदीं अद्वय विकारलें ॥१॥ अनादिच पार्था यांची क्रीडा दिसे। जेथून उमसे भूतलोक ॥ २ ॥ आतां रजसत्वतमादि त्रिगुण। विकार उत्पन्न झाला जो कां ॥ ३ ॥ तुका जीर्णें[२२८] झालें प्रकृतीपासून। प्रकृति असून अक्षयी नसे ॥ ४ ॥

---

२२८. 'जीणे' ऐवजीं 'जाणें'—पाठ प्र. १.

कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

५१९. आगळीक दिसे इचे कर्तेपणीं । पुरुषा करणी चित्र दावी ॥१॥ कार्य कीं कारण हेतु प्रकृतीचा । श्रवणें जीवींचा बोध पाहे ॥२॥ सुखाच्या दुःखाच्या[२२९] भोक्तृत्वीं जो हेतू । तुका म्हणे हो तूं पुरुष स्वयें ॥ ३ ॥

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान् गुणान् ।
कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥

५२०. भोगी प्रकृतीचे गुणांसी पुरुष । तज्जळीं विशेष बिंबूनियां ॥१॥ नानाविध योनी निर्मी तया पार्था । पुरुषास आस्था भोगीवांसु ॥२॥ तुका म्हणे भूली सेविली उत्तमें । संगीं तया भ्रमें जाणता हा ॥ ३ ॥

उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥ २२ ॥

५२१. जो द्रष्टा जाणता भर्ता परमात्मा । परेश चिदात्मा अव्यय जो ॥१॥ अर्जुना गा तोच दुज्या देहीं भोक्ता । पुरुष अनुरक्ता प्रतिबिंबे ॥२॥ मार्ग दुर्लभ तो तेथें कां सांपडे । तुकयास वेडे जेणें केलें ॥ ३ ॥

य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

५२२. जाणेल कीं जो या पुरुषास कोणी । प्रकृतीसी गुणीं विकाराच्या ॥ १ ॥ प्रपंचीं जरी कां वर्तला तो नर । न बाधे शरीर द्वंद्वें त्याचें ॥ २ ॥ जान्हवींत टाकी मेल्या मंगळ जे । ऐशा स्थळीं विरजे आत्मा तुका ॥३॥

ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेण चापरे ॥ २४ ॥

५२३. पाहाती जे योगी निर्विशेष आत्मा । ध्यानीं सच्चिदात्मा लक्षूनियां ॥ १ ॥ कोणी कितेक ते सांख्याचे विचारें । विश्वात्मा हा बरें

२२९. 'सुखाच्या दुःखाच्या' ऐवजीं 'सुख आणि दुःखाच्या'—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

न्याहाळती ॥२॥ योगेंही कर्मेंही ब्रह्म ऐसे किति । आपुलाले मतीं सारिखें गा ॥३॥ तुका म्हणे पंथ ज्यास जो आवडे । तेणें केलें उघडें लोकां तैसें ॥४॥

**अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते ।**
**तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥**

५२४. आत्मा नेणूनही कोणी । ऐकून तैसें वाखाणी ॥ १ ॥ अन्य उपासिती भावें । मृत्युसिंधूस तरावें ॥ २ ॥ तेही तत्पर श्रवणीं । तुका म्हणे ज्ञानखाणी ॥ ३ ॥

**यावत्संजायते किंचित् सत्त्वं स्थावरजङ्गमम् ।**
**क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥**

५२५. उपजे जे जे कां पतीत[230] । सृष्टिकारण संभूत ॥ १ ॥ चराचरीं जेव्हां जेव्हां । न सुटे चित्त अव्हा सव्हा ॥ २ ॥ क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगें । द्वैत विंध्ये संप्रयोगें[231] ॥ ३ ॥ जाण भरतर्षभा तें तूं । तुकया होय पारंगतू ॥ ४ ॥

**समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।**
**विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥**

५२६. सर्वां भूतीं जो समान । नसे उंच नीच स्थान ॥ १ ॥ परमेश्वर आहे तया । लावी मानस अक्षया ॥ २ ॥ अनित्यांतही नित्य । घे तूं प्रतीतीनें सत्य ॥३॥ तोच डोळस जो पाहे । तुका व्यापी अंतर्बाह्यें ॥ ४ ॥

**समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमश्वरम् ।**
**न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥**

५२७. असा आहे पटीं तंतू । देऊनि दृष्टीला एकांतू ॥ १ ॥ सम ईश्वरा सर्वत्र । पाहें अदेखणें नेत्र ॥ २ ॥ आत्मघातीं न ऐक तो । देहासह पावन होतो ॥३॥ त्यावरी जावे मुक्तिपदा । तुकया न लागे आपदा ॥४॥

---

२३०. 'पतित' ऐवजीं 'प्रतीत'—पाठ प्र. १, ७ व ८.

२३१ 'विंध्ये संप्रयोगें' ऐवजीं 'विध्वंस प्रयोगें'— पाठ प्र. १.

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सवशः ।
यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

५२८. सर्व क्रिया प्रकृतीनें । करिजेताति सुमनें ॥ १ ॥ असें पाही जो सर्वदा । ने घे पातक आपदा ॥ २ ॥ पैं गा तेव्हां आत्मयाचें । तो पाहतो अकर्त्याचें ॥ ३ ॥ अकर्तृत्वीं कैचा दोष । जैसा तुकाच निर्दोष ॥ ४ ॥

यदाभूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥ ३० ॥

५२९. तरंगातें देखे जड । परि बुद्धीचा निवाड ॥ १ ॥ एका चैतन्य सागरीं । बाबुड विकल्प लहरी ॥ २ ॥ विस्तार तो त्यापासून । गर्भी व्यापीत सुमन ॥ ३ ॥ तुका म्हणे सांडी मावा । ब्रह्म पावे तो तेधवां ॥ ४ ॥

अनादित्वान्निर्गुणत्वात् परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौन्तय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

५३०. अनादित्वें जो कां असे । निर्गुणत्वें तो विलसे ॥ १ ॥ चिदात्माच म्हणती व्यास । अज पाहातां अविनाश ॥ २ ॥ असूनही सर्व शरीरीं । अकर्ताच निर्विकारी ॥ ३ ॥ नव्हे लिप्त हें नवल । तुकया प्रेमें देतो डोल [२३२] ॥ ४ ॥

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥

५३१. नभ लिंपे ना कौंतेया । वसवून छिन्न ठाया ॥ १ ॥ सर्व स्थळांत सूक्ष्म जें । स्थळदोष ना आपजे ॥ २ ॥ सर्वा देहांत सर्वत्र । तेवीं व्याप्य व्यापी सूत्र ॥ ३ ॥ आत्मा लिप्त तेव्हां होये । तुका पीडे कलिभयें ॥ ४ ॥

---

२३२. ' डोल ' ऐवजीं ' बोल '—पाठ प्र. १ व ५.

**यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।**
**क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥**

५३२. एक जैसा प्रकाशितो । सर्वही जग भास्कर तो ।। १ ।। सर्व क्षेत्रातें क्षेत्रज्ञ । प्रकाशित एक सूज्ञ ।। २ ।। ऐक भरतवंशोत्पन्ना । भारती तूं भक्तराणा ।। ३ ।। भक्तराज तुका कैसा । धनलोभ्या जैसा पैसा ।। ४ ।।

**क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।**
**भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥**

५३३. हा क्षेत्रक्षेत्रज्ञ भेद । तुज दर्शवूं प्रसाद ।। १ ।। ज्ञानदृष्टीनें क्षेत्रही । दाखविलें येथें पाहीं ।। २ ।। भूत संसार[२३३] जडत्व । जाणें सोडो त्या मुक्तत्व ।। ३ ।। तुका विनवितो संतां । ऐका मागील संमता ।। ४ ।।

५३४. [२३४] झाले प्रसंग पैं तेरा । जनार्दन मुख्य गिरा ।। १ ।। येथें ज्ञान आणि जड । क्षेत्रक्षेत्रज्ञ निवाड ।। २ ।। केला पुढें चौदाव्यास । ऐका ठेवून मानस ।। ३ ।। वदे संजय कुरुपती । श्रोत्या तुकया संगती ।। ४ ।। [२३५] शेवटीचे अध्ये सहा । ज्ञानकांड असे पहा ।। ५ ।। खुंटे पाप ताप बोध । पदप्राप्तीचें अमोघ ।। ६ ।। शिष्य शिष्याचा सेवक । प्रार्थी तुकयाचा रंक ।। ७ ।।

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे क्षेत्रक्षेत्रज्ञयोगो नाम त्रयोदशोऽध्यायः ।। १३ ।।**

इति श्री भगवद्गीता अभंगकृत क्षेत्रक्षेत्रज्ञ योगोनाम त्रयोदशोध्यायः[४६]

---

२३३. ' संसार ' ऐवजीं ' संस्कार '—पाठ प्र. १ व ३.

२३४. हा अभंग प्र. २, ४ व ६ त नाहीं.

२३५. येथून पुढील दोन चरण प्रत १, ५, ७ व ८ त नाहींत.

॥ अथ चतुर्दशोऽध्यायः ॥

## — गुणत्रयविभागयोग —

श्रीमद्भगवद्गीता अभंगात्मक चतुर्दशोध्याय[४६]

५३५. [१४०]श्री गुण उकलू ऐकावा। ऐसें जीवा वाटलें॥ १ ॥ ज्याचे बेंचाड* अंतरा। दावी फेरा भ्रांतीचा॥ २ ॥ अर्जुनाचे मनीं। मोक्षदानी उमजे॥ ३ ॥ पुसूं तेंच वांच्छी जो कां। बोले तुका वरदानीं॥ ४ ॥

श्रीभगवानुवाच।

परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्।
यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः॥ १ ॥

५३६. ज्ञानीं उत्तम तें ज्ञान। जें सुभान निर्मळ॥ १ ॥ पुन्हां सांगेन तें थोर। फोडी घोर भवबंध॥ २ ॥ मुनि सर्व जें जाणुनी। अनुदिनीं तत्पर॥ ३ ॥ सिद्धि पावले कैवल्य। जिणें साफल्य तुकयाचें॥ ४ ॥

इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः।
सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च॥ २ ॥

५३७. माझें याच ज्ञानाश्रयें। महदाश्रयें त्यागून॥ १ ॥ पावले सारुप्यसिद्धि[२३६]। दिजे समाधि शुकाची॥ २ ॥ सृष्टि नव्हती होतां ही। स्थिति देहीं विराली॥ ३ ॥ लयीं व्यथा न पावती। त्यागा मूर्ती तुकयाच्या॥ ४ ॥

---

* बेंचाड = गोंधळ.

२३६. 'सारुप्यसिद्धि। दिजे.' ऐवजीं 'सारुप्यादि जें'—पाठ प्र. १.

**मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।**
**संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥**

५३८. महत्तत्त्वात्मक ब्रह्म । तुज सुगम सांगतों ॥ १ ॥ मज हे तूंतें जीवत्वीं । मूळ तत्त्वींचा झाडा ॥ २ ॥ त्यांत ठेवतां चिदंश । उरे अंश मूलभूत ॥ ३ ॥ विश्व होतसे मी तेव्हां । तुका जेव्हां ये जन्मा ॥ ४ ॥

**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः ।**
**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥**

५३९. होती देहोत्पत्ती त्यांच्या । अधिकाराच्या मी बापा ॥ १ ॥ जीववीर्य मी देतों जो । उपजो निपजो रचित बळें[२३७] ॥ २ ॥ ब्रह्म महत्तत्त्व माता । कुंतीसुता ऐक रे ॥ ३ ॥ त्याचा भूतांश शोणितें । करी तुकयातें उत्पन्न ॥ ४ ॥

**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।**
**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥**

५४०. गुणभवें प्रकृतीचें । उत्पत्तीचें कारण ॥ १ ॥ सत्त्व आणि रज तम । पुरुषोत्तम सांग तूं ॥ २ ॥ देहीं बाधती हे जीवा । वन ओलावा पाण्यानें ॥ ३ ॥ गुणातीत अव्यय जो । अंतिम जो[२३८] तुकया ॥ ४ ॥

**तत्र सत्त्वं निर्मलत्वात् प्रकाशकमनामयम् ।**
**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥**

५४१. त्यांत निर्दोष सत्त्व जें । मम तेजें विराजित ॥ १ ॥ प्रकाशक निर्मळत्वें । न कर्तृत्वें अहंकारें ॥ २ ॥ सुखेच्छा विषय ज्ञान । सावधान या विषयीं ॥ ३ ॥ यासी बाधते या संगें । तुका न लगे मग संगीं ॥ ४ ॥

---

२३७. ‘ रचित बळें ’ ऐवजीं ‘ सतत बळें ’ —पाठ प्र. १ व ‘ शत वेळे ’ —पाठ प्र. ३.

२३८. ‘ अंतीम जो ’. ऐवजीं ‘ अंती उमजो ’—पाठ प्र. १.

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनाम् ॥ ७ ॥

५४२. विषयप्रीती तोच रज । धरी काज कामाचें ॥ १ ॥ तृष्णासंग समुद्भवे । मग भवावे मनेच्छा ॥ २ ॥ करवून बांधे याला । कष्टी केला जीवात्मा ॥ ३ ॥ कर्में विषयसाधनें । तुका मनें विटला ॥ ४ ॥

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

५४३. तम आत्मत्वें अज्ञानें । गूढ मनें संकल्पू ॥ १ ॥ करी मोह जड भ्रम । चुके वर्म ज्यासाठीं ॥ २ ॥ निद्रा असावधपणीं । होय हानि आयुष्या ॥ ३ ॥ तम बांधतें आळसें । तुका नसे जयांत ॥ ४ ॥

सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत ॥ ९ ॥

५४४. सत्त्व प्रबळे सुखांत । ये सुखांत रुचि जेवीं ॥ १ ॥ कर्मांत प्रबळे रज । जेवीं खाज कर्मठा ॥ २ ॥ असावधानी या ज्ञानें । तेणें माने ते तमी ॥ ३ ॥ तुका नसे रे जयांत । जरी स्वयात रुसली ॥ ४ ॥

रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

५४५. रजतमांस मोडूनि[२३९] । ये वाढूनि सत्त्वांशू ॥ १ ॥ तम मोडी रज सत्त्वा । स्वकर्तृत्वा दर्शवी ॥ २ ॥ तम सत्त्व नुरे जेव्हां । रज तेव्हां विस्तारे ॥ ३ ॥ एका उंची दोन्ही खांचे । हे तुकयाचें सुशब्दीं ॥ ४ ॥

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन् प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥

५४६. सर्व देहींही इंद्रियीं । रवि जयीं प्रतिबिंबे ॥ १ ॥ आणि जेव्हां ज्ञान तेव्हां । जाणें सत्त्वा वाढाड ॥ २ ॥ तुका म्हणे देव मन । तें आधीन सत्त्वाच्या ॥३॥

२३९. 'मोडूनि' ऐवजीं 'सोडोनि'—पाठ प्र. ४ व ६.

**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा ।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥**

५४७. आरंभ प्रवृत्ति कर्मी । धरी ऊर्मी चित्ताची ॥ १ ॥ अशांतता आणि लोभ । देत क्षोभ त्रिलोकीं ॥ २ ॥ विकार आणि स्पृहा । करिती महा कुचेष्टा ॥ ३ ॥ रज वाढतां विलासें । तुकीं पिसें शिरे ना ॥ ४ ॥

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥ १३ ॥**

५४८. कांहीं वर्ते ना न सूचे । घरभूलीचें कारण ॥ १ ॥ देह आणि असावध । परि क्रोध जागतो ॥ २ ॥ न कळे बरें कीं वाईट । पडे कीट आधर्णी ॥ ३ ॥ तम जेधवां वाढतें । गुण तुका ते निरूपी ॥ ४ ॥

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।**
**तदोत्तमविदां लोकानमलान् प्रतिपद्यते ॥ १४ ॥**

५४९. जन्म भक्तियोगें रंगे । घडती तीर्थें व्रतें सांगे । सत्त्वगुण उत्साह गे । जरी वाढे अर्जुना ॥ १ ॥ त्याच भावें अंतकाळीं । सावधान हृत्कमळीं । स्मरोनियां वनमाळी । देह जरी सोडिला ॥ २ ॥ तरी श्रेष्ठ ज्ञाते लोक । जे कां पावती कौतुक । तेथें पावे हा सात्त्विक । जेवीं बाळक पित्या पैं ॥ ३ ॥ तया प्राप्ती पदा भोगी । कोणी उपद्रविना स्वर्गी । जरी स्वेच्छा भूमीलागीं । आला तरी तुका तो ॥ ४ ॥

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥**

५५०. सोस केला जन्मवरी । रज पोसला शरीरीं । शेवटीं तो देहधारी । मरे जरी वासनें ॥ १ ॥ त्यास पुन्हां तोच हाट । जेथें बैसती कर्मठ । तेथें उपजून घोपट । मार्ग साधी मायीक ॥ २ ॥ आतां परपिडा परनिंदा । परघातीं जीव सदा । तमोवृद्धींत मानदा । जरी मेला प्राणिया ॥ ३ ॥ तरी जन्मे मूढ योनीं । स्थावर पाथर काननीं । मग तुकया नयनीं । तया न दिसे कल्पांतीं ॥ ४ ॥

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।**
**रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥**

५५१. पैं गा निवांतकवचरिपु । नग शत्रू जो सुषावपु । हीही गुणी कुलदीपु । मज सात्विक आवडे ॥ १ ॥ फळ निर्मळ सत्त्वाला । वेद जें कांहीं बोलला । पुण्यमार्ग उजळला । दुजा भानु होऊनी ॥ २ ॥ रजाचें फळ तें दुःख । जरी रुचि ने घे मुख । इंद्रियविषयीं असुख । आठवून मग रडे ॥ ३ ॥ उघडें तमाचें खापर । अज्ञानाचा शिरोभार । तेंच फळ ज्या अपार । बोधी तुका नायके ॥ ४ ॥

**सत्त्वात्संजायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।**
**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥**

५५२. सत्त्वगुणीं ज्ञाना वाढ । वेदशास्त्र कळे गूढ । बुद्धि मोहे ना सदृढ । जरी मूढें वेष्टिला ॥ १ ॥ रजोगुण वृद्धि अंत । पैं गा इंद्रियें आघात । पाठीं वाजतां धांवत । अविवेकतरुच्छायें ॥ २ ॥ आतां तमाचें सार्थक । मूळ असावा धावक । पुढें अज्ञानपाइक । पाहून चाले त्यापाठीं ॥ ३ ॥ मूर्खपणाचें वेतन । प्राण सांडीं तें घेऊन । सहज तुकया समान । करूं म्हणतां नष्टलें ॥ ४ ॥

**ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।**
**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥**

५५३. सत्त्वगुणें नर वैडुर्य । ऊर्ध्वगती साधुवर्य । ज्यास मार्ग देतो सूर्य । मग यम तो किती ॥ १ ॥ आतां येथें भूलोकांत[२४०] । देह धरणें अंतवंत । येथें उपडे पडे जीवित । मेघातळीं रजाचें ॥ २ ॥ आतां तिसरा जो तम । किंवा स्मशानींचा धूम । ज्याचा क्रोध वाहे यम । नीचवृत्ति पाहुनी ॥ ३ ॥ तामस लिंगा अधोगती । कधीं न पावे सुगती । ये न तुकया संगती । फिरे जरी चौऱ्यांशीं ॥ ४ ॥

---

२४०. ‘ येथें भूलोकांत ’ ऐवजीं ‘ येथें उपडे भूलोकांत ’—पाठ प्र. ४ व ६.

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

५५४. कर्ता कार्य कारणाचा । गुणाविण ठाव त्याचा । नसे ऐसी माझी वाचा । सत्य मानी अर्जुना ॥ १ ॥ दृश्य दर्शनांत द्रष्टा । आहे त्रिपुटी प्रतिष्ठा । पाहे ऐसें जरी श्रेष्ठा । नलगे कांहीं पुसणें ॥२॥ स्वात्मा गुणातीत पाहे । तोच पावे मद्रूप हें । येथें तुका निःसंदेहे । गुणातीत लेखावा ॥ ३ ॥

गुणानेतानतीत्य त्रीन् देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

५५५. उल्लंघून गुणवाटा । स्थिती अन्यत्र सुभटा । संस्कार तनूपटा । माजीं रंग जो दिसे ॥ १ ॥ जन्म मृत्यु जरा दुःखा । जो वेगळा स्वात्मसुखा । भोगी मुक्तिचिया सुखा । चिरंतन एकाग्र ॥२॥ ऐसा देव वदे वाणी । येरें परसून श्रवणीं । उल्हासला गांडिवपाणी । पुसे आवडी धरुनियां ॥ ३ ॥ सत्य सुख गुणपर । काय तयाचें अंतर । तुका वदला सादर । श्रोतीं चित्त ठेवावें ॥ ४ ॥

अर्जुन उवाच ।

कैर्लिङ्गैस्त्रीन् गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन् गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

५५६. वदे अर्जुन गोकुळपाळा । ऐक वसुदेवाच्या बाळा । कोठें या चिन्हांचा मेळा । जो बोलला संतत ॥ १ ॥ त्रिगुणांस उल्लंघून । तेव्हां तें क्रमी साधन । बोले हरि सावधान । असा आचार तो कैसा ॥ २ ॥ यासी लंघून वर्ततो । स्थितीं कोणत्या नांदतो । तुका प्रपंचीं वागतो । कैसा वदसी निराळा ॥ ३ ॥

श्रीभगवानुवाच ।

प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव ।
न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥ २२ ॥

५५७. बोले मेघवर्णकांती । मेघगंभीर गिरेप्रति । ऐके मेघवाहनमूर्ती । श्रोत्र मेघ चातक ॥१॥ जेणें प्रकाशें प्रवृत्ती । मोह सर्वादिकां स्थिती । जीं लक्षणें धरी मती । प्रवृत्तिकर्मीं न द्वेष ॥ २ ॥ निवृत्तीनें अपेक्षी ना । ऐसी निश्चळ कल्पना । तुका म्हणे मग अर्जुना । पुढां बोले गोविंद ॥ ३ ॥

उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।
गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥ २३ ॥

५५८. त्रिभुवन वैभवास । घेऊन शंकर गृहास । अर्पूं आला तरी त्रास । तो उदास या नांवें ॥ १ ॥ त्रितापांकित पीडे । ऋतु देतां न भाकडे । नये चांचल्या त्या पडे । जो कां झाला निश्चळ ॥ २ ॥ गुण वर्तती हे ऐसे । हेकें न धरी मानसें । स्वतां कर्तव्यता नसे । कांहीं न करी यालागीं ॥ ३ ॥ कडकडाटें गेला वारा । रुख न वचे सांडून थारा । किंवा मेरू पंडुकुमारा । काय लेखितो तुका ॥ ४ ॥

समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः ।
तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥

५५९. न प्रिय आलीयां संतोष । अप्रियांत न ये रोष । सुखदुःखादि विशेष । एक सुखें जो सेवी ॥ १ ॥ कोणीं निंदिला वंदिला । प्राबुद् ऐके ना तयाला । कोठें रुसला फुगला । ऐसे गुण तो ने घे ॥ २ ॥ स्वात्मनिष्ठेतें न सोडी । ध्रुव तया त्रिदश कोडी । छळतां भक्ति न तो सोडी । मधुवनीं मनोहर ॥ ३ ॥ भेंडा धोंडा कीं सुवर्ण । परिक्षु नेणें वर्णावर्ण । तो गां झाला जरी अवर्ण । तुका तरी मत्प्रिय ॥ ४ ॥

**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।**
**सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥**

५६०. मान अपमानीं शत्रुसन्निधानीं । मित्राच्या भुवनीं सारखा जो ॥ १ ॥ द्वय पक्षीं सम तपे भानूत्तम । तसा न विषम झाला कोणा ॥ २ ॥ आरंभ सर्वही टाकी तो न पाही । मन निःसंदेही एकविध ॥ ३ ॥ पार्था गुणातीत तोच बोलिजेत । ऐसी जेथें ख्यात तुकया सम ॥ ४ ॥

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥**

५६१. मातें अव्यभिचारें सेवी जो आदरें । पतिव्रता सरे पति सवें ॥ १ ॥ भक्तियोगें पूर्ण उपासतो खुण । सांगतो तुज गुण उल्लंघितो ॥ २ ॥ ब्रह्मत्वास योग्य झाला महाभाग्य । होईल आरोग्य शनैः शनैः ॥ ३ ॥ हेंही नको ज्याला स्वरूपें ओतला । वैदू तो गांजला तुकाराम ॥ ४ ॥

**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।**
**शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥ २७ ॥**

५६२. ऐके सव्यसाची नित्य जे वेदांची । साक्षीनें मोक्षाची संपदा गा ॥ १ ॥ धर्म जो आपुला चहूं वर्णी आला । यांचिया पावला शाश्वतासीं ॥ २ ॥ एकांत सुखास मी जगन्निवास । प्रतिष्ठा तयास केवळ गा । ॥ ३ ॥ मीच होय ऐसें धरावें मानसें । तुका अनायासें उद्धरिला ॥ ४ ॥

५६३.[२३४] ऐसी ही सुगिता साधकांची माता । मज वाटे दुहिता श्रीहरीची ॥ १ ॥ सुभद्रेहुनिया अधिका माने या । कां जे व्यापुनियां उरलीसे ॥ २ ॥ तिचा अभिमन्यु इचा बोधमान्यु । पतने जघन्यु मानी हरी ॥ ३ ॥ भाग्याचा सपूर पंडुज चतुर । निवेदी आसूर कुळकाळ ॥४॥ झाले अध्ये चौदा गुणातीत वादा । सांगुनी संवादा नेमी तुका ॥ ५ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः ॥ १४ ॥**

इति श्रीभगवद्गीता योगशास्त्रे अभंगदीपिके गुणातीत योगो नाम चतुर्दशोध्यायः[४६]

## ॥ अथ पञ्चदशोऽध्यायः ॥

### — पुरुषोत्तमयोग —

श्री भगवद्गीता अभंगात्मक पंचदशोध्याय:[४६]

५६४. [२३४] नमून सांष्टांगी कुळदेवी अष्टांगी । लोभ ते कष्टांगीं करूं रिघे ॥ १ ॥ पंधरावे सर्गीं पार्थ जीवसंगीं । अशंका प्रसंगीं उद्भवली ॥ २ ॥ प्रपंच हा तिखे दिसे का वरुखे । वारे कीं सर्वाखे ग्रासील हे ॥३॥ जाणून कल्पना नसावी अर्जुना । वृक्षाची भावना निवेदितो ॥ ४ ॥ पुढें क्षराक्षर उत्तम संचार । सांगे भामावर रखुमाईचा ॥ ५ ॥

**श्रीभगवानुवाच ।**

**ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।**
**छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥**

५६५. दितीजभंजन कुटीलगंजन । बोले निरंजन योगेश्वर ॥ १ ॥ ऊर्ध्व मूळ ब्रह्मीं माया शाखा क्रमी । देह अधोऊर्मी जीविताची ॥ २ ॥ विश्वाश्वत्थ म्हणे अश्वत्थ देखणें । श्रुतिपत्रें जाणें ऐसा कोणी ॥ ३ ॥ तोच वेदविद गा भासे जीवलगा । जेथें पावेल गा तुका स्वयें ॥ ४ ॥

**अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा**
**गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।**
**अधश्च मूलान्यनुसंततानि**
**कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥**

५६६. जीवेश्वरीं हेत देह गा आश्रित । त्रिगुणें प्रवृद्धांत तेंही ऐका ॥ १ ॥ उपशाखाबळें अल्प अंतराळे । पृथक् तनु मुळें लिंगदेहीं ॥ २ ॥ जीवीं ही कर्मांचे जया बंध त्याचे । मनुष्यदेहाचे बेचाड गा ॥ ३ ॥ हेचि ब्रह्मरज्जू जगसर्पतेजू । सांगे भक्तराजु तुकयाचा ॥ ४ ॥

न रूपमस्येह तथोपलभ्यते
नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूलम्
असङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥

५६७. आतां आदि अंत नसे ज्या निश्चित । म्हणावा शाश्वत तेंही नाहीं ॥ १ ॥ पाहातां जयाची मूळादि[२४१] तत्त्वांची । वाचा स्वयंभूची खुंटली गा ॥ २ ॥ प्रबळें विचित्र दिसे दीर्घ सूत्र । विषयीं अन्यत्र पोसला जो ॥ ३ ॥ झणी भयें चिंता धरिसी पंडुसुता । उत्सेद न आतां सांगों तुज ॥ ४ ॥ निष्काम जो दांड* निःसंगाचें खाड§ । गुरुसेवा अखंड धैर्यवंत ॥ ५ ॥ तो या भववृक्षा निवटी हे साक्षा । वदे देवो दक्षा हूंता मित्र ॥ ६ ॥ तुका म्हणे केली पायवाट भली । जड मूढ तरली कांसेलागीं ॥७॥

ततः पदं तत् परिमार्गितव्यं
यस्मिन् गता न निवर्तन्ति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये
यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

५६८. तें तो त्याचमाजी पद धुंडी आजी । कीं गेल्या ज्यामाजी परतेना ॥ १ ॥ लोकीं कीं पावन पुरुषा सनातन । आद्य जें कां स्थान अव्ययाचें ॥२॥ प्रवृत्ति जेथून नित नवी होऊन । विस्तार पावून रुढली गा ॥३॥ अनाद्य तें हेंची जाण सव्यसाची । तुका वैराग्याची सेल† ठेवी ॥४॥

निर्मानमोहा जितसङ्गदोषाः–
अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैः
गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

५६९. नाहीं श्लाघ्य काम मोह ना संगम । दोषाचा आगम पंथ टाकी ॥ १ ॥ निष्काम जो स्वात्मविचार संभ्रम । शेष उरे नाम रूप नाहीं

२४१. ' मूळादि ' ऐवजीं ' तूळादी '—पाठ प्र. ६.
* दांड = लवचिक नाहीं असा बांबू किंवा वासा.
§ खांड = फाळ.
† सेल = उत्तम वाट, खेळांतील मुख्य अथवा महत्त्वाची जागा.

॥ २ ॥ द्वंद्वासी सूटला सुखदुःख संज्ञेला । ते या नित्य पदाला जाणती गा ॥ ३ ॥ अभिज्ञ अक्षय म्हणावें तयास । तुका म्हणे यास अधिकार ॥ ४ ॥

न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

५७०. त्या पद शशांक सूर्य हुताशन । प्रकाशिती आन नव्हे कोण ॥ १ ॥ एकदां गेलिया खुंटे येरझार । पुन्हां न संसार दृष्टी पडे ॥ २ ॥ माझें तें सदन पावत परम । तुकयाचें धाम तेंच खरें ॥ ३ ॥

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनः षष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

५७१. माझा प्रतिबिंब अंश जाण पार्था । खरी तुज कथा निवेदितों ॥ १ ॥ झालों जीव जगीं जडा चेतना जे । होय आणि गाजे अहंकार ॥ २ ॥ मना पंचेंद्रियां अन्यांसी पाहातां । प्रकृति चाळितां झालों मीच ॥ ३ ॥ तुकयाचे मनीं अनुभव जो कां । तोच सांगूं निका कान देई ॥४॥

शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥ ८ ॥

५७२. ययासवें घेतां शरीरातें आत्मा । निघे परमात्मा ईश जेव्हां ॥ १ ॥ त्यातें घेऊनियां जातो कैशा रीतीं । पवन गंधाप्रती तैसा हाही ॥२॥ तुका म्हणे खेळ खेळून वेगळा । अगम्य ते कळा जाणे कोण ॥ ३ ॥

श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

५७३. श्रोत्र डोळे कांति जीभ नाक पांच । ज्ञानदृष्टि पंच इंद्रियें हीं ॥ १ ॥ अधिष्ठून मना तेंही एकवट । सेवितां संकट विषय हा ॥ २ ॥ भोक्ता तरी असे असोनी दिसे ना । आश्चर्य हें मना तुकयाच्या ॥ ३ ॥

**उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम् ।**
**विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥**

**५७४.** निघे कैसा पाहे असे कैसा हें हो । लक्षितां संदेहो गमे वीरा ॥ १ ॥ कैसा भोग भोगी कैसा गुणीं वागे । अज्ञाना वाउगें वाटे सारें ॥ २ ॥ ज्ञानदृष्टि ज्याची डोळस तो जनीं । पाहे जो हरोनी माया दृश्य ॥ ३ ॥ तुकया संगीचा विरळा लक्षांत । असेल जाणत ईश्वरासी ॥ ४ ॥

**यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।**
**यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥**

**५७५.** प्रयत्नशील कीं योगिये चांगला । देखती ययाला अभ्यंतरीं ॥ १ ॥ अशुद्ध जें देहीं कर्मी अमंगळ । यत्नींही विटाळ जया नरा ॥२॥ स्वतां नसे ज्ञान सांगितलें ने घे । अबुद्ध अवघें स्वैर वागे ॥ ३ ॥ न देखती ऐसें ईश्वरीं गौरव । भोगिती रौरव तुका म्हणे ॥ ४ ॥

**यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।**
**यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥**

**५७६.** जेणें तापे भानु प्रकाशी त्रिजग । शीतळत्वें चांग चंद्रमाही ॥ १ ॥ दोन्ही नसलिया पडे जैं अंधार । तेन्हां दे आधार पावक जो ॥ २ ॥ ययाविण जनीं जो गुप्त प्रकाश । हृदयांचे कोश उजळितां ॥ ३ ॥ विषयां उजळी माझी तेज ज्योती । जेथें मिळे अंतीं तुका साधु ॥ ४ ॥

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥**

**५७७.** धरितो शक्तीनें भूतें सपर्वत । वृक्ष नदी पंथ सरोनद ॥ १ ॥ प्रवेशून धरेमाजीं मी सखया । मत्बळें शेषा या आगळीक ॥ २ ॥ उष्णें करपती त्या औषधींचे भार । निशीं निराकार शांतवितो ॥ ३ ॥ रसात्मक मीच म्हणून सखया । रोग जाय लया व्याधि ग्रस्ती ॥ ४ ॥ नाना धातु क्रिया दिव्य रसायण । साद्य घेती गुण तुका म्हणे ॥ ५ ॥

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ।। १४ ।।

५७८. प्राण्यांचे शरीरीं मीच वैश्वानर । होऊन आहार पचवितों ।।१।। प्राणापान द्वय भाते लावूनियां । भस्मची अन्ना या चतुर्विधा ।। २ ।। जठरीं अन्न पचे पाहें माझी लीला । परि न लगे बाळा ढका तेथें ।। ३ ।। गर्भीण त्रिकाळ जेवी डोहाळ्याचें । नवल देवाचें तुका म्हणे ।। ४ ।।

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टः
मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो
वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ।। १५ ।।

५७९. सर्वांचिया मी हृदयीं प्रविष्ट । असें तरी स्पष्ट जाणीव घे ।।१।। देतों श्रुति स्मृति बोध विस्मृतीला । इष्ट[२४२] मी ज्ञेयाला श्रुतिगम्य ।। २ ।। सर्व सतां कळे वेदांतकृत् व्यास । वेदवेत्ता व्यास मानी विश्व ।। ३ ।। तुकया वरदें कविस्मृतिवेळीं । कैसी पाल्हावळी संध्याकाळीं ।। ४ ।।

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ।। १६ ।।

५८०. लोकीं जैसे रात्रंदिन नभ धरा । तैसे हे अवधारा द्विपुरुष ।। १ ।। क्षर आणि दुजा अक्षर म्हणूनी । ओळखो निदानीं जीव शीव ।। २ ।। क्षर तो सर्वही भूतें गा चतुरा । कूटस्थ अक्षरा अंश वदे ।। ३ ।। ययाहून भिन्न ऐकावें सुजाणा । तुकया चरणा लागतसे ।। ४ ।।

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ।। १७ ।।

५८१. तो अन्य पुरुषोत्तम । पार न जाणे आगम ।। १ ।। विश्व सर्वात्मा बोलला । पातंजळी निश्चय केला ।। २ ।। प्रवेशून जो जीवत्वें । जीवा सांभाळीं ईशत्वें ।। ३ ।। ऐसे थोडक्यांत बुझें । तुका केवळ दीन माझें ।। ४ ।।

२४२. 'इष्ट' ऐवजीं 'निष्ट' - पाठ प्र. १.

**यस्मात् क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।**
**अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥**

५८२. क्षरातीत मी यालागीं । तुज कळावें प्रसंगीं ॥ १ ॥ उत्तम गा अक्षराहून । माझें अगाध हें ज्ञान ॥ २ ॥ लोकीं वेदींही यास्तव । आहे आमुचाची स्तव ॥ ३ ॥ पुरुषीं उत्तम विख्यात । जाणे तुकया संमत ॥ ४ ॥

**यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।**
**स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥**

५८३. ऐसें जाणें मला सूज्ञ । त्यासी म्हणावें सर्वज्ञ ॥ १ ॥ येर मूढ शिखामणी । काय चाटावी करणी ॥ २ ॥ जो मला पुरुषोत्तमा । मी क्षराक्षर नामा ॥ ३ ॥ मज भजे सर्व भावें । जैसा तुका लागे सेवे ॥ ४ ॥

**इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।**
**एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात् कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥**

५८४. ऐसें शास्त्र बोधियलें । सख्या गुह्य सांगितलें ॥ १ ॥ बुद्धिवंत जाणेल जो । तोच येईल आम्हां भजों ॥ २ ॥ कृतकृत्यही होय तो । तुका म्हणे यम भितो ॥ ३ ॥

५८५. [२३४]झाले पंधरा अध्याय । बोध येथें चतुष्पाय ॥ १ ॥ पुढें षोडशीं संयुक्त । चंद्र प्रगटेल विरक्त ॥ २ ॥ निवति श्रोते वक्ते मनीं । मोक्ष ठेवला निदानीं ॥ ३ ॥ पाहो तुकयाच्या सर्वे । केले वेद त्यक्त गर्वे ॥ ४ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे पुरुषोत्तमयोगो नाम पञ्चदशोऽध्यायः ॥ १० ॥**

**इति श्री भगवद्गीता योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे**
**पुरुषोत्तम योगो नाम पंचदशोध्यायः**[४६]

॥ अथ षोडशोऽध्यायः ॥

## — दैवासुरसंपत्तियोग —

### श्रीभगवद्गीता अभंगात्मक षोडशोध्यायः[४६]

५८६. [४६]झाली पंधराव्यांत । गीता पोथी ही समाप्त ॥ १ ॥ नाहीं संशय उरला । पार्थ कृतकृत्य झाला ॥ २ ॥ बोध उरला नसतां । मग सोळावा कां आतां ॥३॥ तरी तर्क हरि पोटीं । देह प्रारब्ध कसवटी* ॥४॥ देईल साधकां संपदा । न ये त्यागिल्या आपदा ॥ ५ ॥ तरी तिचे दोन मार्ग । सांगून उडवी विसर्ग ॥६॥ तेंच कारण सोळावें । बंधमुक्त त्याज्य नांवें ॥ ७ ॥ शेवटील शास्त्ररीती । बहुध परिसिली संतीं ॥ ८ ॥ आतां भले हो अवधारा । ठेवून मायीक पसारा ॥ ९ ॥ श्रीगुरु पांडुरंग दासा । दिल्हा तुकयानें भरंवसा ॥ १० ॥

श्रीभगवानुवाच ।

**अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।**
**दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥**

५८७. ऐकें गुणवंता किरिटी । दैवें फळ दिल्या हातीं ॥ १ ॥ गुण उत्तम धरिजे । सत्त्वशुद्धि भय त्यागिजे ॥ २ ॥ ज्ञान यांत थोरपणें । दान दम याग करणें ॥३॥ तप शास्त्र न वांकुडा । तोच तुकया सौंगडा ॥४॥

**अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।**
**दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥**

५८८. सत्य राग न अहिंसा । त्याग शांतीचा भरंवसा ॥ १ ॥ अपैशुन्य मनीं लाज । दया भूतीं मृदु काज ॥ २ ॥ स्थैर्य निस्पृह लक्षणें । मी ओंवाळीं पंचप्राणें ॥ ३ ॥ धन्य माऊली तुकयाची । कुसी सुफळ पुण्याची ॥ ४ ॥

---

* कसवटी = सोन्याचा कस पाहण्याचा धोंडा; कसोटी, परीक्षा.

तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

५८९. न ज्या श्लाघ्य परद्रोह । नसणें धारणा उत्साह ॥१॥ क्षमा शुद्धता पैं तेज । हे होती गा दैवें आज ॥ २ ॥ संपत्तीचा तोच नर । मिरवी भूषणीं शरीर ॥ ३ ॥ दैवीं दैवाची म्हणावी । वस्ती तुकयाची गांवीं ॥ ४ ॥

दम्भो दर्पोऽभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

५९०. आतां दंभ दर्प गुणें । वसवी अहंतेचें ठाणें ॥ १ ॥ क्रोध क्रूर अवकृता । आसुरी संपदा आहिता ॥ २ ॥ ज्यास होती तो पावला । कांदा जेवीं दुर्गंधीला ॥३॥ त्यजी कस्तुरीचें आळें । तुका म्हणे मस्ती बळें ॥४॥

दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ॥ ५ ॥

५९१.[२४३] दैवी संपदा मोक्षार्थ । पहिला सांगितला अर्थ ॥ १ ॥ भवबंधार्थ आसुरी । जे हे वर्णितो दुसरी ॥ २ ॥ शोक न करी पांडवा । वरूं आलियास देवा ॥ ३ ॥ तूं गा दैवीं संपत्तीचा । भाव दर्पण तुकयाचा ॥४॥

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

५९२. द्विधा उद्भव भूतांचा । दैव आणि असुरांचा ॥ १ ॥ विस्तारें वदलों दैव । सुचिन्हांचा प्रादुर्भाव ॥ २ ॥ आतां असुरा आइक । मन देऊन नावेक ॥ ३ ॥ जेथें दुश्चिन्हांचा मेळ । तुकया न मानी तो खेळ ॥ ४ ॥

---

२४३. या अभंगाऐवजीं पुढील पाठ प्र. १ मध्यें दिला आहे.

५९१–अ. दैवी संपदा मोक्षार्थ । जेणें लाहिजे परमार्थ ॥ १ ॥ भवबंधांना कारण । असुरी संपदा तें जाण ॥ २ ॥ पांडवा तूं करी त्यागी । दैवी संपात्ति घे अंगीं ॥ ३ ॥ सांडी असुरी अभाव । तुका म्हणे तोच देव ॥ ४ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

५९३. कामप्रवृत्ति धर्मार्थी । कीं मोक्षार्थी निष्काम ॥ १ ॥ नेणतीच द्वय मार्गा । विषय वर्गावर पडे ॥ २ ॥ शौच आचार तो नाहीं । जैसे महिषीही रेडे ॥ ३ ॥ असुरां त्यां नसे सत्य । तुकया गत मग कैची ॥ ४ ॥

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

५९४. ईशाविण वर्णिताती । विश्वोत्पात्ति कामानें ॥ १ ॥ देव म्हणिजे कृत्रिम । सर्व क्रम आपुला ॥ २ ॥ विश्वा कैसेनी उद्योग । हा संयोग स्त्रीनरां ॥ ३ ॥ अहो मैथुनावांचून । कैं दिसून ये तुका ॥ ४ ॥

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

५९५. दृष्टि ज्यांची प्रत्यक्षीं हे । न जो पाहे सद्वाक्य ॥ १ ॥ अल्पबुद्धी जो भ्रष्टधी । कोणे कधीं उद्धरे ॥ २ ॥ लोकघाती क्रूरकर्मी । पाहे ऊर्मी बळाची ॥ ३ ॥ दुष्ट चार्वाक वर्ततां । नेणें संतां तुकया ॥ ४ ॥

काममाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।
मोहाद्गृहीत्वा सद्ग्राहान् प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

५९६. दंभश्लाघामदें मस्त । अंगें सुस्त बोकड ॥ १ ॥ कामसिंधूंत बुडाला । जो उडाला मर्यादे ॥२॥ मोहें घेऊन दुर्बुद्धि । हुंगी गंधी योनीची ॥ ३ ॥ व्रतीं अशुची वर्तती । तुकयाप्रती दे त्रास ॥ ४ ॥

चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

५९७. मरणादि चिंता नाना । आठवी ना रोगासी ॥ १ ॥ भय न धरी यमाचें । तो रामाचें काय लागे ॥ २ ॥ भोग पुरुषार्थ भोगी । देह भंगी आपण ॥ ३ ॥ प्रत्यक्षींच निश्चय जया । तो तुकया न पाहे ॥ ४ ॥

**आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।**
**ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥**

५९८. आशापाशें जे निबद्ध । दे विरूद्ध श्रीपादा ।। १ ।। कामक्रोधाशी आश्रित । कीं मिश्रित लोभांगीं ।। २ ॥ इहलोकींच्या भोगार्था । परमार्था नायके ।। ३ ।। धन अन्याय संग्रह । तुका ग्रहरूप त्या ।। ४ ।।

**इदमद्य मया लब्धमिदं प्राप्स्ये मनोरथम् ।**
**इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥**

५९९. मेळविलें आजि म्यां हें । हिशेब पाहे दप्तरीं ।। १ ॥ मनोरथ हा होणार । कीं सोनार दे डांक ।। २ ।। मज आहे जे बोलती । पैं कोलती पिशाची ॥ ३ ॥ पुन्हां धन दैवें मिळे । तुकया खळें गांजावें ।। ४ ॥

**असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।**
**ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान् सुखी ॥ १४ ॥**

६००. आज वैरी हा मारिला । आणिकाला मारीन ।। १ ॥ समर्थ तो मीच भोक्ता । ऐसा वक्ता अस्मादी ।। २ ॥ बळ मीच सिद्ध मीच । गर्वे चिंच वांकली ।। ३ ।। तुका पाहिला तुकून । मी सधन सुखाचा ।। ४ ॥

**आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।**
**यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥**

६०१. मला दूत समृद्ध मी । जग न मी न पाहें ।। १ ।। मजसारखा कोण हो । भरी होन हुंडीचे ।। २ ।। मातें भजे त्यास सुखें । मी असंख्य देणारा ॥ ३ ।। बदती दैत्य हे श्रौत कीं । कुबेर तुकीं तुके ना ।। ४ ॥

**अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।**
**प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥**

६०२. चित्तीं स्वर्गादिकां भ्रांती । ते महंती कोरडी ।। १ ।। मोहजाळेंच वेष्टिलें । प्रतिष्ठिलें स्त्रीवृंदी ॥ २ ॥ न पुरेच काम देही । मग विदेही जैं होती ॥ ३ ॥ तेव्हां पडती नरकांत । तुकया भ्रांत लागे ना ॥ ४ ॥

**आत्मसंभाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।**
**यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥**

६०३. देहीं धनें मानें मदें । तंतु आल्हादे गर्विष्ठ ॥ १ ॥ पोसले जैसे वृक । दिना बीक मांसानीं ॥ २ ॥ यज्ञ यजती नांवाचे । कीं दंभाचे डांगोरे ॥ ३ ॥ विधिपूर्वक चुकले । ते मुकले तुकयासी ॥ ४ ॥

**अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।**
**मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥**

६०४. शरीरीं अहंकार पेटे । वन्ही न पाहे वसोटे* । बळें शुक्र वन्ही झटे । गर्व दावी तेजाचा ॥ १ ॥ काम कापूर मिळवणी । क्रोध गंधकाची खाणी । झाला श्रित घृतकर्णी । उरों नेदी चाटित ॥ २ ॥ मम अंशें जग झालें । ऐसें ज्यास समजलें । इहीं तयास भर्जिलें । ऐसा गा पुढा द्वेषिती[२४४] ॥ ३ ॥ ज्वाळा निंदेची खडतर । पोळी साधूंचें जिव्हार । तेथें तुकयाचा थार । आहे आहे नाहीं नाहीं ॥ ४ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् ।**
**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥**

६०५. परताप मत्सेवका । पाहून आक्रांत या लोकां । मेघ मी ओळें त्या पावका । हस्तोदका चित्रेंसी ॥ १ ॥ माझी क्रूरपणाची तीख । नभीं चमके लखलख । तेव्हां पडे काळें मुख । जे गुंडाळे धुवारें ॥ २ ॥ नराधमाची विभुती । असुरी पोटीं धुंधुवाती । पडे तेथें उद्भवती । सदा काळ कोळसे ॥ ३ ॥ दुष्ट योनीं पुनःपुन्हां । अन्य मार्ग नेणेच ना । कां जे तुकयाचा कान्हा । खळें आगळा गांजला ॥ ४ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥ २० ॥**

६०६. आसुरी योनी मूढ । जन्मोजन्मीं पावे दृढ । तेंही न ठेवीं मी गूढ । येथें उघड सांगतों ॥ १ ॥ भील कावळा कीं बोका । मर्कटही

---

२४४. 'ऐसा गा पुढा द्वेषिती' ऐवजीं 'मागा पुढां द्वेषानी'—पाठ प्र.१.
* वसोटे = राहातीं घरें; आश्रयस्थानें.

सेर टोळका । मुंगळा मातंग मंडुका । कंटक रूख पाषाण ॥ २ ॥ गीध व्याघ्र क्रोड पिसा । योनी भोगुनियां असा । मग यमदंडें त्रासा । पावे पडे रौरवीं ॥ ३ ॥ जेथें अंत न लागे रवी । वायु खुंटे त्या अभावीं । पडे विसर मग जीवीं । झाला पुरा तुकयाचा ॥ ४ ॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत् त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥**

६०७. जावया नरक कूपीं । तीन द्वारें हीं साक्षेपी । द्वारीं लागलिया पापी । बळें देती ढकलूनी ॥ १ ॥ आत्मघातक यास्तव । आम्ही ठेवूं याचें नांव । कां कीं न चले उपाव । जेथें कोटी साधनीं ॥ २ ॥ तरी काम क्रोध लोभ । तीन द्वारें हीं स्वयंभ । ज्यांचा भुवनत्रयीं क्षोभ । कांपे अवघा भूगोळ ॥ ३ ॥ तस्मात् शहाणा तूं होसी । तरी त्यागी या तिघांसीं । मग शुद्ध मार्गा जासी । जैसा तुका वैकुंठीं ॥ ४ ॥

**एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥**

६०८. या त्रिनरकद्वारां- । पासूनियां धनुर्धरा । सूटला तो नर त्वरां । साधनांच्या पाऊटीं ॥ १ ॥ आत्मश्रेय आचरूनी । राहे उदास जनीं वनीं । सदा सावधान मनीं । हित वागे आपुलें ॥ २ ॥ त्या थोरास थोर गती । होय जनकादि संगती । अथवा तुकया पंगती । प्रासादिक घे लाभ ॥ ३ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥**

६०९. सत्य शास्त्रार्थ विहीन । विधि वास विसर्जन । श्रुतिपाठ दे लाजून । ऐसा जो कां उन्मत्त ॥ १ ॥ वागणें तें स्वेच्छाचार । जेवीं अकाळीं जलधार । कार्यनाश परि उर । फोडी देऊन किंकाळी ॥ २ ॥ सिद्धि बनस्पती कैंची । शुभा अशुभा सुखांची । नव्हे गोष्टी ते मुखाची । पडे धर्म दुष्काळ ॥ ३ ॥ उत्तम गती त्याची हे गा । आपण मरे पिडी जगा । किंवा ओणवा अवघा । तुका म्हणे दे त्रास ॥ ४ ॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।**
**ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

६१०. तस्मात् उत्तम सच्छास्त्र । जैसें साळंकारी वस्त्र । किंवा विष्णुनामें वक्र । वैष्णवांचें रंगलें ॥१॥ विचारतां कार्याकार्य । वंद्य होय जनीं आर्य । किंवा शिष्य गुरूवर्य । माया जेवीं तान्हया ॥ २ ॥ शास्त्रें विध्युक्त जाणुनी । वागे जैसा द्रय वाणी । कर्मयोग्य तूं अवनीं । होसी सखया ऐके रे ॥ ३ ॥ तुका जैसा कां निष्काम । झाला जगास विश्राम । तेवीं तुझा गा आराम । विश्व मनीं मानील ॥ ४ ॥

६११. [२३४]ऐसा बोध करी कृष्णु । वासुदेव जो सहिष्णु । जडजीव जगदिष्णु । ऐके जिष्णु सावध ॥ १ ॥ संपदेचा हा संशय । वारुनियां यदुराय । केला षोडशीं अभय । ज्ञान नभीं आवडीं ॥ २ ॥ परि त्याची जीवनकळा । होती स्वाधीन गोपाळा । तीही न राखी वेगळा । अर्पण करी किरिटीसी ॥ ३ ॥ तेंच सत्रावीचें पय । प्राशिल जेथें वत्सन्याय । तेथें तुकया प्रत्यय । वदे गुरु दास पैं ॥ ४ ॥

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दैवासुरसंपद्विभागयोगो नाम षोडशोऽध्यायः ॥ १६ ॥**

इति भगवद्गीता अभंगांकित षोडशोध्यायः [४६]

॥ अथ सप्तदशोऽध्यायः ॥

## — श्रद्धात्रयविभागयोग —

श्री भगवद्गीता अभंगात्मक सप्तदशोध्यायः[४६]

६१२. [२३४]कुळी सत्कुळी कुळाधी। कुळदैवत कुळमधी। नवल दाविल कुळसिद्धि। जग अवघें कुळसुखी ॥ १ ॥ आतां सप्तदशापोटीं। कैसी नाजुक हृतवटी। भक्ष साजुक किरिटी। पात्रीं देवो वोगरी ॥ २ ॥ तेथें त्रिगुण मक्षिका। वारुनियां स्वाद निका। घेणें पंडूच्या बाळका। हरि माउलीच्या करें ॥ ३ ॥ तेंच एक वेळां पुन्हां। विचारून जनार्दना। घेत जवळ सज्जना। तुकया ठेवो न पाहे ॥ ४ ॥ परि सत्कवि पिप्पली। ताट प्रसादा लाभली। आतां वृत्ति जे लाधली। ती न राहे निवांत ॥ ५ ॥

**अर्जुन उवाच।**

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

६१३. महाराजा राजयांच्या। सत्ता नेमी श्रीमंतांच्या। ऐके प्रभु पंडितांच्या। चिद्भवनाच्या चिज्ज्योती ॥ १ ॥ नमस्कार विश्वालया। ऐसें पार्थे स्तवूनियां। पुसता झाला त्या अन्वया। वरी दृष्टि न्यासीजे ॥ २ ॥ शास्त्रविधि जे सोडोनी। यजन श्रद्धेच्या याजनीं। त्याची निष्ठा बोलाननी। सत्त्व रजीं कीं तम ॥३॥ कृष्ण गोपाळ गोवळा। सांवळिया गोव्रजखेळा॥ गोपीरमण गोवत्सला। गोरसचोरा तुकयाच्या ॥ ४ ॥

**श्रीभगवानुवाच।**

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥**

६१४. बोले रुक्मिणीचा कांत। रुक्मवस्त्र विराजित। रुक्मांगदी रुक्मवंत। रुक्मियाचा मेहुणा ॥ १ ॥ ऐके कपिंद्रकेतना। खगेंद्रध्वजप्रिय

अर्जुना । सुरेंद्र देवाधिनंदना । मज योगिंद्रा प्रिय तूं ॥ २ ॥ श्रद्धा संस्कारापासुनी । त्रिधा होती जीवा मनी । सात्त्विक आणि राजसिनी । तामसी ते तिसरी ॥३॥ ऐक ऐसी या त्रिविधा । वेणी माया शिरीं मुग्धा । वरी डागिणे प्रसिद्धा । तुका जडी जडीतें ॥ ४ ॥

सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत ।
श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥

६१५. जैसें सत्त्व तैसी श्रद्धा या जीवांसी । कीं भक्ति देवासी नेमिली गा ॥ १ ॥ होत रे सर्वां या भारताच्या राया । वरा आधीं पाया बळकटी ॥ २ ॥ ज्याची श्रद्धा तोच होतो सव्यसाची । कीळ कीं रत्नाची[२४५] प्रतिष्ठा ती ॥ ३ ॥ जीव श्रद्धामये नेमचि हा स्वयें । तुकयाची माये मीच जैसा ॥ ४ ॥

यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः ।
प्रेतान् भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥

६१६. सत्त्वाढ्य तो देवा भजे अर्पी भावा । भूपार्थ सचिवा सेवा जैसी ॥ १ ॥ राजस तो यक्षा भजती गा रक्षा । गोरस सापेक्षा कुर्वाळी गा ॥ २ ॥ तामस भूतप्रेतीं आयुष्य वेंचिती । सिंदी छायेप्रती मद्यपी गा ॥ ३ ॥ तैसें अघोरी ते वेंचून धनातें । राजी तुकयातें न करिती ॥ ४ ॥

अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।
दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥

६१७. शास्त्र जें न सांगे तेथें रात्रीं जागे । प्रेतावरी अंगें पढे मंत्र ॥ १ ॥ घोर तप कैसे जोडी जीव हिंसे । नेणें तर्थीं पिसें पर्वकाळ ॥ २ ॥ दंभें कामें किंवा अहंकार व्हावा । भल्यावरी दावा चालवून ॥ ३ ॥ विशेष प्रीतीच्या बळेंही मतीच्या । चेष्टा तुकयाच्या आरंभिती ॥ ४ ॥

२४५. 'रत्नाची' ऐवजीं 'नळाची'—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

**कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।**
**मां चैवान्तः शरीरस्थं तान्विद्‌ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥**

६१८. करिती देह क्षीण ह्याच अवगुण । न पाहाती शीण उभारती ॥ १ ॥ आंत मी जीवात्मा पीडितां आक्रंदें । नेणती गा मदें मस्ती ऐसी ॥ २ ॥ देव मी सर्वांस मज देती त्रास । काय त्या मूढांस हासूं रडूं ॥ ३ ॥ असुर हें चिन्ह निश्चय सांगून । सांगे आन अन्य तुकयासी ॥४॥

**आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।**
**यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥**

६१९. आतां सर्वा गोष्टींमाजी घे जे श्रेष्ठी । आहार परमेष्ठी नेमितसे ॥१॥ त्यासारिखे होत गुण देहोत्पत्त । त्रिविध भासत आहार जो ॥ २ ॥ त्रिवर्गांसी प्रीय सांगू यथान्याय । मग दावूं प्रत्यय यज्ञांचा गा ॥ ३ ॥ तप आणि दान भेद घे ऐकून । जरी तूं सज्ञान तुकया ऐसा ॥ ४ ॥

**आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।**
**रस्याः स्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराः सात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥**

६२०. आयुष्यासी बरें सत्त्व अवतरे । बळ आणि बारे* वैराग्य ये ॥ १ ॥ सुख प्रीतिलागीं क्षुधे[२४६] दे तूं चांगी । स्थिर स्निग्ध अंगीं रस-युक्त ॥२॥ आहार हा प्रिय सात्त्विकांस होय । गोरस कीं प्रिय[२४७] शर्करादी ॥ ३ ॥ गोधूम तांदूळ सत्वीं मूगदळ । तुकीं शाखा फळ तुंबी ऐसें ॥४॥

**कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।**
**आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदा ॥ ९ ॥**

६२१. उष्णें जीभ पोळी क्षारसिंधु उकळी । कटू तें उगळी उदरस्था ॥ १ ॥ आम्लें दांत हाले शुष्क निर्जीव झाले । आणीविन भाले तिखें खाय ॥२॥ खातां नाकीं मुखीं धूर उठे दुःखीं । सर्वांगास सोखी चैन नेदी ॥३॥ आहार राजस सद्य फळ त्यास । दुःख शोक भयास म्हणे तुका ॥ ४ ॥

२४६. ‘ क्षुधे ’ ऐवजीं ‘ वृद्धि ’—पाठ प्र. १.
२४७. ‘ प्रिय ’ ऐवजीं ‘ पय ’—पाठ प्र. १.
* बारे = हव्यास, पक्वदशा.

**यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।**
**उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥**

६२२. शिजून लोटला काळ बहु गेला । उठे पदार्थाला घाणी जेथें ॥ १ ॥ वाळली काचरी रस ना अंतरीं । विटलें परोपरी फेंसावलें ॥ २ ॥ शिळें[२४८] म्हणजे मांसा व्याघ्र सडवी जैसा । सदन्नां बुरसा वाढे तेंही ॥३॥ विदारिलें शुनें वत्सें बाळकानें । अंतीं राहे तें अन्नें राडी करी ॥ ४ ॥ अपवित्र आहार अपवित्र आचार । तामस प्रकार तुका निंदी ॥ ५ ॥

**अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।**
**यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥**

६२३. नाहीं फळाकांक्षा वृत्ति निरपेक्षा । तुळसीच्या वृक्षापरी सेवा ॥ १ ॥ विधी डोळियानें यजनीं हवनें । बापा लेकीं माने अलिप्तत्वें ॥ २ ॥ यजावें तें अशा एका जगदीशा । गुरुत्वें हुताशा प्रतिपाळी ॥ ३ ॥ सात्विकांचा यज्ञ हाच भाव सुज्ञ । सांगितला प्राज्ञ म्हणे तुका ॥ ४ ॥

**अभिसंधाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ।**
**इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥**

६२४. अभिलाष फळीं च्युत वृक्षामुळीं । पाळीत कर्दळी तेवीं यज्ञ ॥ १ ॥ दंभार्थ चोहटी दावित कोल्हाटी । यजीं हातवटी[२४९] तया माने ॥ २ ॥ भरतश्रेष्ठा यज्ञ राजसाचें चिन्ह । घ्यावें ओळखून केवळ गा ॥३॥ तुकयासी अर्थ कळला राजस्वार्थ । प्रपंच परमार्थ चाळीतसे ॥ ४ ॥

**विधिहीनमसृष्टान्नं मन्त्रहीनमदक्षिणम् ।**
**श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥**

६२५. नाहीं विधि नाहीं मंत्र पुरा पाही । अन्नशांति तीही सुनाट गा ॥ १ ॥ दक्षिणा ती कैसी दक्षिण दिशेसी । दावी आणि तैसी यमकृपा ॥ २ श्रद्धा उदरीं नसे उगे भलत्या मिसें । लोकीं सांगतसे सत्कारूनी ॥ ३ ॥ तामस यजन जाणती सज्ञान । आतां सत्त्वचिन्ह दावी तुका ॥४॥

---

२४८. 'शिळे' ऐवजीं 'साळे'—पाठ प्र. १.
२४९. 'हातवटी' ऐवजीं 'हाटवटी'—पाठ प्र. ४ व ६.

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

६२६. देव द्विज गुरु भजे एकभावें । भिन्न त्याच्या नांवें न झाला जो ॥ १ ॥ प्राज्ञ परियेसा पूजनीं चींवसा । शुद्धिवंत कैसा अवक्र तें ॥ २ ॥ ब्रह्मचर्य खरें स्त्रीकडे ना मोहरे । अहिंसक सारें कर्मजाळ ॥ ३ ॥ हेंच देहतप जाणावें अर्जुना । वाचिकाच्या गुणा वर्णी तुका ॥ ४ ॥

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

६२७. नेदि कष्ट श्रोत्यां ऐसें जें बोलणें । प्रेम पाल्हावणें सुधावल्ली[२५०] ॥ १ ॥ परि तें गा सत्य प्रिय परहित । कीं वेदवेदांत पाह्राणें गा ॥ २ ॥ नित्य पाठ करी शिकावें ह्व्यास । जन म्हणती व्यास अवतरला ॥ ३ ॥ वाचेचें हें तप जाणावें विभक्त । मनाचेही इच्छा तुका पुसे ॥ ४ ॥

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

६२८. मन प्रसन्नता मौनी ध्यानीं वागे । सौम्यत्वें न पांगे चांचल्य तें ॥ १ ॥ निग्रह मनाचा चित्तांत निष्काम । सदा स्मरे ‘ रामकृष्णहरि ’ ॥ २ ॥ मानस हें तप जाणावें फाल्गुना । आतां सत्त्वगुणा ऐक तुकीं ॥ ३ ॥

श्रद्धया परया तप्तं तपस्तत् त्रिविधं नरैः ।
अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

६२९. महाश्रद्धें केलें जें कां आराधन । त्रिधा तें करून तपालागीं ॥१॥ फळेच्छेवांचून निष्ठायुक्त वाल्हा । जेवीं बैसविला नारदानें ॥ २ ॥ अथवा वामदेवा कपिल दत्तात्रया । त्यांच्या पडे पायां निष्कामत्वें ॥ ३ ॥ सात्त्विक हें तप ऐकावें रे कृष्णा । राजसाची तृष्णा वर्णी तुका ॥ ४ ॥

---

२५०. ‘ सुधावल्ली ’ ऐवजीं ‘ साधुवल्ली ’—पाठ प्र. ४, ६, ७ व ८.

**सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ।**
**क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥**

६३०. सन्मान वाढावा पूजा घेणें लोकीं । माझी बुद्धि साकी उघडी ना ॥ १ ॥ श्लाघ्यें धरी पडप* आणि दंभ भारी । राजस अवधारी तप तें गा ॥ २ ॥ चित्रीं गंगाजळ जवळीक नित्य । आदर्शीं असत्य धन जैसें ॥ ३ ॥ चंचल अशाश्वत पार्थिवा जाणावें । आतां तमा ध्यावें तुका त्याज्य ॥ ४ ॥

**मूढग्राहेणात्मनो यत् पीडया क्रियते तपः ।**
**परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥**

६३१. मूढत्वें आग्रहें स्वात्मया पिडूनी । स्वमांसरक्तानीं देती बळी ॥ १ ॥ किंवा उगे करी मनस्वी उपास । इंद्रिय तापास चढवी तपें ॥२॥ ते शत्रू मारावे उच्चाटण व्हावे । काम पुरवावे इच्छेजोगें ॥ ३ ॥ तें तामस गा पार्था तप त्वां जाणावें । आतां सत्त्वा भावें गाय तुका ॥ ४ ॥

**दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।**
**देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥**

६३२. देणें विहित कीं यथा भावें पार्था । न दावी सर्वथा उपकार जो ॥ १ ॥ अंगास छेदवी झिजवी चंदन । हरास लेपन जैसें त्याचें ॥ २ ॥ पडे पूर्णाहूति महायज्ञीं जैशी । पात्र काळ देशीं सत्व दान ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐका रजोगुण कैसा । चोर मानी जैसा धनाढयासी ॥ ४ ॥

**यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।**
**दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥**

६३३. प्रत्युपकारार्थ जो कां सावधान । पक्षासी प्रधान आमंत्री जे ॥ १ ॥ सोयऱ्या आग्रह आहेरीं ती दृष्टी । फळापेक्षा पोटीं वाहे तैसी ॥ २ ॥ देणें घडे जरी यद्यपि निष्काम । तेव्हां वाटे ग्रामलूट केली ॥ ३ ॥ दान राजसाचें ऐसें निरोपिलें । आतां तुकया आलें तमांध गा ॥ ४ ॥

---

* पडप = स्तुतिप्रियता.

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

६३४. दान धर्म तर्मी नसे संस्कार । घडे तरी घोर मार्ग ऐका ।। १ ।। कुत्सिता त्या देशीं काळ अवकाळेंसी । वांर्ता शूनी जैसी मिळूं आली ॥ २ ॥ आतां तें अपात्र कैसें तरी ऐक । नित्याचें पाइक भाटापरी ॥३॥ लाथाबुक्यांवरी जैसी बोळवण । तैसें दान पुण्य अमंगळ ॥ ४ ॥ तामस वाणिला आतां श्रुतिपंथ । ऐकावें समर्थ म्हणे तुका ।। ५ ।।

ॐ तत् सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

६३५. 'ॐ तत्सत्' त्रिपदें ब्रह्म तें बोललें । श्रवणासी केलें नामरूप ।। १ ।। त्रिविध लक्षणें मानसीं ओळखे । शशी पूर्ण देखे शरदीं जेवीं ॥ २ ॥ तेणें गा पार्थिवा पूर्वी विप्र वेद । यज्ञादि विविध बोलियले ॥ ३ ॥ तुकयाच्या दये प्राप्त गुरु दासा । पुरला धिंवसा* तेणें त्याचा ॥ ४ ॥

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।
प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥

६३६. म्हणून ॐकार यज्ञ दान तप । क्रियेचें स्वरूप ओळखती ॥१॥ वेदवेत्याच्या नित्याच्यिा विधि । प्रोक्त यथासिद्धि प्रवर्तती ॥२॥ मग जें साधन विनियोगें चांग । सौंदर्याचें अंग अळंकार ॥ ३ ॥ मुखीं ब्रह्मनाम हातीं सत्यकर्म । विनियोगें वर्म दावी तुका ॥ ४ ॥

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥ २५ ॥

६३७. तो घट म्हणतां मृत्तिका जाणवे । भूषणीं आघवें भांगार गा ।। १।। तत्पदीं ज्ञान जें होय कर्म ब्रह्म । बुझे गूढ धर्म चतुराब्धी ॥ २ ॥ यज्ञ दान सारे मोक्षार्थीच जाण । निष्काम तें पूर्ण किजे तिहीं ॥ ३ ॥ ऐसें जाणूनियां छेदी संशयास । बधी कौरवांस तुका म्हणे ॥ ४ ॥

---

* धिंवसा = धिंसा, भय, भीति.

सद्भावे साधुभावे च सदित्येतत् प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

६३८. सत्यपर्णी तेच साधु साचपर्णी । गौप्याची करणी प्रगटली ॥१॥ सच्छब्दें त्यांतही वर्ते धनंजया । कर्म करूनियां अलिप्तता ॥ २ ॥ निष्काम जे कर्मी साधुत्वीं भारता । सच्छब्दें योजतां येथें देई ॥ ३ ॥ मज तुज बाध न लगे गोत्रहत्या । तुका म्हणे सत्य-शास्त्रांची या ॥ ४ ॥

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

६३९. 'सत्' या शब्दें साधु तेही झाले सिद्ध । नलगे कर्मबाध ब्रह्मत्वांत ॥ १ ॥ स्थिति त्याची सुज्ञा यज्ञीं दानीं तपीं । तो तंव तद्रूपीं तच्छब्दार्थ ॥ २ ॥ तच्छब्दार्थ ब्रह्म 'सत्' ऐसें बोलिजे । कदा न उरिजे महा मौनें ॥ ३ ॥ मौन तेंही गेलें आटलें जीवपण । शिव साक्ष खुण म्हणे तुका ॥ ४ ॥

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत् प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

६४०. परि केले होम संभ्रम दानांचा । जरी का श्रद्धेचा लेश नाहीं ॥ १ ॥ तपादि साधनें केलीं लोकेषणा । व्यर्थ मूर्खें शिणा आदरिलें ॥२॥ प्रेतास भूषणें लग्न नपुंसका । विध्वंस नेटका शृंगार तो ॥ ३ ॥ ' असत ' ते असाधु जीत अथवा मेले । तुकया मुकले इहपरां ॥ ४ ॥

६४१. [२३४]ऐसा गीता गर्भ सत्रावा प्रसंग । झाला येथें सांग हरिकृपें ॥१॥ ज्यांत गुणभाग शेवटीं अध्यात्म । बोलला भक्तात्मा पार्थिवांसी ॥२॥ आतां कळसाध्याय बोले परिणामी । योगियां विश्रामी घडे तुकीं ॥ ३ ॥

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे श्रद्धात्रयविभागयोगो नाम सप्तदशोऽध्यायः ॥ ८ ॥

इति श्रीभगवद्गीता देवव्रतपर्वे श्रीकृष्णार्जुनसंवादे
तुकया विरचिते त्रिगुणश्रद्धावर्णनेनाम सप्तदशोध्यायः[४६]

## ।। अथाष्टादशोऽध्यायः ।।

## — मोक्षसंन्यासयोग —

### श्री भगवद्गीता अष्टादशप्रसंग अभंगात्मक[४६]

६४२. [१८०]अहो ऐकियेले बोल । आला पार्था अंगीं डोल ।। १ ।। आतां शेवटीं अठरावा । जाणून पुसे वासुदेवा ।। २ ।। येथून गीतादेवी पुजा । झाली वाचाविद् बोजा ।। ३ ।। तुकयास महा आनंद । सांगे श्रोतयां गोविंद ।। ४ ।।

**अर्जुन उवाच ।**

**संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।**
**त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ।। १ ।।**

६४३. विनविला विनय भावें । प्राण गोपींचा गौरवें ।। १ ।। म्हणे अर्जुन संन्यास । महाबाहो नेदी त्रास ।। २ ।। अहो तत्त्व तें स्मरतें । जाणें अज अव्ययातें ।। ३ ।। त्यागाचेंही हृषीकेशा । केवीं न बोलसी कैसा ।। ४ ।। माझ्यावरून तुकयाचें । देह जंतू उद्धरायाचें ।। ५ ।।

**श्रीभगवानुवाच ।**

**काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।**
**सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ।। २ ।।**

६४४. काम्य कर्मांचा ज्ञानी तो । विनियोग मनीं घेतो ।। १ ।। त्याग संन्यास जाणती । शुद्ध आहे ज्यांची मती ।। २ ।। फळत्याग सर्व कर्म । एका सांपडलें वर्म ।। ३ ।। ईश्वरार्पण जो त्याग । जाणे तुका सार भाग ।। ४ ।।

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपः कर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

६४५. परि कर्म जें दोषाचें । हृदय भेदी जाण त्याचें ॥ १ ॥ एक बोलती टाकावें । येणें बंधना अल्पवे ॥ २ ॥ नव्हे टाकूंही बोलती । कोणी समूळ त्यागिती ॥ ३ ॥ तप क्रिया यज्ञ दान । आहे तुकया स्वाधीन ॥ ४ ॥

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

६४६. माझा निश्चय ऐक । तुज न सांगूं मायीक ॥ १ ॥ त्यागीं तूंच भरतर्षभा । वाक्य जाणून प्रारंभा ॥ २ ॥ पुरुषव्याघ्रा ह्या त्याग । जो मी जाणें यथासांग ॥३॥ बोल्ला हे जो त्रिविध । वर्णी तुका पूर्ण बोध ॥४॥

यज्ञदानतपः कर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

६४७. नये सांडूं तीं करावीं । जीं कां कर्मे माझ्या जीवीं ॥ १ ॥ यज्ञ दान तप क्रिया । हीं तों जडासी ताराया ॥ २ ॥ पावनेंही बुद्धिमंतीं । मार्ग दावणें लोकांतीं ॥ ३ ॥ यज्ञदानक्रियातपें । गेलीं तुकयाचीं पापें ॥ ४ ॥

एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

६४८. हेंही मीपण त्यागून । प्रपंचासही वंचून ॥ १ ॥ फलत्याग मदर्पणें । सुख मुक्तीचें भोगणें ॥ २ ॥ करून माझें करणें । जया दासाचें पाहाणें ॥ ३ ॥ उत्तम मत हें निश्चयें । तुका विवेकधामीं ये ॥ ४ ॥

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

६४९. नित्य कर्माच्या स्वरूपें । जो कां अनित्य आरोपे ॥ १ ॥ त्याग शास्त्रें घडेच ना । पाहे अज्ञान कल्पना ॥ २ ॥ अविवेकें करी त्याग । मूर्ख सहज म्हणे जग ॥ ३ ॥ बोलिजे तो त्याग येथें । तम तुकया आपंथें ॥ ४ ॥

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

६५०. कष्ट मानून हें कर्म । नोहे लोकीं पाळी शर्म ॥ १ ॥ देहक्लेश-भय त्यजी । जीवें जीवितास यजी ॥ २ ॥ केल्या राजस या त्यागा । काय फळ लाभ अंगा ॥ ३ ॥ तुका म्हणे जी चतुरीं । ध्यावें सत्त्वास पदरीं ॥४॥

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

६५१. नित्य विहितें जाणूनी । न सांडी तो ब्रह्मज्ञानी ॥ १ ॥ करी टाकून मीपण । परि नेणें भाग शीण ॥ २ ॥ कृष्णार्पण ययाला गा । फल-त्यागें महाभागा ॥ ३ ॥ त्याग सात्विक बोलणें । तुका सांगे लाभ घेणें ॥ ४ ॥

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।
त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

६५२. निंदी ना प्रवृत्तीचें । बंधन मनीं कर्माचें ॥ १ ॥ नव्हे आसक्त निवृत्तीं । सदा सावधान मती ॥ २ ॥ बरा युक्त सत्त्वें त्यागी । बुद्धि रंगली निज रंगीं ॥ ३ ॥ छिन्न संशय चांगला । सत्त्वगुणें तुका झाला ॥ ४ ॥

न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

६५३. ऐक विचक्षणवंता । देहधारी जीवजंता ॥ १ ॥ कर्मत्याग हा घडे ना । घडल्या दाखवी पतना ॥ २ ॥ कर्में अर्पूनियां ब्रह्मीं । आपण वागतो निष्कर्मी ॥३॥ त्यागी तो एक बोलिजे । मज भासे तुका साजे ॥४॥

अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

६५४. संन्यास त्याग पूर्वीं । जो कां बोललों अपूर्वी ॥ १ ॥ नसे ज्यास कीं धारणा । फळें तयांसी सुजाणा ॥ २ ॥ बरें वाईट कीं मिश्रें । कर्म-फळेंही अव्यग्रें ॥३॥ तुका म्हणे कदाचित । नव्हे संन्यासी हा लिप्त ॥४॥

**पञ्चैतानि महाबाहो कारणानि निबोध मे ।**
**सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥**

६५५. आतां हीच निःसंगता । तुज सांगूं पंडूसुता ॥१॥ पांच कारणें कर्माचीं । युक्ति बुझे सव्यसाची ॥ २ ॥ सांख्य वेदांती बोलले । बरें पाहिजे ऐकिलें ॥ ३ ॥ आत्मा निःसंग जाणुनी । तुका म्हणे धरा ध्यानीं ॥ ४ ॥

**अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।**
**विविधाश्च पृथक् चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥ १४ ॥**

६५६. अधिष्ठान क्षेत्रकर्ता । जो या देहे संगोपिता[२५१] ॥ १ ॥ मुख्य बाहे अहंकार । घेऊन इंद्रियें सत्वर ॥ २ ॥ चेष्टा प्राणाची या दैवें । ऐसे च्यार हे जाणावे ॥ ३ ॥ तद्भोगप्रद ऐसे । पांच तुका जाणतसे ॥ ४ ॥

**शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।**
**न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥ १५ ॥**

६५७. कायावाचामनेंही जें । निज कर्म आरंभीजे ॥ १ ॥ तो नर तया बाईट या । कर्मबंधन पांचीं तया ॥ २ ॥ हेंच कारण मुख्यत्वें । रक्षी संतत हीं सत्त्वें ॥ ३ ॥ तुका म्हणे आन एक । बोलियला यदुनायक ॥ ४ ॥

**तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।**
**पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥**

६५८. ऐसें असून इहीं रे । कर्ता महा चमत्कारे ॥ १ ॥ आत्मयास जो केवळा । मनीं विचार ना स्थळा ॥ २ ॥ नसे बुद्धिचाही शोध । तेथें कैंचा शास्त्रबोध ॥३॥ अध म्हणावें तयासी । नेणें जो कां तुकयासी ॥४॥

**यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।**
**हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७ ॥**

६५९. अहो मीच सर्व कर्ता । नेणें वार्ता जन्मांत ॥ १ ॥ केल्या कर्मी घ्यावें फळ । बुद्धि केवळ शिरेना ॥ २ ॥ मग त्याच निःसंशया । हातें लया जग पावे ॥ ३ ॥ कधीं[२५२] बद्धता न वचे । तुकया त्याचें नवल ॥४॥

---

२५१. ‘ संगोपिता ’ ऐवजीं ‘ संगा पार्था ’—पाठ प्र. १.
२५२. ‘कधीं’ ऐवजीं ‘वधीं’—पाठ प्र. ३ व ‘विद्धि’—पाठ प्र. १ व ५.

**ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।**
**करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥**

६६०. साधुलागीं साधन तें। कर्मा न तें करून ॥ १ ॥ परि त्रिविध त्या भेद। तुज संवाद जाणवूं ॥ २ ॥ कर्म करण हा कर्ता। हेच वार्ता भेदाची ॥ ३ ॥ कर्मसंग्रहही त्रिधा। तुका सिद्धि निरोपी ॥ ४ ॥

**ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।**
**प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥**

६६१. ज्ञान कर्म कर्ता हे गा। आले भोगा हे भेद ॥ १ ॥ सत्त्व रज तम तिन्ही। या प्रमाणीं ओळखे ॥ २ ॥ सांख्यशास्त्रमतें सांगूं। मग पांगूं नको तूं ॥ ३ ॥ ऐके यथाविधि राया। तुका अद्वयाचा संगी ॥ ४ ॥

**सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।**
**अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥**

६६२. सर्वा भूतीं देव एक। हा विवेक जागृत ॥ १ ॥ भाव अव्यय पाहाणें। भिन्नपणें चळेना ॥ २ ॥ नाशिवंतीं अविनाश। नलगे पाश यमाचा ॥ ३ ॥ ऐसें पाहे हें सात्त्विक। ज्ञान एक तुकयाचें ॥ ४ ॥

**पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान् पृथग्विधान् ।**
**वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥**

६६३. पृथक् भावें पाहे जागा। द्विज मांगा निवडी ॥ १ ॥ जीव भासे नेणें शिवा। नांवानांवा क्षणीक ॥ २ ॥ काळें गोरें लोह हेम। हंसोत्तम कावळा ॥ ३ ॥ देखे राजस ज्ञान तें। जें तुकयातें नेणें गा ॥४॥

**यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।**
**अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥**

६६४. सर्व कारणीं ती गती। अधम ती पाऊली ॥ १ ॥ स्वात्मकार्यावांचूनियां। नेणे जाया कीं नर ॥ २ ॥ नसे तत्त्वीं अशाश्वती। जे पाहाती अयुक्त ॥ ३ ॥ क्षुद्र ज्ञानें गर्व पोसे। तुका नसे तामस ॥ ४ ॥

**नियतं सङ्गरहितमरागद्वेषतः कृतम् ।**
**अफलप्रेप्सुना कर्म यत्तत् सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥**

६६५. नीतिपंथींचा निःसंग । केला त्याग अहंते ॥ १ ॥ प्रियाप्रिय नेणें जो कां । गुरुनायका चिंतनीं ॥ २ ॥ रोज कर्मांत निराशा । प्रेमपाशा सांपडला ॥ ३ ॥ कर्म सत्त्वाचें तें झालें । ज्यांत डोले तुकया ॥ ४ ॥

**यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।**
**क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥**

६६६. स्कंधीं घेतला मीपणें । आन शाहाणे न लेखी ॥ १ ॥ काम आशा पुरवावी । हीच ओंवी धुंडाळी ॥ २ ॥ अति सायासें विषय । कीं प्रळय ज्या संगीं ॥ ३ ॥ केलें कर्म तें राजस । तुका ज्यास न पाहे ॥ ४ ॥

**अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।**
**मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥**

६६७. मायाबंधू जयांमाजी । कीं घात जी पराचा ॥ १ ॥ लय पावे स्वात्मजीव । ऐसी हांव बोखटी ॥ २ ॥ करितो दंभ लोकीं । धर्मादिकीं नांदे ना[253] ॥ ३ ॥ छंद तामस कर्म तें । तुकयातें माने ना ॥ ४ ॥

**मुक्तसङ्गोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।**
**सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥**

६६८. फळाशा न अभिमान । परि मान उत्सवी ॥ १ ॥ धृति जयाची ते नेटकी । ना चेटकी कल्पना ॥ २ ॥ झाले गेले निःसंशय । न शिरे पाय बासनें ॥ ३ ॥ कर्ता सत्त्वगुणीं खरा । ये उत्तरा तुकयाच्या ॥ ४ ॥

**रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।**
**हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परिकीर्तितः ॥ २७ ॥**

६६९. कर्मी फळाशा गुंडाळा । जो कां माळापाळक ॥ १ ॥ कृपण मलीन जी वृत्ति । जीवघाती सर्वदा ॥ २ ॥ हरिखें सवेंच सोस वाहे । क्षण पाहे विंचबू[254] ॥ ३ ॥ ऐसा राजस हा कर्ता । तुका परता निवेदी ॥ ४ ॥

---

२५३. ' नांदेना ' ऐवजीं ' नादान '—पाठ प्र. १.
२५४. ' विंचबू ' ऐवजीं ' विवचू '—पाठ प्र. १.

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

६७०. आतां युक्त नसे जया। पापी काया कुटील ॥ १ ॥ शठ आळसी कपटिया। म्हणूं तया तामस ॥ २ ॥ द्वेषी दीर्घसूत्री पुरा। हा कर्तारा तमच ॥ ३ ॥ तुका म्हणे सत्यवंत। हरि सांगत पुढारा ॥ ४ ॥

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।
प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥

६७१. बुद्धिधारणेचे पार्था। गुण सर्वथा ऐक रे ॥ १ ॥ भेद त्रिविध बोलले। आम्हीं ठेविले जे पोटीं ॥ २ ॥ तेच तुज सर्व आज। सांगों गूज गौप्यही ॥ ३ ॥ पृथकाकारें धनंजया। जें तुकया सांगेल ॥ ४ ॥

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥

६७२. जाणें प्रवृत्ति निवृत्ति। चोख मती विचार ॥ १ ॥ कार्याकार्य भयाभय। हा अन्वय घेतला ॥ २ ॥ बंधमोक्षाची ओळख। झालें सुख मग त्या ॥ ३ ॥ निर्भय बुद्धि ते सात्विकी। तुकया लोकीं पावन ॥ ४ ॥

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
अयथावत् प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

६७३. यया धर्म अधर्मास। जें मानस जागृत ॥ १ ॥ कार्याकार्य तयापरी। निजांतरीं ओळखे ॥ २ ॥ जाणें सर्व नेणें एक। जो व्यापक चिदात्मा ॥ ३ ॥ राजस ती बुद्धि जाण। नव्हे प्राण तुकयाचा ॥ ४ ॥

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा पार्थ तामसी ॥ ३२ ॥

६७४. आतां अधर्मातें धर्म। नेणें कर्म दुरात्मा ॥ १ ॥ वागे विपरीत अर्थीं। तो परमार्थी पाही ना ॥ २ ॥ अविद्या व्याली गुंडे।

विख चढे गर्वाचें ॥ ३ ॥ वेदशास्त्र निंदी ज्यास । ते तामस गा बुद्धि ॥ ४ ॥ आतां ऐका सत्त्वगुण । उण खुण तुकयाची ॥ ५ ॥

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

६७५. आतां त्रिगुण ते धृती । सांगों स्पष्ट तुजप्रती । प्रथम सत्त्वाची जे रीती । श्रवण करी भूमीपा ॥ १ ॥ ज्या कां धरीजे धारणें । अव्यग्रता निश्चळपणें । मनप्राणेंद्रियाचरणें । विश्वंभरीं जें मिळे ॥ २ ॥ तेथें अविद्या राहिली । जैसी मंथरा दुर्बोली । रामें नाहीं उद्धरिली । ऐसी परी अलिप्त ॥ ३ ॥ तुका विनवी साधूंस । सत्त्वधृति हे देवास । आवडली अर्जुनास । सांगे प्रेम आदरें [२५५] ॥ ४ ॥

यया तु धर्मकामार्थान् धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥

६७६. येऊनियां देहगांवा । स्वर्ग संसार दोसवा [२५६] । नांदे आनंद या जीवा । त्रि-उपायें करून ॥ १ ॥ मनोरथाचिया ठायीं । धर्म अर्थ काम भावी । तेणें धैर्यबळें पाही । क्रिया करी उदीम ॥ २ ॥ वासना जी इच्छूं जाय । लाभ चौगुणीं तो होय । प्रसंगें न लाहे साह्य । धृति जाण[२५७] झालिया ॥ ३ ॥ कृष्ण सांगत अर्जुना । ऐक बापा विचक्षणा । तुका म्हणे जाणा । हे धारणा राजसी [२५८]॥ ४ ॥

२५५. ' प्रेम आदरें ' ऐवजीं ' प्रेमें सर्वदा '—पाठ प्र. १.

२५६. = उपभोगण्यास; दोहनार्थं.

२५७. या अभंगा ऐवजीं प्रत १ व ३ मधें पुढील अभंग आहेः—

६७६. अ. धर्मामाजी वृत्ति कशी । धन कामाच्या असोशीं । कर्म आचरे दिवानिशीं । लोभ धरून फळाचा ॥ १ ॥ आतां तमाची ही ऐका । जेणें फिटेल आशंका । संजय म्हणे कुरुनायका । सांडी, हा तामसाचार ॥ २ ॥ जैसी वासना पुरेल । तैसा सिद्ध मानी बोल । तुका म्हणे ही तो फोल । धृति दिसे राजसी ॥ ३ ॥

२५८. 'जाण' ऐवजीं 'साह्य'—पाठ प्र. ७.

**यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।**
**न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥**

६७७. जिर्णे निद्रा अखंडित । स्वप्न बोधाचा पंडित । सदा भयानें दंडित । तरी न सोडी विषाद ॥ १ ॥ मदादिकांस न त्यजी । पार्था मस्त तमामाजी । त्यास दुर्बुद्धि ते राजी । माळ घाली घातकी ॥ २ ॥ ते गा धारणा तामसी । सत्य सांगों तुजपासी । जें कां नावडे तुकयासी । देह क्षेत्रामाझारीं ॥ ३ ॥

**सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।**
**अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ ३६ ॥**

६७८. आतां ह्याच्या वांटणीला । आलें त्रिविध सुखाला । ऐकावें कीं तूं दादला । होसी विरक्तिवधूस ॥ १ ॥ लागे योगियांचें चित्त । यया ध्यासें दुःखातीत । वृत्ति होईल निभ्रांत । पंचाक्षरी विवसिये ॥ २ ॥ नाश झाल्या कृत क्लेशा । सुख अक्षय नरेशा । तुका म्हणे जैसी दशा । येतां नुरे[२५९] दरिद्र ॥ ३ ॥

**यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।**
**तत् सुखं सात्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥**

६७९. कटु प्रथम औषधी । पुढें हरी महा व्याधी । किंवा कष्ट पाकामधीं । दे मग सुख तृप्तीचें ॥ १ ॥ तैसे विखवत भासे । सेखीं अमृत होतसे । चित्तबुद्धिच्या उल्हासे । प्राणी पावे प्रसाद ॥ २ ॥ हें गा सात्विकाचें सुख । आम्ही सांगू प्रसन्न मुख । आतां कांहीं तैसे तिख । तुका वर्णी रजातें ॥ ३ ॥

**विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।**
**परिणामे विषमिव तत् सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥**

६८०. विषयइंद्रियीं मिळणी । होती सुखा ओळगणी । तेथें हरिखा

२५९. ' नुरे ' ऐवजीं ' पळे '—पाठ प्र. १ व ३.

लोळणीं । घालूं वाटे सर्वदा ॥ १ ॥ मग काय तें अमृत । शिळें म्हणून विटे चित्त । आतां शेवटीं अहित । मैथुन जेवीं शुनीचें ॥ २ ॥ ऋणावरी लग्नारंभ । पुढें विघ्नांचा प्रारंभ । व्याघ्र सौजन्याचा लाभ । घेनु पावे शेवटीं[२६०] ॥ ३ ॥ धन धणी चोर होती । परि रक्षक तोडिती । तुक्याचे नलगे मती । सुख तें गा राजस ॥ ४ ॥

यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

६८१. आरंभींच घाला पडे । फळप्राप्तीवेळे रडे । कोल्हाटिये ज्या परवडे । करिती उपजीविका ॥ १ ॥ मारा भेणें[२६१] परग्रहीं । प्रमदा राहे दुराग्रही । तेथें तेच ते विदेही । जे कां उठती उमाळे ॥ २ ॥ आतां मद्य प्राशिलिया । घाणें सुख स्मृति लया । जाय तेथें निजलियां । वाटे गेला स्वर्गासी ॥ ३ ॥ आळसें होय वपु जड । सुख तामस निवाड । तुका म्हणे ज्याणें द्वाड । तें सात्विक ऐकावें ॥ ४ ॥

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात् त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

६८२. न ते पृथ्वीमाजी पाहो । स्वर्गीं जयाचा संदेहो । तेथें सिद्ध गुणसमूहो । सत्त्वाहीन बापुडें ॥ १ ॥ अमरगणीं जें मिळे ना । पाहातां इंद्रानें स्वनयना । मज भासतें अर्जुना । या त्रिगुणा नातळे ॥ २ ॥ माझा जीव तें गा सत्व । तेथें सुखावला शिव । केला खाणीचा उद्भव । परि सत्त्व न टळे ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐका वचन । काय बोलला भगवान । तेथें देऊ-नियां मन । वर्णधर्म अवधारा ॥ ४ ॥

---

२६०. या चरणांतील पादांचा क्रम प्रत १ व ६ यांत १, ३, २ व ४ असून 'ऋणावरी' ऐवजीं ' कर्जावरी ' असा पाठ आहे.

२६१. ' भेणें ' ऐवजीं ' भयें '—पाठ प्र. १.

**ब्राह्मणक्षत्त्रियविशां शूद्राणां च परंतप ।**
**कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ।। ४१ ।।**

**६८३.** विप्रें बाहुजां वैश्यांला । शूद्र शूद्रतर्मी ज्याला । किंवा पृथक ययाला । पूर्वी असे स्थापिली ।। १ ।। अधिष्ठान स्वभावें जें । झालें त्रिगुण सहजें । तया गुणी मनीं राजे । व्याख्या बहु वाणिली ।। २ ।। तेच येथेंही प्रसंगीं । कथी अर्जुना सारंगी । तुका सर्व जनांलागीं । निर्मिलासे वदाया ।। ३ ।।

**शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।**
**ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ।। ४२ ।।**

**६८४.** तप प्रथम विप्राचा । गुणदायक मोक्षाचा । क्षमेविण नाश त्याचा । होतां पळ न लगे ।। १ ।। शम दम कशास्तव । घ्यावा इंद्रियांचा जीव । शौच तैसाच स्वभाव । आस्तिकाचा पाहिजे ।। २ ।। नव्हे भूतांसी वाकुडा । ज्ञानें नव्हे विषयीं वेडा । वक्ता विज्ञान पवाडा । सांगे जगतारणी[२६२] ।। ३ ।। सांगे पार्था पुरुषोत्तम । क्रिया ब्राह्मण प्रथम[२६२] । पुढें क्षत्रियांचे नेम । तुका वर्णी स्वानंदें ।। ४ ।।

**शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च क्षात्त्रकर्म स्वभावजम् ।। ४३ ।।**

**६८५.** शौर्य तरी रणधीट । तेजें शस्त्रांची तिखट । परि धारणा चोखट । जाणें न्याय-अन्याया ।। १ ।। दक्ष जैसा दक्षापरी । युद्धीं पळविणें वैरी । दाता जेवीं धरेवरी । पुण्यश्लोक जगासी ।। २ ।। सेवा महंताची जाणे । तद्वत् मन देवा अर्पणें । ही गा नव्हती लक्षणें । जगदोद्धार गुरु तो ।। ३ ।। राज्या अंतीं नरक तया । बोलणार पावे क्षया । सुख साम्राज्य आलेया । आलें तुकीं एकत्वें ।। ४ ।।

---

२६२. हे पाद प्रत ४ व ६ त गळले आहेत.

**कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।**
**परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥**

६८६. उदरार्थ कुटुंबार्थ ! करी कृषिवळी स्वार्थ । परि तयांत परमार्थ । जें रक्षण गाईचें ॥ १ ॥ द्रव्य व्यवसाय तेवीं । वाणिज्यांत उठाठेवी । वैश्यकर्म तृतीय भावीं । तूं ओळखे सुजाण ॥ २ ॥ आतां शूद्र जो कां असे । वर्णत्रय सेवा वसे । त्याचें जीवन जाण ऐसें । चार वर्णीं ह्या क्रिया ॥ ३ ॥ सांगावया हें कारण । क्षत्रिवंशी तूं निर्माण । झाल्या सुटेल कैसें रण । तुकया जैसा संसार ॥ ४ ॥

**स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।**
**स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥**

६८७. आपुलालें कर्माचारें । वर्णाश्रम या आधारें । जें कां स्वहित उपचारें । आपले अशी वांटणी ॥ १ ॥ न करितां प्रयत्न कांहीं । सिद्धि बोळे त्याच्या गेहीं । नवल होय लोकीं तीहीं । नर हा म्हणती पुण्यात्मा ॥ २ ॥ स्पष्ट सांगतो वीरेशा । आकर्णी तूं गूडाकेशा । साहित्येसी प्राप्त दशा । प्राण्या प्रगटे भूलोकीं ॥ ३ ॥ जरी सांडिला स्वधर्म । मग अवघें वृथा कर्म । न सांपडे सौख्यधर्म । तुका म्हणे सांगीजे ॥ ४ ॥

**यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।**
**स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥**

६८८. भूत प्रवृत्ति जेथुनी । होती उत्पन्न मेदिनी । स्थितीपालक निदानीं । प्रळय दावी रुसल्या ॥ १ ॥ जगा व्यापिलेंसे जेणें । जो विश्वात्मा येणें गुणें । त्यास स्वधर्म आचरणें । तोषवावें संतत ॥ २ ॥ त्याचें सोळा प्रकाराचें । कर्मच एवंविध वाचें । पूजन घडे माधवाचें । नित्य नूतन आवडी ॥ ३ ॥ त्याचा सहज उतरायी । आशिर्वाद ये ते ठायीं । मनोरथ पुरे पायीं । घाली तुका मुरकुंडी ॥ ४ ॥

**श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात् स्वनुष्ठितात् ।**
**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥**

६८९. नीच न मानी स्वधर्म । आलें भाग प्राप्त कर्म । ज्ञान झालें तरी श्रम । स्वयातीचा न मानिजे ॥ १ ॥ बाळा मायच पाहिजे । तेथें ऊर्वशी ना सुजे । मीन जळाविण मरिजे । मधुघटाभीतरीं ॥ २ ॥ यवन करीं वेदपत्र । यतिहातीं आलें शस्त्र । व्यर्थ तेवीं शोभे वक्त्र । स्वात्मधर्मे आचरणें ॥ ३ ॥ बोलसी तूं गोत्रवधी । हत्या घडते संमंधी । तव कर्मे पाप वधी । येसी शुद्धी तुकयाचे ॥ ४ ॥

**सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।**
**सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥**

६९०. वर्णविभागांत सुकृत दुष्कृत । पुढें जन्म होत त्याच्या लेखें ॥ १ ॥ तेथें गुणी खरे अवगुणी विखरे । वेष्टिलासे धुरें जैसा अग्नि ॥ २ ॥ यास्तव वोखटें मानीजे गोमटें । चैत्रीं कडुवटें निंब जेवीं ॥ ३ ॥ कुश्चळ भ्रतारीं मन ठेवी नारी । पावेल संसारी [२६३] तुका म्हणे ॥ ४ ॥

**असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।**
**नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥**

६९१. निष्काम जें मन मुक्तीचें भूवन । त्या कर जोडून सिद्धि नमी ॥ १ ॥ पावतो संन्यासें प्रपंच उदासें । मानस उल्हासें हरिपदीं ॥ २ ॥ कर्मी नव्हे लिप्त बुद्धि जित चित्त । झाला स्पृहागत आत्मबोधें ॥ ३ ॥ तुका म्हणे जन्म सार्थक उत्तम । तयामाजी प्रेम अनंताचें [२६४] ॥ ४ ॥

**सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।**
**समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥**

६९२. देत गुरुकृपा लाभ झाला सोपा । पावला निरोपा सिद्धिचिया ॥ १ ॥ कैसा ब्रह्म पावे सिद्धि ज्या स्वभावें । बोवाळिती नांवें चिन्मयाच्या

---

२६३. ' पावेल संसारी ' ऐवजीं ' पावे सिद्धि सारी '—पाठ प्र. १.
२६४. ' अनंताचें ' ऐवजीं ' आनंदाचें '—पाठ प्र. ४ व ६.

॥२॥ ती स्थिति निश्चयें संक्षेपें अन्वयें । ऐकें आणि होये तूंही तैसा ॥ ३ ॥
ज्ञाननिष्ठावंत परात्परीं चित्त । योगीया अतीत तुका झाला ॥ ४ ॥

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।
शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥

६९३. चित्त जें निष्काम भजे आत्माराम । तोच घाली नेम [२६५]कर्मासीरे ॥ १ ॥ धरून धरणें योगाच्या विंदाणें* । जगीं विचरणें निरंकुश ॥ २ ॥ शब्दस्पर्शादिक विषय दशक । त्यागी नपूंसक जारीण ती ॥ ३ ॥ प्राप्तीचे हरिख अप्राप्तीचे तीख । तुका शिववीख प्राशित जा ॥ ४ ॥

विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।
ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥

६९४. नावडे लौकीक संग प्रापंचीक । आहार रसीक भरे पोटा ॥१॥ मनो वाचे काये नेमीत निग्रहें । न पीडी आग्रहें शिष्यवर्गी ॥ २ ॥ तिष्ठे सदा मन योगाचें आसन । सोडूं नये ध्यान ईश्वराचें ॥ ३ ॥ धरी बळकट वितराग दारवंटा । तुका म्हणे तोटा नफा नेणें ॥ ४ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

६९५. तनुबळा नेणें गर्वास टाळणें । अहं चळवणें ठिकाणींच ॥ १ ॥ कामा भंगीं तसा क्रोध केला पिसा । धाडी दिशा वासा परिग्रह ॥ २ ॥ मेली जेथें ममता अन्नान्न करितां । शांतीची दुहिता वाढविली ॥ ३ ॥ ते ब्रह्मजीवां या भावे अर्पूनियां । झाला उतराई या तुकयाचा ॥ ४ ॥

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥

६९६. सुप्रसन्न आत्मा त्याचा वीरोत्तमा । झाला जेव्हां ब्रह्मा संगमांत ॥ १ ॥ मग त्या परती इच्छा ती केऊती । शोक तरी हंती धरी कैसी

---

२६५. ‘ कर्मासी रे ’ ऐवजीं ‘ कर्णा सारे ’—पाठ प्र. ४ व ६.
*विंदाणें = युक्तीनें, लीलेनें.

॥२॥ जेथें तेथें माझी भक्ति गंगेमाजी । सर्व भूतें आजी शुद्ध झालीं ॥३॥ समान सर्वांत शांति हेलावत । तुका म्हणे मात हरपली ॥ ४ ॥

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥ ५५ ॥

६९७. ती गा सर्वात्मता भक्तीचा जाणता । झाला सप्रेमता देहभावें ॥ १ ॥ अनंत ब्रह्मांडें अनंतींच घडे । अनंता सौंगडे केले जीवा ॥ २ ॥ तत्त्वीं प्रवेशला प्रांतांचे वेळेला । जया लेशें आला तेथें गुप्त ॥ पुन्हां मग निघणें प्राणांतींही नेणें । ऐसी स्थिती बाणे तुकयासी ॥ ४ ॥

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

६९८. कर्म घडतें सारें संचित आधारें । जाणतां विचारें यथायोग्य ॥ १ ॥ मग तेच कर्मा मातें वीरोत्तमा । अर्पितो सप्रेमा मदाश्रित ॥ २ ॥ माझिया प्रसादें तो पावे स्वानंदें । अव्यय जीं पदें अनुच्छिष्टें ॥ ३ ॥ शाश्वतपणाची गति नेणें विरंची । तेथें तुकयाचें येणीं जाणीं ॥ ४ ॥

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

६९९. सर्व कर्मे पार्था अर्पून सर्वथा । ऐके माझी कथा अखंडीत ॥१॥ मत्पर मनानें करी हरि ध्यानें । डोले स्वानंदानें निर्विकल्प ॥ २ ॥ ज्ञानाचा अथवा योगाचा पांडवा । आश्रय राखावा मन पक्षीं ॥ ३ ॥ तूंच ऐसा होय मद्रूपीं संशय । नाहीं आण वाहे तुका जेथें ॥ ४ ॥

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥ ५८ ॥

७००. मच्चित्तें करून मद्रार्थ पावून । होय समाधान मत्प्रसादें ॥ १ ॥ दुःखगिरी जळे न वंचता पळे । सर्वही मावळे क्लेशकांटा ॥ २ ॥ आतां अहंकारें जरी या नीति रे । नायकसी बा रे घात तुझा ॥ ३ ॥ मद्वाक्यें तरला बहु लोक बुडाला । जें नाहीं तुक्याला केलें मान्य ॥ ४ ॥

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

७०१. अहंपणें म्हणसी न भांडे मी यांसी । यास्तव इेळसी आमुचें मत ॥ १ ॥ कौरवा मारणें पापी व्हावें कोणें । दिसे लाजिरवाणें जिणें पुढें ॥ २ ॥ हें मिथ्या कल्पित तनुस्वभावांत । सहज होईल घात कौरवांचा ॥ ३ ॥ प्रकृति क्षत्रियाची अनिवार साची । तुका म्हणे अरिची पुरवीन पाठ ॥ ४ ॥

स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

७०२. कर्म प्रादुर्भाव संस्कार त्यापरी । वागे धरेवरी भूतजात ॥ १ ॥ प्रारब्धें बांधलें तें कैसें सुटेल । जरी कां दाटेल ऊर मोहें ॥ २ ॥ न इच्छिसी स्नेहें अगत्य करिसी । तूंच क्रोधी होसी काळासम ॥ ३ ॥ तुका म्हणे देह स्वभाव कवणा । नावरे हे जाणा विधीलेख ॥ ४ ॥

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन् सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

७०३. सकळ भूतांच्या हृदयीं देव आहे । अनुभव पाहे वीरोत्तमा ॥ १ ॥ त्यास मान्य झालें तारील तें कर्म । अमान्य अकर्म सहजचि ॥ २ ॥ जो कां बुद्धिसूत्रें कळा वेळ यंत्रें । नाचवी सर्वत्रें बाहुलिया ॥ ३ ॥ एकासी पळवी पाठी लावी एका । हरपवी तुका पळमात्रें ॥ ४ ॥

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात् परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

७०४. त्यातें शरण जावें कायावाचामनें । व्हावें गा अनन्ये अनन्यांनीं ॥ १ ॥ भाव भक्ति बोध राहे चिरंतन । ऐसे घे मागून प्रसादास ॥ २ ॥ त्याच्या आशिर्वादें शांति प्राप्त होय । जें पद आलय शाश्वताचें ॥ ३ ॥ ऐसा लाभ जाणा न सोडी अर्जुना । तुका जैसा मना समर्पिता ॥ ४ ॥

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ।। ६३ ।।

७०५. ऐसें हें गुह्याचें अंतर जें गुप्त । कधीं प्रगटीत झालें नव्हतें ।। १ ।। ऐसा श्रोता कोणी नव्हता मिळाला । जो प्रेमें आथिला* परिपूर्ण ।। २ ।। तुज ज्ञान श्रेष्ठ उपदेशिलें आम्हीं । पाहे अंतर्यामीं अशेष जें ।। ३ ।। यावरी मानेल तें करी वीरेशा । तुकयाची आशा पूर्ण येणें ।। ४ ।।

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ।। ६४ ।।

७०६. सर्व गुह्यांमाजी गुह्य हें किरिटी । हें नव्हे चावटी बाजारी गा ।। १ ।। आतां ऐके शब्द हा जो शेवटींचा । कां कीं सद्बुद्धीचा घडीव तूं ।। २ ।। मित्र माझा आणि म्हणविसी दास । वास्तव हितास सांगतसों ।।३।। तुका विनयत्वें प्रार्थी साधुजनां । काय त्या अर्जुना बोले देव ।। ४ ।।

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।। ६५ ।।

७०७. मद्रूपीं सतत राया मना लावीं । प्रद्भक्ती करावी दृढ व्रतें ।। १ ।। यजन माझेंची वंदावें मातेंची । मग स्वरूपाची पडे ग्रंथी ।। २ ।। मीच तूं तूं मीच ऐसें होईल गा । शिवांतरीं जागा जेवीं विष्णु ।। ३ ।। विष्णु हृदयीं पहुडे शिव परमात्मा । प्रतिज्ञा प्रतिमा तुकीं येतो ।। ४ ।।

सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ।। ६६ ।।

७०८. सर्व धर्मांप्रती त्यागून सखया । शरण माझे ठायां तुवां यावें ।। १ ।। एक मी प्रसन्न होई ना जोंवरी । धर्माचें आदरी तंव मानी ।। २ ।। तेथें धर्मी वागे मत्कृपा ना ज्यास । सहज पतनास अधिकार ।। ३ ।। संचितें क्रियमाणें पापासी हरीन । भया ये त्यागून तुका म्हणे ।। ४ ।।

---

* अथिला = आश्रय केलेला.

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

७०९. अतपी पार्था जो त्यासी आमुची गोष्टी । कदापि किरिटी न च्यावळी ॥ १ ॥ अथवा तपी झाला मज न भजतां । त्याप्रति ही वार्ता सांगूं नये ॥ २ ॥ तपीं भाक्ति खरी श्रवणीं नेदी मन । मग त्या सांगून फळ काय ॥ ३ ॥ किंवा मातें दोष ठेवी जो अर्जुना । तुका म्हणे जाणा नव्हे पात्र ॥ ४ ॥

य इदं परमं गुह्य मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

७१०. भक्तवृंदीं भाक्ति करूनियां मान्य । झाला त्यास धन्य आम्ही म्हणूं ॥ १ ॥ तेथें गुह्य श्रेष्ठ प्रगटून वाणील । तैसाच ऐकेल भावें कोणी ॥ २ ॥ निश्चयें पावन माझ्या ठायीं येती । तुकयासंगती कीर्ति तीच ॥ ३ ॥

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

७११. मानवकोटींत विचारितां नित्य । त्या ऐसा सांप्रत नसे कोणी ॥ १ ॥ त्याचा तो प्रियकर येतुला ओळखे । भानु चक्षु देखे घडेचना ॥ २ ॥ पुढेंही होणार भविष्यें पाहिलीं । परि न पडली लाभा दृष्टी ॥ ३ ॥ त्या लोकीं मत्प्रिय त्याहून दिसेना । तुका विनवी दीना परीसीजे ॥ ४ ॥

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

७१२. नित्य ज्याला नेम उषःकाळीं स्नान । करूनि संध्यापठण करी पाठ ॥ १ ॥ हा धर्मसंवाद मज तुज शब्दीं । अनुवादलें नादीं लागूनियां ॥ २ ॥ तरी ज्ञानयज्ञें मज तेणें यजिलें । कीं भासे पुजीलें

उपचारें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा आवड जे मोठी । तेच कसवटी भक्तांमाजी ॥ ४ ॥

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान् प्राप्नुयात् पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

७१३. हृदयीं जागे ज्याच्या श्रद्धा । जो कां निंदी ना विबुधा ॥ १ ॥ ऐके सदा ठेवून भाव । ऐसा नराचा उपाव ॥ २ ॥ माझें पद पावे अंतीं । निष्पातक वागून क्षिती ॥ ३ ॥ जेथें लोक पुण्यवान । तुकया तेथें अधिष्ठान ॥ ४ ॥

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

७१४. बरी ऐकिली ही गीता । किंवा न मानली चित्ता ॥ १ ॥ पार्था मानस एकाग्र । आहे येथें कीं अव्यग्र ॥ २ ॥ अज्ञान मोह खळ । गेला नाहीं कीं प्रांजळ ॥ ३ ॥ सांग मातें धनंजया । एक वेळ हे तुकया ॥ ४ ॥

७१५. [२६६] तेथें समाधी सहज । बाणलीसे पार्था आज ॥ १ ॥ अष्ट भावें सद्गदीत । प्रेम पुरें वोसंडत ॥ २ ॥ देहावरी आला वीरु । थापटितां जगद्गुरु ॥ ३ ॥ बोले जोडून अंजुळी । कृष्णाप्रति वाक्य मंजुळी ॥ ४ ॥ देवा पुसे मी सांगतों । याच नवला मी भितों ॥ ५ ॥ जेथें द्वैत ना उरलें । तुकया दास्य भरतें आलें ॥ ६ ॥

अर्जुन उवाच ।

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

७१६. ऐके सुरप्रिय कार्या । यादव कुलकमल सूर्या ॥ १ ॥ मोह गेला स्मृति आली । चित्तवृत्ति आनंदली ॥ २ ॥ तुझ्या प्रसादें अच्युता । ज्ञानमात्रेचा देखता ॥ ३ ॥ जीजी झालों एक वेळ । गतसंदेह प्रांजळ ॥ ४ ॥

२६६. फक्त प्र. १ मध्यें आहे.

असे निश्चळ आतां मी । तुझें वाक्य मानीन स्वामी ॥ ५ ॥ निवटीन कौरवाला । निश्चय रक्षीन तुकयाला ॥ ६ ॥

७१७. [२६६]गांधार दुहिता प्राण । रमण अंबिका नंदन ॥ १ ॥ त्यास संजय गजपुरी । वार्ता बोले पुरांतरीं ॥ २ ॥ जैसा भाव अर्जुनाचा । तो अनुभव संजयाचा ॥ ३ ॥ सांगतांच भगवद्गीता । प्राण होय वोसंडिता ॥ ४ ॥ परि तें नेणें राजा कांहीं । अंध सहज रात्र गेही ॥ ५ ॥ म्हणुनियां सावध करी । नृप हृदया उजरीं* ॥ ६ ॥ पाहे भाग्य रे पांडवा । आलें तुकयाच्या दैवा ॥ ७ ॥

संजय उवाच ।

इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।
संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥

७१८. श्रीमद्वासुदेव वाणी । धनुर्धर गांडिवपाणी ॥ १ ॥ संवादलें महा अद्भुत । ऐसे कोण या धरेंत ॥ २ ॥ ऐकिलें हो महा भूपा । दावी अद्यापि तनुकंपा ॥ ३ ॥ रोम हर्षणें फूगतां । तुका घाली दंडवता ॥ ४ ॥

व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतद्गुह्यमहं परम् ।
योगं योगेश्वरात्कृष्णात् साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥

७१९. राया व्यासकृपेस्तव । या योगाचा अनुभव ॥ १ ॥ ऐकियलें गुह्य ज्ञान । सप्रचीत समाधान ॥ २ ॥ योगेश्वर जो कृष्णजी । तेणें श्रीमुखपंकजी ॥ ३ ॥ साक्षात्प्रीतीकरोत्तरें । तुका रिझविला आदरें ॥ ४ ॥

राजन् संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।
केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥

७२०. केशवार्जुन उभयांचा । हा हो संवाद सुखाचा ॥ १ ॥ पुण्यदाता महा अद्भुत । तूंतें वदलों साद्यंत ॥२॥ पुनः पुन्हां आठवुनी । हर्षतों मी आत्ममनीं ॥ ३ ॥ देवासारिखें त्या पुसे । तुका विनवी ऐका कैसें ॥४॥

* उजरी = स्पष्ट केलें, कळूं दिलें.

**तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।**
**विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ।। ७७ ।।**

७२१. तेही स्मरोनी अद्भुत । झाली एकादशीं मात ।। १ ।। पार्था विश्वरूप दावी । पुनः पुन्हां मी आठवीं ।। २ ।। नृपा मानूनी आश्चर्य । वारंवार स्फुरे आर्य ।। ३ ।। सांगे तुजला हें सुख । आलें किंवा प्राप्त दुःख ।। ४ ।। यया संजयाच्या बोला । अंधु मनांत तापला ।। ५ ।। मूर्ख पोर तें व्यासाचें । भलतें बडबडे जें रुचे ।। ६ ।। यासी बरें दटावून । आपुलें घ्यावें विचारून ।। ७ ।। मग बोलला त्या भावें । जैसें ब्रह्मया दशग्रीवें ।। ८ ।। शास्त्राध्ययनीं रामास । वाखाणितां घडके त्रास ।। ९ ।। तैसे म्हणे प्रज्ञाचक्षु । हा राहूं दे कृष्णपक्षु ।। १० ।। खाऊं घालती पांडव । त्यांचा वलगसी गौरव ।। ११ ।। पुरे पुरे ही चावटी । ज्या गा पाणि कक्षुपुटीं ।। १२ ।। एक पुसतों तें सांग । प्रस्तुत युद्धाचा प्रसंग ।। १३ ।। येथें मांडिलें समर । यशश्रीचा कोण वर ।। १४ ।। मज भासे माझे सुत । करिती पांडवांचा घात ।। १५ ।। यावरि तुझें गा ज्योतिष । सांग ऐकूं दे विशेष ।। १६ ।। आमुच्या महा महा धुरा । तिकडे अवघा चाराचुरा ।। १७ ।। धर्मे मिळविलें पिसें । जेवीं प्रेता पैं कोळसे ।। १८ ।। यया धृतराष्ट्रा बोला । चित्तिं संजयो तापला ।। १९ ।। तुका म्हणे त्याच रीतीं । शिक्षी ऐकावें पंडितीं ।। २० ।।

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ।। ७८ ।।**

७२२. बरें ऐकियलें राया । जी शेखी या बोलसी ।। १ ।। आम्ही कोपावें तें वायां । न मना या गुरूच्या ।। २ ।। तव प्रसाद हा लाभ । पद्मनाभ जोडला ।। ३ ।। तुझ्या अवगुणा की रे । नसे धीरे कारण ।। ४ ।। अवगुण जाय ज्याचा । तो देवाचा मोहरा ।। ५ ।। देहस्वभाव कठीण । गेल्या प्राण जाई ना ।। ६ ।। उपदेशें खवळे कैसा । जैसा ससा वाघुरी ।। ७ ।। दीपदीपवाळी गावीं । शुकरा चवि विष्टेची ।। ८ ।। अनुसया

परिसिली । उठे रुसली जारीण ॥ ९ ॥ ज्वाळा नृसिंह मंत्रांत ॥ नाचे भूत स्वच्छंदें ॥ १० ॥ असो ज्याचा त्यास लाभ । तोच क्षोभ इतरां ॥ ११ ॥ तेच सांगूं तुझे प्रश्न । सावधान होईं पां ॥ १२ ॥ येथें हरीनें वर्णिलें । भागा झाले त्रिगुण ॥ १३ ॥ सत्त्व चोख मध्यम रज । तमा आज पतन ॥ १४ ॥ शुद्ध सत्त्व गुणोत्तम । तमाधम वोखटा ॥ १५ ॥ आतां पांडव परिवार । प्रिय सुर सत्त्व ते ॥ १६ ॥ भीष्म द्रोणा परि साह्य । रज होय सबळ तो ॥ १७ ॥ तमोगुणी ते कौरव । मेले जीव जाण तूं ॥ १८ ॥ तमाधम तूं दीससी । कीं निंदसी गीतेला ॥१९॥ शुद्ध सत्त्व तें गा जाण । जें सुजाण गीतेचें ॥ २० ॥ आतां जेथें तो श्रीकृष्णु । योगाजिष्णु योगिया ॥२१॥ तैसा तेथें पार्थवीर । धनुर्धर प्रतापी ॥२२॥ माझ्या मतें तेथें जय । भाग्यालय श्रीनीति ॥ २३ ॥ शाश्वत मती होरा । हा नवरा दीसतो ॥२४॥ शेवटींचें हें उत्तर । दृढोत्तर दे ग्रंथी ॥२५॥ अंध पावक शीतळ । किरण माळ होईल ॥२६॥ मेरू चळेल आसनीं । हनुमानमनी स्त्री रिघे ॥२७॥ न घडावें तें घडेल । परि बोल ना मिथ्या ॥ २८ ॥ ऐसे निष्ठुराचे बोल । लागे खोल शब्द ते ॥ २९ ॥ असो इकडे अर्जुन । सावधान रथेसी ॥ ३० ॥ कपि मनीं हर्षान्वित । तो फोडीत किंकाळी ॥ ३१ ॥ जन्मेजयासी पावन । वैशंपायन बोलला ॥ ३२ ॥ अठरा अध्ये ऐसी गीता । समाप्तता पावली ॥ ३३ ॥ मोक्ष-संन्यास तो येथें । जगन्नाथें वर्णिला ॥ ३४ ॥ झाले अठरा अध्याय । ज्ञानोपाय चोखट ॥ ३५ ॥ श्रीगुरु पांडुरंग दास । पुरवी आस तुकया ॥ ३६ ॥[२६७]

**इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे मोक्षसंन्यासयोगो नामाष्टादशोऽध्यायः ॥ १८ ॥**

**॥ इति श्रीभगवद्गीताशास्त्रं संपूर्णम् ॥**

इति श्री भगवद्गीता अभंगात्मक तुकारामविरचिते अष्टोदशोध्यायः ॥

२६७. फक्त २, ४ व ६ प्रतींत नाहींत.

## भगवद्गीतेची महती

७२३. [२६८]धन्य धन्य देवी गीता। आदिमाया वेदमाता। येथिच्या जो जाणे अर्था। धन्य त्याची मातापिता॥ १॥ एक श्लोक अथवा चरणें। अर्थ अनुभव अंगीं लेणें। मग तया न लागे करणें। साधन काय मोक्षाचें॥ २॥ एका चरणाचा अर्थ। राजा जनक जाणत। विदेह याची मात। अंगिं येऊन ठसावली॥ ३॥ एक चरणाचा अर्थ। जमदग्नि ऋषि जाणत। शांतीचे सदनांत। निज शयनीं पहुडला॥ ४॥ एक चरणाचा अर्थ। नारद वसिष्ठ जाणत। शांतीचे सदनांत पहुडलें॥ ५॥ एक चरणाचा अर्थ पंडुपुत्र धर्म जाणे। सत्य यथार्थ भाषणें शत्रुमित्र समान॥ ६॥ अर्जुन तो नर नारायण। हे तो सिद्ध साधक जाण। दुष्ट उद्धारावया कारण। तुका म्हणे अवतरलों॥ ७॥

७२४. [२६९] जन्माचें सार्थक असेल ज्या करणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ १॥ अज्ञान जाऊनि ज्ञानीं रत होणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ २॥ शुद्ध प्रेम यावें वाणी शुद्ध करणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ ३॥ लक्ष्मीकांताची कृपा ज्यासी घेणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ ४॥ आरंभिलें वृत्त सेवट जाणणें। आराधावी तणें गीतादेवी॥ ५॥ साधनसिद्धीचें सौख्य जया घेणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ ६॥ जन्म मृत्युरोग परिहार करणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ ७॥ स्वामीसेवा स्वामीकृपा जया घेणें। आराधावी तेणें गीता देवी॥ ८॥ कलियुगप्रसंगीं घडति दुराचरणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ ९॥ दृष्टादृष्ट पाप हेळा संहरणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ १०॥ ऐसा गीतादशकु बरा जीविं चरणें। आराधावी तेणें गीतादेवी॥ ११॥ श्रीगुरु दासांत प्रेम तुका घेणें। आराधावी तेणें गीता देवी॥ १२॥

---

२६८. प्र. १, ५ व ८. हा अभंग श्री. चिं. ग. कर्वे यांच्या संग्रहांतील बाडांत व इतर बाडांतहि आढळतो.

२६९. हा अभंग प्र. ३, ७ व ८ मधें गीतेनंतर दिला आहे.

श्रीमद्भगवद्गीतेंतील

# संस्कृत श्लोकांची सूचि

# गीतेंतील श्लोकांच्या अनुवादाखेरीज
## अध्यायपूर्ततेसाठीं रचलेल्या अभंगांची सूचि

| अभंग क्रमांक | विषय | पृष्ठ | अभंग क्रमांक | विषय | पृष्ठ |
|---|---|---|---|---|---|
| **प्रारंभीचे – विषय प्रवेशाचे** | | | ६७६अ+ | अध्याय १८ वा | १९५ |
| ४१८† | अध्याय ११ वा | १२२ | ७१५ + | ,, १८ वा | २०६ |
| ४९८§ | ,, १३ वा | १४९ | ७१७ † | ,, १८ व | २०७ |
| ५३५¶ | ,, १४ वा | १५९ | **शेवटील – उपसंहाराचे** | | |
| ५६४§ | ,, १५ वा | १६७ | ३०९ † | अध्याय ७ वा | ९० |
| ५८६¶ | ,, १६ वा | १७३ | ३३८ † | ,, ८ वा | ९८ |
| ६१२§ | ,, १७ वा | १८० | ३७३ † | ,, ९ वा | १०८ |
| ६४२§ | ,, १८ वा | १८८ | ४१७ † | ,, १० वा | १२१ |
| **अधिक मजकुराचे** | | | ४७५ † | ,, ११ वा | १४१ |
| **किंवा पाठभेदाचे** | | | ४७६ † | ,, ११ वा | १४१ |
| ५ अ + | अध्याय १ ला | ७ | ४९७ * | ,, १२ वा | १४८ |
| ५ आ+ | ,, १ ला | ७ | ५३४ † | ,, १३ वा | १५८ |
| ४१२× | ,, १० वा | १२० | ५६३ † | ,, १४ वा | १६६ |
| ४५३¶ | ,, ११ वा | १२३ | ५८५ † | ,, १५ वा | १७२ |
| ४९९‡ | ,, १३ वा | १४९ | ६११ † | ,, १६ वा | १७९ |
| ५९१अ× | ,, १६ वा | १७४ | ६४१ † | ,, १७ वा | १८७ |

टीपः—कांहीं प्रती गीतानुवाद ८-९ अध्यायापर्यंत छापून झाल्यानंतर हातीं आल्यानें उपरिनिर्दिष्ट अभंगांवरील ठिकठिकाणीं दिलेल्या टीपांत बदल होतो तो:—

† प्रत २, ४ व ६त नाहीं.    § प्रत २, ४, ६ व ८त नाहीं.

¶ प्रत २, ४, ६, ७ व ८त नाहीं.    + प्रत १,२,४,५,६,७ व ८त नाहीं.

‡ प्रत ४, ६ व ८त नाहीं.    × प्रत २ ते ८त नाहीं.

* प्रत ४ व ६त नाहीं.

## गीतानुवादांतील
# अ भं गां ची सू चि

## श्रीयुत वा. सी. बेंद्रेकृत इतर पुस्तकें

—:०:—

| | | रु. आ. पै |
|---|---|---|
| १. | साधनचिकित्सा–(संशोधकांची मार्गदर्शिका) ... | ३-८-० |
| २. | राजारामचरितम्–(राजाराम महाराजांचा जिंजीचा... प्रवास–संस्कृत-मराठी-इंग्रजी) ... ... | १-८-० |
| ३. | राजाराम चरितम् (शालोपयोगी आवृत्ति-संस्कृत) ... | ०-८-० |
| ४. | गोवळकोंड्याची कुत्बशाही (मराठी इंग्रजी) ... | ४-०-० |
| 5. | Tarikh-I-Ilahi [ Akbar's Divine Era ] ... | 1-0-0 |
| 6. | दंडनीतिप्रकरणम् [ Criminal Jurisprudence ] ( Sanskrit-English ) ... | 3-0-0 |
| 7. | A Study of Muslim Inscriptions ... | 7-0-0 |
| 8. | The Factory and E.I. Company Records... | 0-8-0 |
| 9. | Maharashtra of the Shivashahi Period ... | 1-0-0 |
| 10. | Stenography for India ... ... | 0-8-0 |
| ११ व १२. | मराठी शॉर्टहॅंड व गुजराती शॉर्टहॅंड(प्रत्येकीं)... | २-८-० |
| 13. | A Contemporary Portrait of Shivaji ... | 0-2-0 |
| 14. | Pictures and Photographs of Dehu Temples | 0-8-0 each |

### *READY FOR PRESS*

१५. देहूदर्शन ( सचित्र )

१६. तुकारामचरित्र प्रथम भाग-चरित्र, द्वितीय भाग परिशिष्टें

१७. चैतन्य लीला–केशव व राघवचैतन्य–कृष्णदास बैरागीकृत

18. Coronations of Shivaji [ by Gagabhatt - Sanskrit ]

19. Portuguese Relations with the Sultans of the Deccan [ 16th Century ]

20. Siege of Bassein—1739 A. D.

21. Peshwa Activities in the South—1755-1760 A. D.

22. Mahadji Shinde—Anderson's Memoir

23. Dutch and Portuguese Activities in the Deccan 1626-1650 A. D.